शोधप्रकाशन ग्रंथमाला- ९५

# श्रीसिद्धान्तशिखामणी समीक्षा

काव्य-सर्वदर्शनतीर्थ, वेदान्ताचार्य, विद्यावारिधी, विद्यावाचस्पती
श्रीमत्काशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू
**डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी**

मराठी अनुवादक
**पं. शिवाप्पा खके**
चारठाणा, ता. जिंतूर, जि. परभणी (महाराष्ट्र)

**शैवभारती शोधप्रतिष्ठान**
जंगमवाडी मठ, वाराणसी

श्रीसिद्धान्तशिखामणी समीक्षा (मराठी)
डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी
अनुवाद : पं. शिवाप्पा खके

Shree Siddhant Shikhamani Samiksha (Marathi)
Dr. Chandrashekhar Shivacharya Mahaswamiji
Translation : Pt. Shivappa Khake

ISBN : 978-93-82639-35-0

प्रकाशक :
शैवभारती शोधप्रतिष्ठान,
डी. ३५/७७, जंगमवाडी मठ,
वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१ ००१
दूरभाष : 070843 21008

अक्षरसंयोजन :
उमेश खके
चारठाणा, ता. जिंतूर, जि. परभणी ४३१ ५०९
चरभाष : 09422178543



मुद्रक :
बाबूराव कोरे, शिवानंद प्रिंटर्स,
J-34, एम.आय.डी.सी., कुपवाड ब्लॉक, सांगली ४१६ ४३६
स्थिरभाष : 0233 - 2643255

प्रथमावृत्ती : ४ मार्च २०१९ (महाशिवरात्री)

प्रती : १०००

मूल्य : रु. १२५/-

।। श्री जगद्गुरु पंचाचार्याः प्रसीदन्तु।।



श्रीमत्काशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर

**श्री १००८ जगद्गुरू डॉ. चन्द्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी**

**जंगमवाड़ीमठ, वाराणसी.**

श्रीमत्काशीज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू

## डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी

# आशीर्वचन



'श्रीसिद्धान्तशिखामणीसमीक्षा' या मूळ संस्कृत प्रबंधाचा मराठी अनुवाद चारठाणा येथील पं. शिवाप्पा खके यांनी केलेला पाहून आम्हाला खूप समाधान झालेले आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा एक दार्शनिक ग्रंथ आहे. त्याचा सरळ बोध महाराष्ट्रातील सर्व सद्भक्तांना व्हावा या उद्देशाने हे अनुवादकार्य संपन्न झाले आहे. आपल्या व्यस्त दैनंदिन व्यवहारामध्ये वेळात वेळ काढून पं. शिवाप्पा खके यांनी हे अनुवादकार्य एक वर्षामध्ये पूर्ण केले आहे.

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ भारतीय दार्शनिक साहित्यामध्ये समन्वय प्रतिपादन करणारा एक मौलिक ग्रंथ आहे. योगिकुलचक्रवर्ती श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी रेणुकागस्त्यसंवादाच्या रूपाने या ग्रंथाची प्रामुख्याने अनुष्टुभ् छंदात रचना केली आहे. हा एक प्रासादिक ग्रंथ आहे. या ग्रंथात वीरशैव धर्मदर्शनाची संपूर्ण माहिती अत्यंत विस्ताराने प्रतिपादित केली आहे. मुख्यतः हा ग्रंथ अठ्ठावीस शैवागमांवर आधारित असून ठिकठिकाणी वेदमंत्रांचे सुद्धा प्रमाणरूपाने प्रयोग केले आहेत. म्हणून वेदागमांच्या आधारे वीरशैवसिद्धान्त प्रतिपादन करणारा हा एक अपूर्व ग्रंथ आहे. म्हणून या ग्रंथाला 'वीरशैवांचे सर्वस्व' असे म्हटले आहे. वीरशैवीय षट्स्थल सिद्धान्ताचे एकशे एक स्थलांमध्ये विस्तृत विवेचन केवळ या ग्रंथामध्येच आढळते. षट्स्थलांचे विवेचन श्रीशिवयोगी शिवाचार्यांची मौलिक देणगी होय. प्रायः सर्व दार्शनिकांनी ईश्वर, जीव, जगत्, बंध आणि मोक्ष या पाच विषयांवर चिंतन केले आहे. तसेच 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्येही या पाच मौलिक विषयांवर सखोल माहिती आहे. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी

आपल्या पूर्वाश्रमामध्ये कर्नाटकातील गुळेदगुड्ड येथील अमरेश्वर मठाचे पट्टाधिकारी असताना काशी येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयामध्ये पीएच.डी.साठी 'श्रीसिद्धान्तशिखामणी आणि षड्दर्शने यांचे तौलनिक अध्ययन' या विषयावर प्रबंधलेखन करून तो 'श्रीसिद्धान्तशिखामणिसमीक्षा' या नावाने प्रसिद्धही केला होता. त्या संशोधनप्रबंधाचा लाभ महाराष्ट्रातील सर्व लोकांना व्हावा म्हणून पं. शिवाप्पा खके यांनी मराठी भाषेमध्ये अनुवाद करून पूर्ण केला आहे. पं. शिवाप्पा खके हे संस्कृत भाषा आणि भारतीय शास्त्रांचे विद्वान अभ्यासक असल्यामुळे त्यांनी मराठीमध्ये सुंदर रितीने अनुवाद केला आहे. आता महाराष्ट्रातील लोकांना वीरशैवदर्शनाची माहिती मिळविण्यास मुळीच अडचण येणार नाही. पं. खकेजी यांनी संत मन्मथस्वामीकृत अनुभवानंद, संत महादेवप्रभु अभंगगाथा, संत लक्ष्मण महाराज अभंगगाथा, पंचरत्न शिवपाठ इत्यादी ग्रंथांचे संपादन केले आहे. याशिवाय वरदशंकर व्रतकथा, संत जनार्दनचरितामृत व पंचाचार या ग्रंथांचे लेखन केले.

महाराष्ट्राचे वीरशैव संस्कृत पंडित म्हणजे पं. शिवाप्पा खके हेच होत. पं. शिवाप्पा खके हे जरी विज्ञान विषयाचे विद्यार्थी असले तरीही त्यांनी खाजगी विद्वानांकडून संस्कृत आणि तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला आहे. माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक असल्यापासून निवृत्तीनंतर आजपर्यंत त्यांनी महाराष्ट्रातील अनेक मठाधिपतींना संस्कृत शिकविले आहे. पारंपरिक शेती व्यवसायामध्ये सुद्धा त्यांना अभिरुची आहे. घरगृहस्थी सांभाळीत त्यांचे पठण-पाठण, लेखन व साहित्यसेवेचे कार्य निरंतर चालू आहे. महाराष्ट्रातील वीरशैव संतसाहित्याचे गाढे अभ्यासक, एक सिद्धहस्त लेखक-कवी डॉ. शे.दे. पसारकर यांचे या कामी मौलिक सहकार्य लाभले. म्हणून याप्रसंगी पं. शिवाप्पा खके आणि डॉ. शे.दे. पसारकर यांना व त्यांच्या परिवाराला अनंत मंगलाशीर्वाद प्रदान करीत आहोत. त्यांच्या या मौलिक साहित्यसेवेसाठी २०१९ या वर्षीचा 'जगद्गुरू विश्वाराध्य विश्वभारती' हा पुरस्कार महाशिवरात्रीच्या पुण्यपर्वावर पं. शिवाप्पा खके यांना प्रदान केला जाईल, असे घोषित करीत आहोत.

इत्याशिषः

# प्रस्तावना

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा वीरशैवधर्माचा प्राचीन आणि प्रामाणिक ग्रंथ आहे. या धर्माचे तत्त्वज्ञान मुळात भ. शिवांनी भगवती पार्वतीला केलेल्या उपदेशात आहे. म्हणूनच म्हटले की,

आगतं शिववक्त्रात्तु गतं तु गिरिजाश्रुतम्।
मतं श्रीवासुदेवेन आगमस्तेन कीर्तितः।।

भ. शिवांनी पार्वतीला सांगितले, भ. विष्णूंनी ते मान्य केले म्हणून या उपदेशाला 'आगम' असे म्हणतात. असे अठ्ठावीस आगम आहेत. कामिकागमापासून वातुलागमापर्यंतच्या अठ्ठावीस आगमांच्या उत्तरभागात या तत्त्वज्ञानाचा उपदेश केलेला आढळतो. म्हणूनच म्हटले आहे की,

सिद्धान्ताख्ये महातंत्रे कामिकाद्ये शिवोदिते।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैव मतं परम्।।

ज्याप्रमाणे सर्व उपनिषदांचे सार श्रीमद्भगवद्गीतेत आहे त्याप्रमाणे कामिकागमापासून वातुलागमापर्यंतच्या अठ्ठावीस आगमांचे सार 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात समाविष्ट करण्यात आलेले आहे. जन्माला आलेला जीव चौऱ्यांशी लक्ष योनींमधून भटकत भटकत जन्ममरणाचे दुःख भोगत असतो. या फेऱ्यातून आपली सुटका झाली पाहिजे, असे त्याला वाटणे स्वाभाविक आहे. सर्वच दार्शनिक म्हणतात, 'ज्ञानादेव तु कैवल्यम्', 'ऋते ज्ञानान्न मुक्तिः', 'ज्ञानेन मुक्तिर्नतु मुण्डनेन'. जीवनाचे यथार्थ स्वरूप कळणे म्हणजे दिव्यज्ञान होणे. ते झाले की जीव शिवस्वरूप होतो. या उपदेशाचा हेतू ज्ञानप्राप्ती व नंतर शिवप्राप्ती असाच होतो. हेच जीवनाचे ध्येय.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या काही महत्त्वपूर्ण मान्यता लक्षात घ्याव्या लागतील. पहिले म्हणजे जीव हा शिवाचा अंश मानला आहे. जीव हा शिवाचा अंश असूनही शिवत्वप्राप्ती अशी सहज सुलभ होत नाही. शिवत्वप्राप्तीच्या मार्गातील अडथळा म्हणजे जीवाची बद्धता होय. जीव बद्ध का झाला याचे उत्तर असे की, शिवाचा अंश असल्यामुळे ज्या शक्ती शिवाजवळ आहेत त्याच शिवाचा अंश असल्यामुळे जीवाजवळही असाव्यात; पण शिव नित्यमुक्त व जीव मात्र बद्ध आहे. याचे

कारण जीवाची उपाधी अविद्या हे होय. अविद्येमुळे याच शक्ती जीवाजवळ संकुचित रूपात आहेत. थोडक्यात जीव व शिवातील भेद असा शिव सूक्ष्म-चित्-अचित्-शक्तिविशिष्ट आहे, तर जीव स्थूल-चित्-अचित्-शक्तिविशिष्ट आहे. चित् म्हणजे ज्ञानशक्ती, अचित् म्हणजे क्रियाशक्ती. या दोन्ही शक्ती शिवाजवळ (सूक्ष्म) निर्मल तर जीवाजवळ समल, स्थूल रूपात आहेत. दोघांतील भेद समजून घेऊ. मल हे तीन प्रकारचे आहेत. १. आणवमल, २. मायामल व ३. कार्मिकमल. आणवमल म्हणजे 'अपूर्णं मन्यतारूपं आणवं मलम्' अर्थात् जीव स्वत:ला अपूर्ण समजतो. वस्तुत: तो पूर्ण आहे. ही पूर्णताशक्ती संकुचित झाल्यामुळे आणवमलाचा प्रभाव म्हणून जीव बद्ध होतो. दुसरा मायामल 'भिन्नवेद्य प्रथारूपं मायीयं मलम्' अशी व्याख्या क्षेमराजांनी केली आहे. अर्थात् जीव स्वत:ला शिवाहून भिन्न समजतो ही समजूतच मायामल. वस्तुत: तो शिवरूपच आहे, भिन्न नाही. पण तो तसे समजतो. तिसरा मल कार्मिकमल. जीव स्वत:ला कर्माचा कर्ता व भोक्ता मानतो. ही त्याची समजूतही बद्धतेला कारण आहे. वास्तविक सर्वकर्ता शिव आहे, जीव नव्हे. या तीन मलांमुळे जीव बद्धतेला प्राप्त झाला. जीव जर साधना करून पूर्णताशक्तीचा विकास करील तर आणवमल दूर होईल. ज्ञानशक्तीचा विकास करील तर मायामल दूर होईल व क्रियाशक्तीचा विकास करील तर कार्मिकमल दूर होईल. या त्रिमलांची निवृत्ती गुरुकृपेनेच होत असते. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे की,

जीवत्वं दु:ख सर्वस्वं तदिदं मल कल्पितम्।
निरस्यते गुरोर्बोधाद् ज्ञानशक्ति: प्रकाशते।। सि.शि. १८.१८

या त्रिमलांचा नाश म्हणजेच शक्तींचा चरम विकास झाला तर तो शिवरूपच होईल.

**स्थलमांडणी**

वीरशैव तत्त्वज्ञानामध्ये 'स्थल' अशी एक संज्ञा आहे. शक्तीचा विकास करताना साधनेमध्ये असलेले टप्पे म्हणजे स्थल होय. स्थलाचे मुख्य दोन प्रकार- अंगस्थल आणि लिंगस्थल. अंग म्हणजे साधक जीव व लिंग म्हणजे उपास्य शिव. अंगस्थलामध्ये भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि

ऐक्य असे सहा प्रकार तर लिंगस्थलामध्ये देखील भक्तादी ऐक्यान्त सहाच प्रकार पडतात. अंगस्थलामध्ये भक्तीने साधनेचा प्रारंभ होतो. हे स्थल म्हणजे अंगस्थलातील भक्तस्थलामधील पिंडस्थल होय. अंगस्थलातील एकूण अवांतर स्थले ४४ व लिंगस्थले ५७ आहेत. एकूण संख्या १०१ होत असल्याने या शास्त्रास एकोत्तर शतस्थलीय शास्त्र असेही म्हणतात. अंगस्थलातील भक्तादी सहा स्थलांतील योग्यता संपादन केल्यानंतर साधक लिंगस्थलात प्रवेश करतो. पूर्वी सांगितल्याप्रमाणे लिंगस्थलातही भक्तादी सहा स्थले आहेत. दोन्ही स्थलांतील नावे सारखीच असली तरी स्तरामध्ये फरक आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या १५ व्या परिच्छेदात याचे उत्तर दिले आहे. 'लिंगस्थलानि कथ्यन्ते जीवन्मुक्ति पराणि च।' म्हणजे साधनेमध्ये साधकात जिवंतपणी मुक्तीची चिह्ने दृग्गोचर होत असल्याने त्या दशेला जीवन्मुक्त दशा असे म्हणतात. त्यानंतर केलेल्या साधनेमध्ये ५७ स्थलांतून वाटचाल करीत ऐक्यस्थलातील अंतिम टप्पा म्हणजे ज्ञानशून्यस्थल होय. या स्थलातील पूर्ण योग्यता संपादन केल्यावर

जले जलमिव न्यस्तं वह्नौ वह्निरिवार्पित:।
परब्रह्मणि लीनात्मा विभागेन न दृश्यते।। सि.शि. २०.६१

अर्थात् पाणी पाण्यात मिसळावे, अग्नी अग्नीत मिसळावा त्याप्रमाणे जीव विकास करीत करीत ज्ञानशून्य स्थितीत आल्यानंतर शिवच होतो, वेगळा राहात नाही. यालाच जीवशिवैक्य म्हणतात. हीच जीवनाची चरितार्थता, कृतार्थता मानली जाते. अशी ही क्रमबद्ध विकासाची विज्ञाननिष्ठ मांडणी आहे. ही पद्धती केवळ वीरशैव तत्त्वज्ञानातच आढळते हे विशेष.

**समन्वय**

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ समन्वयासाठी प्रसिद्ध आहे. या ग्रंथाच्या पहिल्या परिच्छेदाच्या पहिल्या श्लोकात मंगलाचरण करताना ग्रंथकर्ते शिवयोगी शिवाचार्य म्हणतात:-

त्रैलोक्यसंपदालेख्यसमुल्लेखनभित्तये।
सच्चिदानन्दरूपाय शिवाय ब्रह्मणे नम:।। सि.शि. १.१

यात आगमिक परंपरेमध्ये जीवनाचे लक्ष्य शिवप्राप्ती असल्याने अंतिम तत्त्व

शिव मानले आहे. वैदिक परंपरेमध्ये असे लक्ष्य ब्रह्म मानले आहे. दोन्ही परंपरांमध्ये असलेली लक्ष्ये शिव आणि ब्रह्म वेगळी नसून एकरूप आहेत, हे व्यक्त करण्यासाठी दोघांनाही वंदन केले आहे. इथे आगमिक आणि वैदिक परंपरांच्या लक्ष्यांमध्ये समन्वय साधला आहे. वेदसिद्धान्तयोरैक्यमेकार्थप्रतिपादनात् असा हेतू स्पष्ट केला की या दोघांचे स्वरूप एक आहे, भिन्न नव्हे. हे लक्षात येते म्हणूनच वीरशैवांचे लिंगतत्त्व हे ब्रह्मतत्त्वाहून वेगळे नाही हे स्पष्ट करताना 'लिंगं ब्रह्म सनातन', 'यद्दृष्टं सर्ववेदेषु तत्सर्वं तु शिवागमे' या वचनांत वेद आणि आगम यांच्यातही एकरूपता व्यक्त केली, हा मुख्य समन्वय आहे.

**ज्ञान आणि क्रिया यांचा समन्वय**

भारतीय तत्त्वज्ञान परंपरेमध्ये मोक्षप्राप्ती काहीजण ज्ञानाने मानतात तर काहीजण कर्माने मानतात आणि परस्पर केलेला संघर्ष विकोपाला गेलेलाही दिसतो. वीरशैव परंपरेमध्ये केवळ ज्ञानाने नाही व केवळ क्रियेनेही मोक्षप्राप्ती नाही तर उभयांच्या समन्वयाने ती प्राप्त होते, असे मानले आहे. 'न क्रियारहितं ज्ञानं न ज्ञानरहिता क्रिया' या वचनांतून हाच संदेश दिला आहे. एक दृष्टांत असा सांगितला जातो की एका घराला आग लागली, आत एक आंधळा व दुसरा पांगळा आहे. बाहेर पडण्यासाठी आंधळ्याला दृष्टी नाही व पांगळ्याला दृष्टी आहे पण चालायला पाय नाहीत. मग त्या दोघांनी ठरविल्याप्रमाणे आंधळ्याच्या खांद्यावर पांगळा बसतो व एकाचे ज्ञान व दुसऱ्याची क्रिया यांचा मेळ बसवून ते सुरक्षित बाहेर पडतात. म्हणूनच म्हटले आहे की, 'अन्धपंगुवदन्योन्ये सापेक्षे ज्ञानकर्मणी।' हा ज्ञान व क्रिया यांचा समन्वय आहे.

**परमतसहिष्णुता**

कुठल्याही संप्रदायाचे अनुयायी स्वतःचा संप्रदाय मोठा, उपास्य दैवत सर्वोत्तम असल्याचे सांगत इतरांच्या मताचे खंडन करतात व आपण सर्वोत्तम असल्याचे प्रतिपादन करतात. वीरशैव संप्रदायामध्ये विशेष गोष्ट ही की येथे इतरांच्या मताचा व मताच्या प्रणेत्याचा गौरव केला आहे. या संबंधी म्हटले आहे की,

सांख्यं योगः पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा।
एतानि मानभूतानि न हन्त्यव्यानि युक्तिभिः।। सि.शि. ५.४

या वचनात कपिलमुनीप्रणीत सांख्य, पतंजलीप्रणीत योग, वैष्णव मत असलेले पांचरात्र, पशू, पाश व पती अर्थात् जीव, जगत् आणि जगदीश्वर मानणारे पाशुपत अशी सगळी दर्शनशास्त्रे मानभूत आहेत, महत्त्वाची आहेत, असे म्हणून त्यांचा गौरव केला व युक्तीने इतरांचे खंडन करू नये, असा महत्त्वपूर्ण सल्ला दिला आहे. ही एकप्रकारची उदात्त भावना आहे असे निर्विवाद म्हणता येईल.

शिव थोर विष्णु थोर । ऐसे भांडो भांडणार ।।
आम्ही न लागो त्या छंदा । व्यर्थ कोण करी निंदा ।। (संत शिवदास)

असे म्हणणाऱ्या आमच्या संतांनीही परमताची कधीच निंदा केली नाही तर त्या त्या संप्रदायाचा गौरवच केला आहे.

**शिवपंचमहायज्ञ**

प्रत्येक धर्मात साधना म्हणून तप, कर्म, जप, ध्यान व ज्ञान ही मार्गपद्धती प्रचलित आहे. या बाबतीत वीरशैवांची भूमिका काय आहे असा प्रश्न स्वाभाविकपणे विचारला जाऊ शकतो. त्याचे समाधान असे की,

शिवार्थे देहसंशोषस्तपः कृच्छ्रादि नो मतम्।
शिवार्चा कर्मविज्ञेयं बाह्यं यागादि नोच्यते।।
जपः पंचाक्षराभ्यासः प्रणवाभ्यास एव वा।
रुद्राध्यायादिकाभ्यासो न वेदाध्ययनादिकम्।।
ध्यानं शिवस्य रूपादि चिन्ता नात्मादिचिन्तनम्।
शिवागमार्थविज्ञानं ज्ञानं नान्यार्थवेदनम्।
इति पंचप्रकारोऽयं शिवयज्ञः प्रकीर्तितः।। सि.शि. ९.२१

अर्थात् वीरशैवांसाठी शिवकार्यासाठी देह झिजविणे हेच तप होय. चान्द्रायण व कृच्छ्रादि व्रते नव्हेत. वीरशैवांसाठी कर्म म्हणजे लिंगपूजा होय. इथे नित्यकर्म म्हणून होमहवन करण्याची आवश्यकता नाही. वीरशैवांसाठी जप म्हणजे प्रणवाचा अभ्यास, पंचाक्षर वा षडक्षर मंत्राचा अभ्यास होय. पण अन्य वेदभागांचा अभ्यास नव्हे. ध्यान म्हणजे शिवरूपादींचे चिंतन करणे, शरीरेन्द्रियादी उपाधीने युक्त आत्म्याचे चिंतन करणे ध्यान नव्हे. शिवागमांचा अर्थ जाणून घेणे ज्ञान होय पण अन्य शास्त्रांचा अभ्यास म्हणजे ज्ञान नव्हे. अशाप्रकारे तप, कर्म, जप, ध्यान व ज्ञान या सज्ञांचे अर्थ समजावले आहेत.

प.पू. श्रीमत्काशीज्ञानसिंहासनाधीश्वर जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी 'श्रीसिद्धान्तशिखामणिसमीक्षा (दर्शनान्तरीय तुलना)' असा एक शोधनिबंध पीएच.डी.साठी डॉ. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालय, वाराणसी येथे सादर केला. तेव्हा ते कर्नाटकातील गुळेदगुड्ड मठावर शिवाचार्य होते. या विश्वविद्यालयाने त्यांना पीएच.डी. ही पदवी बहाल केली. तो प्रबंध संस्कृत भाषेत प्रकाशितही झाला. पण संस्कृत सर्वांना कळत नसल्याने श्रीमती भुवनेश्वरी भारद्वाज या विदुषींनी त्याचा हिंदी अनुवाद करून प्रकाशित केला. महाराष्ट्रातील भाविकांना तो कळावा म्हणून पूज्यपादांनी मला या ग्रंथाचा मराठी अनुवाद करण्यासाठी आज्ञा दिली. त्यांच्या आशीर्वादाने ते काम पूर्ण झाले. त्यांच्या अमोघ ज्ञानाचा आणि प्रागल्भ्यपूर्ण लेखनशैलीचा महाराष्ट्रीय भाविकांना आता लाभ होईल अशी आशा आहे. पूज्यपादांचा शोधप्रबंध अनुवादित करणे हे काम सोपे नव्हते. त्यांचे संस्कृत भाषेवर विलक्षण प्रभुत्व असल्याने त्यांचा विचार जसाच्या तसा आणता येणार नाही असे वाटू लागले. तरीही मराठी माणसासंबंधीच्या आत्मीय भावनेमुळे लिहिण्यास प्रवृत्त झालो. तसा मी गणित, विज्ञान विषयांचा पदवीधर आहे पण दैवयोगाने लहानपणापासून विद्वान मंडळींच्या सहवासात राहण्याचा योग आला. पूज्य महास्वामीजींच्या विभूतिमत्त्वात एक गुण अतिशय महत्त्वाचा तो म्हणजे अभ्यासकांना प्रेरणा व प्रोत्साहन देणे. त्यांच्या प्रोत्साहनामुळेच मी संस्कृत किंवा वेदान्त विषयातील कुठलीही पदवी नसताना वीरशैव तत्त्वज्ञानाच्या अभ्यासास प्रवृत्त झालो. महास्वामीजींच्या प्रेरणेने महाराष्ट्र आणि बाहेरही शास्त्रचर्चेमध्ये सहभाग घेतला, काही ग्रंथांचे लेखन, संपादनही केले.

या प्रबंधात एकूण नऊ परिच्छेद आहेत. पहिल्या परिच्छेदात वीरशैव तत्त्वज्ञान, त्याचे स्रोत, परंपरा व उपलब्ध ग्रंथ यांचा आढावा घेतलेला असून दुसऱ्या परिच्छेदात वीरशैवांचा प्राचीन आणि प्रामाणिक ग्रंथ 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाची तोंडओळख करून दिलेली आहे. तिसऱ्या ते सहाव्या परिच्छेदांमध्ये अनुक्रमे ईश्वरस्वरूपविमर्श, जीवात्मस्वरूपविमर्श, सृष्टिमीमांसा व बंधमोक्ष-विचारविमर्श या चार विषयांची सखोल आणि तौलनिक चर्चा केलेली आढळते. या चार तत्त्वांसंबंधी सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा

या सहा दर्शनशास्त्रांच्या मान्यतांसोबत वीरशैवदर्शनाच्या मान्यतेचा तुलनात्मक अभ्यास प्रतिपादन केला आहे. या ग्रंथात मात्र तिसऱ्या ते सहाव्या प्रकरणात ईश्वरस्वरूपविमर्श, जीवात्मस्वरूपविमर्श, सृष्टिमीमांसा व बंधमोक्षविचार यासंबंधी केवळ वीरशैव पक्षाचेच प्रतिपादन केले आहे. सातव्या परिच्छेदात वरील चार तत्त्वांचा आढावा समीक्षेच्या स्वरूपात मांडला आहे. आठव्या परिच्छेदात 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे विशिष्ट सिद्धान्त मांडले असून यात अष्टावरण, षट्स्थल, पंचाचार या एकोणीस तत्त्वांचा आढावा घेतला आहे. नवव्या परिच्छेदात उपसंहार दिला आहे. उपक्रमोपसंहाराची एकरूपता व इतर षड्लिंगांच्या दृष्टीने आढावा घेतला आहे. परमपूजनीय महास्वामीजींच्या ग्रंथावर सखोल व सर्वांगाने विचारविमर्श झाला असे मी मानत नाही, पण वीरशैवदर्शनाचा तरी संक्षेपाने विचार यात नक्कीच आहे.

या अनुवादलेखनाच्या कामी मराठी वीरशैव साहित्याचे साक्षेपी विद्वान डॉ. शे. दे. पसारकर, त्यांच्या सुविद्य पत्नी सौ. उषाताई पसारकर, मराठी संतसाहित्याचे तरुण अभ्यासक अनिल स्वामी, प्रा. डॉ. शशिकांत दरगू यांची मदत झाली. माझी कन्या संस्कृत अध्यापिका सौ. प्रज्ञा संजय चौंडे, चि. महेश यांचा सहयोग लाभला. चि. उमेश याने अक्षरजुळणीचे कार्य निर्दोष केले. या कार्यासाठी महिनाभर काशी जंगमवाडी मठात राहिलो. या काळात श्रीमती नलिनीताई चिरमे, शिवानंद स्वामी, जगदीश-जयश्री हे दांपत्य यांचे सहकार्य लाभले. या सर्वांचे ऋण व्यक्त करून लेखणीस विराम देतो.

**शिवाप्पा खके**

# विषयानुक्रमणिका

## शिवस्तुतिः

त्रैलोक्यसंपदालेख्यसमुल्लेखनभित्तये।
सच्चिदानंदरूपाय शिवाय ब्रह्मणे नमः।।१।।

ब्रह्मेति व्यपदेशस्य विषयं यं प्रचक्षते।
वेदान्तिनो जगन्मूलं तं नमामि परं शिवम्।।२।।

यस्योर्मिबुद्बुदाभासः षट्त्रिंशत्तत्त्वसंचयः।
निर्मलं शिवनामानं तं वंदे चिन्महोदधिम्।।३।।

यद्भासा भासते विश्वं यत्सुखेनानुमोदते।
नमस्तस्मै गुणातीतविभवाय परात्मने।।४।।

सदाशिवमुखाशेषतत्त्वोन्मेषविधायिने।
निष्कलंकस्वभावाय नमः शांताय शंभवे।।५।।

स्वेच्छाविग्रहयुक्ताय स्वेच्छावर्तनवर्तिने।
स्वेच्छाकृतत्रिलोकाय नमः सांबाय शंभवे।।६।।

यत्र विश्राम्यतीशत्वं स्वाभाविकमनुत्तमम्।
नमस्तस्मै महेशाय महादेवाय शूलिने।।७।।

## शक्तिस्तुतिः

यामाहुः सर्वलोकानां प्रकृतिं शास्त्रपारगाः।
तां धर्मचारिणीं शंभोः प्रणमामि परां शिवाम्।।८।।

यया महेश्वरः शंभुर्नामरूपादिसंयुतः।
तस्यै मायास्वरूपायै नमः परमशक्तये।।९।।

शिवाद्यादिसमुत्पन्नशान्त्यतीतपरोत्तराम्।
मातरं तां समस्तानां वंदे शिवकरीं शिवाम्।।१०।।

इच्छाज्ञानादिरूपेण या शंभोर्विश्वभाविनी।
वंदे तां परमानंदप्रबोधलहरीं शिवाम्।।११।।

अमृतार्थं प्रपन्नानां या सुविद्याप्रदायिनी।
अहर्निशमहं वंदे तामीशानमनोरमाम्।।१२।।

पहिला परिच्छेद

# दार्शनिक पार्श्वभूमी

**श्रीगुरवे नमः।**

दर्शनशास्त्रांचे माहेरघर असलेल्या भारत देशात अनादी कालापासून अनेक दर्शनशास्त्रांच्या परंपरा चालत आल्या आहेत. 'दृशिर् प्रेक्षणे' (भ्वादी १०५७) या धातूस करणार्थी ल्युट् प्रत्यय लागून अनादेश होऊन 'दर्शन' शब्द सिद्ध होतो. म्हणून 'दृश्यते साक्षात् क्रियते परमतत्त्वं येन तद्दर्शनमह्' या व्युत्पत्तीप्रमाणे ज्या शास्त्राचे अनुशीलन केल्याने परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार होतो त्याला 'दर्शनशास्त्र' असे म्हणतात.

## दर्शनशास्त्रांची संख्या

भारतात किती दर्शनशास्त्रे आहेत यासंबंधी विद्वानांचे एकमत नाही. 'शिवमहिम्नस्तोत्रा'त शिवभक्त कविवर्य पुष्पदंतांनी 'रुचीनां वैचित्र्याद् ऋजुकुटिल नाना पथजुषाम्' (म.स्तो. ७) या वचनात म्हटले की, परमात्मप्राप्तीसाठीची साधकाच्या आवडीप्रमाणे अनेक भिन्न भिन्न प्रस्थाने असून त्यांपैकी काही सरळ तर काही वाकडी आहेत. भगवत्पाद शंकराचार्य याबाबतीत 'दशश्लोकी'मध्ये म्हणतात की, 'न सांख्यं न शैवं न तत्पांचरात्रं न जैनं न मीमांसकादेर्मतं वा' (द.श्लो. ४) अर्थात् सांख्य, शैव, पांचरात्र, जैन, मीमांसकादी दर्शनशास्त्रे आहेत. यात आदिपद घातल्यामुळे दर्शनशास्त्रांची संख्या अनंत असल्याचे त्यांनी सूचित केले आहे.

सायन माधवाचार्यांनी आपल्या 'सर्वदर्शनसंग्रह' या ग्रंथात चार्वाक, बौद्ध, जैन, रामानुज, पूर्णप्रज्ञ, लकुलिश, पाशुपत, शैवप्रत्यभिज्ञा, रसेश्वर, वैशेषिक, न्याय, जैमिनीय, पाणिनीय, सांख्य, योग आणि शांकर वेदान्त इत्यादी सोळा दर्शनशास्त्रांचा उल्लेख केला आहे.

वरील विवेचनावरून स्पष्ट होते की कोणत्याही विद्वानाने दर्शनशास्त्रांची संख्या निश्चितपणे सांगितली नाही, हे पाहून नारायण मिश्र म्हणतात, 'दर्शनशास्त्रांची गणना करताना सर्वच विद्वान पक्षपाती वाटतात.' (न्या.द.,प्रस्ता. पृ.१२)

## आस्तिक व नास्तिक दर्शने

भारतातील दर्शने आस्तिक व नास्तिक अशी दोन प्रकारची आहेत. आस्तिक व नास्तिक या शब्दांची अर्थनिश्चिती करताना पंडितांचे एकमत झालेले दिसत नाही. प्रसिद्ध वैयाकरण भ. पाणिनींनी 'अस्ति-नास्ति दिष्टं मतिः' (पा.सू. ४.४.६) या सूत्राद्वारा आस्तिक-नास्तिक या शब्दांचा अर्थ लावला आहे. जे अस्तित्ववादी ते आस्तिक व जे नास्तिकवादी ते नास्तिक ठरतात. म्हणजे एखादी बाब आहे म्हणणारे आस्तिक तर नाही म्हणणारे नास्तिक. वर उल्लेख केलेल्या पाणिनीय सूत्राचे व्याख्यान करताना वामन, 'महाभाष्यप्रदीप'कार कैयट तसेच 'कौमुदी'कार भट्टोजी दीक्षित इत्यादींनी परलोक आहे असे मानणारे आस्तिक व न मानणारे नास्तिक असे स्पष्ट केले आहे. कुल्लूकभट्टांनी 'मन्वर्थमुक्तावली' या 'मनुस्मृती'वरील टीकेत परलोक (जन्मांतर) मानणारे आस्तिक व इतर नास्तिक, असे प्रतिपादन केले आहे. 'श्रीमद् भागवता'वरील टीकेत आचार्य वीरराघव यांनीही वरील आशयाचेच प्रतिपादन केले आहे. 'अस्ति परलोकः इति मतिर्यस्य स आस्तिकः' म्हणजे परलोक आहे असे मानणे म्हणजे आस्तिकत्व. यालाच आस्तिक म्हणावे. आचार्य श्रीधरांनीही याचेच समर्थन केलेले दिसते.

दुसरा प्रकार, ईश्वर आहे असे मानणारे आस्तिक तर न मानणारे नास्तिक असा आस्तिक-नास्तिकासंबंधी निकष लावला जातो. त्याप्रमाणे 'पूर्वमीमांसा' दर्शनात ईश्वराला जगाचा कर्ता मानले नसल्यामुळे मीमांसकांना नास्तिकच नाही तर 'नास्तिकशिरोमणी' अशी पदवी माधवाचार्यांनी दिली आहे. ते म्हणतात, 'नास्तिक शिरोमणे तावदीर्ष्या कषायिते चक्षुषी निमील्य परिभावयतु भवान्.' अर्थात् ईर्षेने दूषित नेत्र बंद करून युक्तियुक्तविचार करण्याचे त्यांनी मीमांसकांना आवाहन केले. तात्पर्य, ईश्वराचे अस्तित्व मानणारे आस्तिक तर इतर नास्तिक.

तिसरा प्रकार, वेदप्रामाण्य मानणारे आस्तिक तर न मानणारे नास्तिक, असा आहे. हे प्रतिपादन करण्यासाठी 'स्मृति'कार मनू म्हणतात, 'नास्तिको वेदनिन्दकः' आद्य शंकराचार्य भगवत्पादांनी आस्तिक्य म्हणजे आगम-वेदप्रतिपादित ज्ञानावर श्रद्धा ठेवणे, असा अर्थ स्पष्ट केला आहे. श्रीमद्भागवताचे टीकाकार वीरराघवाचार्यांनी स्पष्ट शब्दांत प्रतिपादन केले की, परलोक, ईश्वर, कर्मफल व वेद यांच्या प्रामाण्यांवर श्रद्धा असणे म्हणजे आस्तिक्य व यांवर श्रद्धा नसणे हे

नास्तिक्य होय.

अनेक व्युत्पत्तींच्या आधारे व प्राचीन आचार्यांच्या सिद्धान्ताप्रमाणे परलोक, ईश्वर, कर्मफल तसेच वेदप्रामाण्य यांच्याविषयी श्रद्धा असणे ही आस्तिकता आणि यांच्या विरुद्धभाव असणे म्हणजे नास्तिकता होय. हाच आशय 'महाभारता'त धर्मराजाने द्रौपदीला समजावून सांगताना म्हटले आहे:-

न फलादर्शनाद्धर्मः शंकितव्यो न देवताः।
यष्टव्यं च प्रयत्नेन दातव्यं चानसूयया।।
कर्मणां फलमस्तीह तथैतद्धर्म-शाश्वतम्।
ब्रह्मा प्रोवाच पुत्राणां यदृषिर्वेद कश्यपः।।
तस्मात्ते संशयः कृष्णे नीहार इव नश्यतु।
व्यवस्य सर्वमस्तीति नास्तिक्यं भावमुत्सृज।।
ईश्वरं चापि भूतानां धातारं मा च वै क्षिप।। म.भा., वन. ३१.३८-४१

अर्थात् यज्ञयागादींची पूर्ती झाल्यावर फल प्राप्त झाले नाही तर धर्माच्या सत्यतेबद्दल शंका घेऊ नये. यज्ञ करताना मंत्रोच्चारपूर्वक विधियुक्त हवनात देवांसाठी द्रव्यत्याग केल्याबद्दल शंका घेऊ नये. उत्साहाने प्रयत्नपूर्वक यज्ञयागादी करावे व असूयारहित भावनेने दानधर्म करावा. वेदविहित कर्माला कालांतराने फल अवश्य मिळते, म्हणून धर्माला शाश्वत म्हणजे अविनाशी मानावे. ब्रह्मदेवांनी हाच उपदेश महर्षी कश्यपांकडून प्राप्त करून आपल्या पुत्रांना सांगितला. म्हणून श्रीकृष्णाच्या उपदेशाच्या संदर्भात तुला जो संशय आहे तो सूर्यासमोर धुके नष्ट व्हावे तसा निघून जाईल. सारांश, परलोक (जन्मांतर), ईश्वर व वेदप्रामाण्य हे सर्व सत्य आहे. असा निश्चय करून नास्तिक भावाचा त्याग कर. ईश्वर सर्व प्राण्यांचा निर्माता आहे. त्याची उपेक्षा करू नकोस.

या ठिकाणी एक विचार करणे आवश्यक आहे की, जर ईश्वराचे अस्तित्व नाकारणाऱ्यांना नास्तिक म्हणावे तर सांख्यशास्त्राचे प्रणेते महर्षी कपिल तसेच पूर्वमीमांसाशास्त्राचे प्रणेते महर्षी जैमिनी हेही ईश्वराचा स्वीकार करीत नाहीत. त्यांना नास्तिक म्हणावे लागेल. जैमिनींचे अनुयायी असलेले मीमांसक कर्मपूर्ती तथा कर्मफलप्राप्तीसाठी 'अपूर्व' म्हणून एक तत्त्व स्वीकारतात. परंतु कर्माचा फलदाता म्हणून ते ईश्वर मानत नाहीत. महर्षी जैमिनींना नास्तिक म्हणणे योग्य

होणार नाही. जर त्यांना नास्तिक म्हणावे तर आर्यांच्या वेदोक्त नित्यनैमित्तिक कर्मांच्या अनुष्ठानस्वरूप आचारावर नास्तिकत्वाचा आरोप होईल. तसेच सांख्यशास्त्राचे प्रवर्तक महर्षी कपिल हेही ईश्वरतत्त्वाचा अंगीकार करीत नसल्याने त्यांनाही नास्तिक मानावे लागेल. पण शास्त्रांत कपिल किंवा जैमिनी यांना सन्मान दिला जातो, त्यांना नास्तिक म्हटले जात नाही. उलट शास्त्रकार त्यांना आस्तिकच मानतात. सारांश, केवळ ईश्वरतत्त्वाचा अंगीकार करीत नाहीत या कारणामुळे सांख्य व मीमांसक यांना नास्तिक म्हणता येणार नाही.

आता कुल्लूकभट्ट म्हणतात त्याप्रमाणे परलोक मानणारे आस्तिक व न मानणारे नास्तिक असे मानले तर जैन-बौद्ध हे कर्मसिद्धान्त मानतात म्हणून त्यांनाही आस्तिक म्हणावे लागेल. म्हणून कोण आस्तिक व कोण नास्तिक हे निश्चित करताना शास्त्रकारांनी वेदप्रामाण्य स्वीकारणारे आस्तिक तर नाकारणारे नास्तिक असा निकष मानला. त्याप्रमाणे सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दर्शनशास्त्रांना आस्तिक असे म्हटले जाऊ लागले. सामान्यपणे जैन आणि बौद्ध हे वेदप्रामाण्य स्वीकारीत नाहीत. चार्वाक तर वेदांचे कट्टर विरोधक मानले जातात. ते वेदांचे अपौरुषेयत्व मानीत नाहीत. वेदनिंदेमुळे ते नास्तिक मानले जातात. वस्तुस्थिती अशी की, ईश्वर, वेद तथा परलोक यांना मानणे ही आस्तिकांची ओळख आहे. यांच्यापैकी जो एकाही लक्षणाने युक्त असला तरी त्याची आस्तिक श्रेणीमध्ये गणना केली जाते. म्हणून जैन व बौद्ध परलोकाचे अस्तित्व मानत असल्याने त्यांना अत्यंत नास्तिक मानू नये. आता उरलेले चार्वाक दर्शन, त्यांनी ईश्वराचे, परलोकाचे किंवा वेदांचे कशाचे अस्तित्व मानले नाही म्हणून हे एकमात्र चार्वाकच पूर्णतः नास्तिक दर्शन मानावे. बलदेवोपाध्याय यांनी आपल्या 'भारतीय दर्शन'मध्ये तसेच नारायण मिश्र यांनी 'न्यायदर्शन'च्या प्रस्तावनेत याच मताचे समर्थन केले आहे.

या संदर्भात एका बाबीकडे लक्ष दिले पाहिजे की, पूर्वाचार्यांनी वेदप्रामाण्य तसेच वेदप्रामाण्याच्या आधारावर दर्शनांचे आस्तिक तसेच नास्तिक असे वर्गीकरण केले. त्याचे तात्पर्य असे की, आस्तिकत्वाचे परिचायक असलेले ईश्वर आणि परलोक यांच्याबाबत श्रुतिभिन्न प्रत्यक्षादी प्रमाणांचा अभाव असल्याने एकमात्र वेदच प्रमाण ठरते. म्हणून गीतेमध्ये भ. श्रीकृष्ण म्हणतात:-

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रं विधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि।। भ.गी. १६.२४

हे अर्जुना, काय करावे किंवा काय करू नये याचा निर्णय करण्यासाठी तुला प्रमाणस्वरूप एक शास्त्रच आहे. म्हणून शास्त्राने सांगितलेले विधिरूप कर्म चांगल्या रीतीने समजून घेतल्यानंतर शास्त्रविहित कर्माचे अनुष्ठान करावे.

म्हणून आपण असा निष्कर्ष काढू शकतो की, वरील गीतोक्तीनुसार वेद आणि शास्त्रे हीच लौकिक तसेच पारलौकिक जीवनाला सुव्यवस्थित रूप देतात. म्हणून शास्त्रानुसारच लोकव्यवहार करावा. जीवनाला व्यवस्थित रूप देणाऱ्या वेदवचनांवर ज्यांचा विश्वास नाही ते नास्तिक व विश्वास आहे ते आस्तिक समजावेत.

याप्रमाणे वेदप्रामाण्य मानणारे न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या भारतीय दर्शनशास्त्रांना 'वैदिक दर्शने' म्हणतात. यांनाच आस्तिक दर्शने अशीही संज्ञा दिली जाते. याहून वेगळे चार्वाक, जैन व बौद्ध दर्शने यांना अवैदिक तसेच नास्तिक दर्शने म्हणतात.

या ग्रंथात वीरशैवांच्या सिद्धान्ताचा विचार करावयाचा आहे.

**वीरशैवदर्शनाचा इतिहास**

भारतवर्षात निगम आणि आगम अशा दोन शास्त्रशाखा प्रसिद्ध आहेत. ती शास्त्रे परस्पर प्रतिद्वंद्वी नाहीत. निगम हे परमात्म्याच्या श्वासातून तर आगम हे परमेश्वराच्या मुखातून प्रकट झाले, असे मानले जाते. ही दोन शास्त्रे परस्परपूरक आहेत. 'निश्चयेन तत्त्वं गमयतीति निगमः' म्हणजे परमतत्त्वापर्यंत पोहोचविणारे निगम अशी निगमांची, तर 'आप्तवचनादाविर्भूतमर्थविशेषसंवेदनमागमः' आप्ताच्या मुखातून आविर्भूत झालेले अर्थविशेषाचे प्रबोधनात्मक ज्ञान हे आगम, अशी आगमाची व्युत्पत्ती सांगितली जाते. निगम (वेद) अगाध ज्ञानाचा महाकोश आहे. वेदवाक्याचेच तात्पर्य ग्रहण करून भिन्न भिन्न शास्त्रकारांनी परस्परविरुद्ध सिद्धान्त प्रतिपादित करून निगमाचे स्वरूप संशयास्पद बनविले आहे. म्हणून सामान्य जनांना निगम उपयुक्त नाहीत हे पाहून लोकोपचारकर्त्या भ. शिवांनी सर्व जनांच्या उपयोगासाठी वेदार्थाचे विवरण करणाऱ्या आगमांचा उपदेश पार्वतीदेवीला केला. असे म्हटले जाते की–

आगतं शिववक्त्रात्तु गतं च गिरिजामुखे।
मतं श्रीवासुदेवेन आगमस्तेन कीर्तितः।। भास्करी, द्वितीय भाग, पृ. ८५

भ. शिवाच्या मुखातून आलेले जे ज्ञान पार्वतीला प्राप्त झाले आणि जे विष्णूंनी मान्य केले त्यास 'आगम' असे म्हणतात. अशी आगम या तीन अक्षरांचे स्पष्टीकरण करणारी नैरुक्तिका व्याख्या दिली जाते. हा आगम शब्दाचा रूढार्थ मानला जातो. आगमाचा यौगिक अर्थ 'आसमन्ताद् अर्थं गमयतीति आगमः' म्हणजे सर्व प्रकारांनी पुरुषार्थोपयोगी ज्ञानाचा उपदेश करणारे ते आगम, असा आहे. वाचस्पती मिश्र म्हणतात, 'आगच्छन्ति बुद्धिमारोहन्ति यस्माद् अभ्युदयनिःश्रेयस् सोपायाः स आगमः' (यो.सू., तत्त्ववैशारदी १.१५). ज्या दिव्य शब्दराशीमुळे लौकिक अभ्युदय आणि निःश्रेयस्रूप मोक्षाचा उपाय बुद्धीत येतो ते आगम होत.

'तन्यते विस्तार्यते ज्ञानमनेन' या व्युत्पत्तीप्रमाणे ज्ञानाचा विस्तार करते ते तंत्र. आगमांनाच 'तंत्र' असेही म्हणतात. तंत्रवेत्ते विद्वान तंत्र शब्दाचा यौगिक अर्थ सांगतात.

तनोति विपुलानर्थान् तंत्रमंत्रसमन्वितान्।
त्राणं च कुरुते यस्मात्तंत्रमित्यभिधीयते।।

या 'कामिकागमा'तील प्रतिपादनाप्रमाणे, ज्या दिव्य शब्दराशीमुळे ज्ञानाचा विस्तार होतो त्याला तंत्र म्हणतात. तंत्रमंत्रसमन्वित विपुल अर्थाचे तनन म्हणजेच विस्तार केला जातो व उपासकांचे रक्षण केले जाते ते तंत्र, हा वरील श्लोकाचा आशय आहे.

### तंत्रांचे प्रकार

तंत्राचे ब्राह्मणतंत्र, बौद्धतंत्र व जैनतंत्र असे तीन प्रकार होतात. उपास्य देवतांवरून ब्राह्मणतंत्राचे अवांतर तीन प्रकार होतात. शैवतंत्र, वैष्णवतंत्र व शाक्ततंत्र अशी त्यांची नावे होत. वैष्णवागम (पांचरात्रागम व वैखानसागम) हे विशिष्टाद्वैत सिद्धान्ताचे प्रतिपादन करतात. शाक्तागम अद्वैतप्रतिपादक तर शैवागम द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत, विशिष्टाद्वैत व विशेषाद्वैत अर्थात् शक्तिविशिष्टाद्वैत या मतांचे प्रतिपादन करतात. पाशुपत व सिद्धान्तशैव हे शैवागम द्वैतसिद्धान्ताचे प्रतिपादक असून

प्रत्यभिज्ञादर्शन (काश्मीरशैव) अद्वैतप्रतिपादक आहे. श्रीकंठशैवदर्शन हे शैवविशिष्टाद्वैताचे प्रतिपादन करते. लकुलीशपाशुपत द्वैताद्वैतप्रतिपादक आहे. भ. शिवांनी सांगितलेले कामिकागमादी वातुलान्त २८ शैवागम आहेत. यांनाच 'सिद्धान्तागम' म्हणतात. 'आप्तोक्तिरत्र सिद्धान्तः शिवएवाप्तिमान् यतः।' अर्थात् आप्तवचनास आगमविश्वात सिद्धान्त शब्दाने ओळखले जाते, असे श्रीकंठसूरी आचार्यांचे म्हणणे आहे. येथे 'आप्तस्तु यथार्थ वक्ता' म्हणजे जे जसे आहे तसे प्रतिपादन करणारा आप्त मानला जातो. भ. शिव हे आप्त आहेत. शिवागमांची नावे पुढीलप्रमाणे आहेत:-

कामिकं योगजं चिन्त्यं कारणं त्वजितं तथा।
दीप्तं सूक्ष्मं सहस्रं च अंशुमत् सुप्रभेदकम्।।
विजयं चैव निश्वासं स्वायंभुवमथानिलम्।
वीरं च रौरवं चैव मकुटं विमलं तथा।।
चन्द्रज्ञानं च बिम्बं च प्रोद्गीतं ललितं तथा।
सिद्धं सन्तानशर्वोक्तं पारमेश्वरमेव च।।
किरणं वातुलं च अष्टाविंशति संख्यया। क्रि.सा. भा.१, पृ. ९

अशा या अठ्ठावीस आगमांपैकी पहिले दहा आगम 'शैवागम' असून अठरा आगमांना 'रुद्रागम' म्हणतात. नीलकंठ शिवाचार्य म्हणतात:-

ताल्वोष्ठपुटनिष्यन्दपूर्वकं शिवभाषिताः।
अष्टाविंशतिसंख्याकाः शिवोक्तास्ते शिवागमाः।। क्रि.सा. भाग १, पृ. ९

अर्थात् हे आगम भ. शंकराच्या तालुओष्ठादी उच्चारस्थानांपासून उत्पन्न झाले, म्हणून ते शिवागम होत.

**वीरशैवदर्शनाचा आधार : आगमप्रमाण**

'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात ज. रेणुकभगवत्पादाचार्यांनी म्हटले आहे:-

शैवतंत्रमिति प्रोक्तं सिद्धान्ताख्यं शिवोदितम्।
सर्ववेदार्थरूपत्वात् प्रामाण्यं वेदवत् सदा।।
वेदधर्माभिधायित्वात् सिद्धान्ताख्यः शिवागमः।
वेदबाह्यविरोधित्वाद्वेदसंमत उच्यते।।

वेदसिद्धान्तयोरैक्यमेकार्थप्रतिपादनात्।
प्रामाण्यं सदृशं ज्ञेयं पंडितैरेतयो: सदा।।
सिद्धान्ताख्ये महातंत्रे कामिकाद्ये शिवोदिते।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम्।। सि.शि. ५.८,१२,१३,१४

हे आगम भ. शिवांनी सांगितल्यामुळे यांना शिवागम किंवा शैवतंत्र म्हणतात. या आगमांत प्रतिपादित विषय वेदान्तप्रतिपादित विषयापेक्षा वेगळा नाही. म्हणून आगमांचे प्रामाण्य वेदतुल्य मानले जाते. यात वेदांमध्ये प्रतिपादन केलेल्या भस्म-लिंग-रुद्राक्षादी धारणांचे प्रतिपादन येते. तसेच वेदबाह्य चार्वाकादी नास्तिक मतांचा विरोध केला असल्याने ते वेदसंमत मानले जातात. वेद आणि सिद्धान्त यांच्या प्रतिपादनात एकात्मता असल्याने दोघांत पंडितांनी अभेद मानला आहे. कामिकागमापासून वातुलागमापर्यंत सर्व आगमांतील उत्तरभागात वीरशैव सिद्धान्ताचे प्रतिपादन येते. 'सर्ववेदेषु यद् दृष्टं तत्सर्वं तु शिवागमे' या 'वीरागमा'तील उक्तीप्रमाणे वेदांमध्ये जे प्रतिपादन केले गेले ते सर्व शिवागमांत असल्याने दोन्ही परंपरा एकात्म होत. श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाच्या मंगलाचरणात 'शिवाय ब्रह्मणे नम:' असे म्हणून वैदिकांचे प्रतिपाद्य ब्रह्म व आगमिकांचे प्रतिपाद्य शिव यांना एकरूप मानून वंदना केली आहे. 'पारमेश्वरागमा'त आगमसंमत षड्दर्शने कोणती याचे स्पष्टीकरण देताना

वीरशैवं वैष्णवं च शाक्तं सौरं विनायकम्।
कापालिकमिति विज्ञेयं दर्शनानि षडेव हि।। पा.आ. १-२२,२३

वरील श्लोकात वीरशैव दर्शनाचा उल्लेख आलेला आहे.

**वीरशैव शब्दाचे स्पष्टीकरण**

वीरशैव हा शब्द एक धर्म या अर्थाने जसा प्रयुक्त होतो तसा एक दर्शन या अर्थानेही प्रयुक्त होतो. म्हणून आचार्यांनी वीरशैव शब्दाचा अर्थ दार्शनिक दृष्टीने लावला आहे. दार्शनिक दृष्टीने विचार केल्यास 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील पाचव्या परिच्छेदातील १५, १६ व १८ क्रमांकांच्या

वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका।
तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तुते मता:।। सि.शि. ५.१६

विद्यायां शिवरूपायां विशेषाद् रमणं यत:।
तस्मादेते महाभागा वीरशैवा इति स्मृता:।। सि.शि. ५.१५
वेदान्तजन्यं यज्ज्ञानं विद्येति परिकीर्त्यते।
विद्यायां रमते तस्यां वीर इत्यभिधीयते।। सि.शि. ५.१८

या श्लोकांतून लक्षात येते की, वीर शब्दाचे दोन भाग आहेत. एक 'वी' व दुसरा 'र'. 'वी' म्हणजे शिव व जीव यांच्या ऐक्याचे प्रतिपादन करणारी विद्या व 'र' म्हणजे रममाण होणारे. अर्थात् शिवजीवाच्या ऐक्याचे प्रतिपादन करणाऱ्या विद्येत रममाण होणारा शिवभक्त म्हणजे वीरशैव. तसेच वेदान्तवाक्यापासून होणारे ज्ञान म्हणजे विद्या. अशा विद्येत रमणारे शिवभक्त हे वीरशैव होत. अर्थात् वेदान्तविद्येत रमणारे वीरशैव होत.

येथे एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती अशी की, विद्या शब्दातील 'वि' ऱ्हस्व आहे आणि वीरशैव शब्दातील 'वी' दीर्घ आहे. 'वी' अदादिगणात ११२३- 'वी गतिव्याप्तिप्रजननकान्त्यसनखादनेषु' गत्यादिक अर्थांचा बोधक धातू आहे आणि पाणिनीय धातुपाठातील 'ये गत्यर्थकास्ते ज्ञानार्थका:' या न्यायाने 'वी' हा गत्यर्थक आणि म्हणून ज्ञानार्थक धातू आहे. अर्थात् 'वी'सुद्धा विद्यावाचक धातू आहे. येथे विद्या म्हणजे ज्ञानविशेष असा अभिप्राय आहे. त्या विद्येत रममाण होणारा शिवभक्त म्हणजे वीरशैव.

**डॉ. एस.एन. दासगुप्ता यांचा आक्षेप व त्याचे समाधान**

भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे सुप्रसिद्ध लेखक डॉ. एस. एन. दासगुप्ता यांनी वीरशैव शब्दाच्या अर्थाविषयी आपल्या Indian Philosophy (Vol. v) या ग्रंथाच्या पृष्ठ ४४-४५ वर जो आक्षेप घेतला आहे त्याचा सारांश असा-

'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात 'वीर' शब्दाची विचित्र व्युत्पत्ती दिलेली असून 'वी' म्हणजे ब्रह्मविद्या आणि 'र' म्हणजे त्या विद्येत रमणारा, असा अर्थ दिलेला आहे. परंतु ही व्युत्पत्ती योग्य नाही. कारण 'वी' अक्षरापासून विद्या असा अर्थ घ्यावयाचा म्हटल्यास 'वि' हवे, ते दीर्घ का आहे, याचे स्पष्टीकरण नाही. या आक्षेपाचे समाधान असे की, दीर्घ 'वी' हासुद्धा मागे सांगितल्याप्रमाणे गत्यर्थक धातू आहे. 'ये गत्यर्थकास्ते ज्ञानार्थका:' या नियमाप्रमाणे गत्यर्थक असलेला 'वी' ज्ञानार्थक म्हणजे विद्यावाचक असू शकतो.

आणखी एक आक्षेप असा की, शिवजीवैक्यबोधिका विद्येत रममाण होणारा शैव हा वीरशैव असे मानले तर काश्मीरशैव किंवा वेदान्ती हेसुद्धा शिवजीवैक्य मानणारे असल्यामुळे वीरशैव ठरतील. अर्थात् अतिव्याप्ती होईल. त्या आक्षेपाचे निराकरणही देता येईल, ते असे- 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या ब्रह्मसूत्राचे वीरशैव सिद्धान्तानुसार लिहिलेल्या श्रीपतिपंडिताराध्यांच्या श्रीकरभाष्यात ब्रह्मजिज्ञासेसाठी अधिकारी कोण याच्या स्पष्टीकरणात म्हटले आहे की, 'लिंगधारणात्मक पाशुपत दीक्षानन्तर्यमित्यथ शब्दार्थो निर्णीयते.' अशा प्रकारे 'अथ' शब्दाचा अर्थ स्पष्ट केला आहे. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या सूत्रात अथ, अत: व अय अशी पदे आहेत. ब्रह्मजिज्ञासा करावी असा अर्थ आहे. पण कशानंतर करावी हे स्पष्ट करावे लागते. म्हणजे ब्रह्मजिज्ञासेचा अधिकारी कोण हे सांगावे लागते. अद्वैतमतात विवेक, वैराग्य, शमदमादी षट्संपत्ती व मुमुक्षुत्व (मुक्त होण्याची तीव्र इच्छा) या चार निकषांनंतर ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार प्राप्त होतो. येथे श्रीपतिपंडिताराध्यांनी सद्गुरूच्या कृपेने लिंग धारण केल्यानंतर ब्रह्मजिज्ञासा करावी, असे लिहिले आहे. लिंगधारण केवळ वीरशैव लोकच करतात. म्हणून येथे अधिकारी लिंगधारण केलेले पाहिजेत. वीरशैवेतरांमध्ये लिंगधारण नसते म्हणून तेथे केवळ विवेक, वैराग्य, शमादिषट्संपत्ती व मुमुक्षुता एवढीच अधिकारासाठी योग्यता सुचविली आहे.

### धार्मिकदृष्ट्या वीरशैव शब्दाचा अर्थ

धार्मिकदृष्टीने वीरशैवांच्या निष्ठेचे स्वरूप येथे महत्त्वाचे आहे. अशा निष्ठावान साधकास वीरशैव म्हणतात. गुरू जेव्हा दीक्षा देतात त्यावेळी इष्टलिंग दिले जाते आणि उपदेश केला जातो.

प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिंगमिदं तव।
कदाचित् कुत्रचिद्वापि न वियोजय देहत:।। सि.शि. ६.२६

अर्थात् इष्टलिंग हे तुझे प्राणलिंग आहे. याचे प्राणासारखे जतन कर. केव्हाही कुठेही याचा वियोग होऊ देऊ नकोस. कदाचित प्रमादाने लिंग खाली पडले तर प्राण सोडावेत. याचा अर्थ असा घ्यायचा की, त्याचे प्राणासारखे जतन कर. हे वीरव्रत आहे. अशा वीरव्रताचे पालन करणे हे वीरशैवत्व होय. 'चंद्रज्ञानागमा'त म्हटले आहे:-

इष्टलिंगवियोगे वा व्रतानां वा परिच्युतौ।
तृणवत्प्राणसंत्याग इति वीरव्रतं मतम्।।
भक्त्युत्साहविशेषोऽपि वीरत्वमिति कथ्यते।
वीरव्रतसमायोगाद् वीरशैवं प्रकीर्तितम्।। चं.आ. १०.३३-३४

वीरशैवाचे वीरशैवत्व काय आहे यासंबंधी 'वीरशैवधर्मशिरोमणी' ग्रंथात षडक्षर मंत्रींनी म्हटले आहे:-

वीरत्वमस्य न धनेन न वा बलेन।
नो कार्यतश्च विहितं दृढशंभुभक्त्या।
वीरस्तुरीय इति शंकरभाषणेन।
श्रीवीरशैवमतगान्न परोऽस्ति कश्चित्।। वी.ध.शि.१.१९

वीरशैवाचे वीरत्व धनमूलक, बलमूलक वा कार्यमूलक नाही तर दृढ शंभुभक्तिमूलक आहे. प्रगाढ भक्तिसंपन्न अशा वीरशैवापेक्षा कुणीच श्रेष्ठ नाही. रणांगणावर योद्धा वीराविष्ट होऊन स्वामिभक्तीने स्वत:ला समर्पित करतो तसा शिवभक्त स्वत:च्या शरीराचा मोह सोडून प्रसंगी प्राण समर्पित करतो. 'क्रियासार' ग्रंथात श्रीनीलकंठ शिवाचार्य म्हणतात:-

विशब्दो वा विकल्पार्थो र शब्दो रहितार्थक:।
विकल्परहितं शैवं वीरशैवं प्रचक्षते।। क्रि.सा. भाग १, पृ. ११

अर्थात् वीरशैव म्हणजे विकल्परहित शैव. 'स्कंदपुराणा'च्या शंकरसंहितेत म्हटले आहे:-

यो हस्तपीठे निजमिष्टलिंगं विन्यस्य तल्लिनमन: प्रचार:।
बाह्यक्रियासंकुल नि:स्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैव:।।

अर्थात् आपल्या करपीठावर तल्लीनतेने इष्टलिंगाची पूजा करतो तो वीरशैव. परिणामस्वरूप तो बाह्य सांसारिक क्रियाकलापांपासून नि:स्पृह होतो. क्रिया-वेधा-मांत्री या दीक्षा घेतलेला वीरशैव इष्टलिंग धारण करणारा शिवभक्त असतो. हे त्याचे वैशिष्ट्य आहे. लौकिक-पारमार्थिक त्याचे वैशिष्ट्य लोकविलक्षण असते. 'वातुलशुद्धतंत्रा'त म्हणूनच म्हटले आहे:-

विशिष्ट इर्यते यस्माद्वीर इत्यभिधीयते।
शिवेन सहसंबंधं शैवमित्यादृतं बुधै:।।

उभयोः संपुटीभावा वीरशैवमिति स्मृतम्।
शिवायार्पितजीवत्वाद् वीरशैवसमुद्भवात्।।
वीरशैव समायोगाद् वीरशैवमिति स्मृतम्।। १०.२७-२९

उपास्य शिव असल्याने तो शैव आहे. ज्याचे प्राप्तव्य विशिष्ट गुणयुक्त आहे. म्हणून लौकिक्क व पारमार्थिक व्यवहारामध्ये सर्वलोकविलक्षण आहे असा वीरशैव आहे.

वीरशैव शब्दासंबंधी श्रीनीलकंठ शिवाचार्यांनी आपल्या 'क्रियासार' ग्रंथात एक विलक्षण व्युत्पत्ती प्रतिपादन केली आहे.

विरोधार्थो विशब्दः स्यात् र शब्दो रहितार्थकः।
विरोधरहितं शैवं वीरशैवं विदुर्बुधाः।। क्रि.सा. भाग १, पृ. ११

अर्थात् 'वि' शब्द विरोधार्थी असून 'र' शब्द रहितार्थी आहे. वीर म्हणजे विरोधरहित असा शैव म्हणजेच वीरशैव.

**वीरशैव-लिंगायत समानार्थी**

वीरशैवांना लिंगायतदेखील म्हणतात. 'लिंगमायतिर्यस्य स लिंगायतः' अशा व्युत्पत्तीप्रमाणे व 'उत्तरः काल आयतिः' या 'अमरकोशा'तील प्रमाणाने 'यस्य जीवनस्य आयतिरुत्तरकालो लिंगमेव' अर्थात् 'लिंगप्रधानं भवति स लिंगायतः इति।' ज्याचा जीवनाचा उत्तरकाल लिंगप्रधान आहे म्हणजे दीक्षेनंतरचा उत्तरकाल लिंगपूजा लिंगध्यान, लिंगार्चन इत्यादी कार्यातच जातो तो लिंगायत, असे तात्पर्य आहे. महर्षी व्यास म्हणतातः-

शैलादेन महाभागा विचित्रा लिंगधारकाः।
शवस्योपरि लिंगं च ध्रियते च पुरातनैः।।
लिंगेन सह पंचत्वं लिंगेन सह जीवितम्। स्कं.पु. के.खं., ७.४१-४२

**वीरशैवांचे प्रभेद**

वीरशैवांचे तीन भेद मानले जातात. सामान्य, विशेष व निराभार अशी त्यांची नावे. 'सूक्ष्मागमा'त

वीतरागादिदोषत्वादात्मतत्त्वविचारणात्।
विकल्पाकल्पशून्यत्वाद्वीरशैवमिति स्मृतम्।।

सामान्यं प्रथमं प्रोक्तं विशेषं च द्वितीयकम्।
निराभारं तृतीयं स्यात् क्रमाल्लक्षणमुच्यते।। ७-२९,३०

श्रीगुरूंनी दिलेल्या इष्टलिंगावर निष्ठा ठेवून गुरु-लिंग-जंगमांविषयीच्या सामान्य नियमांचे पालन करून सेवाव्रत स्वीकारतात, त्यांना 'सामान्य वीरशैव' म्हणतात. वीरशैवागमांत प्रतिपादन केलेल्या इष्टलिंगपूजादी कर्मांच्या पालनाने साधकांचे अंत:करण परिपक्व होते तेव्हा त्या साधकास 'विशेष' असे संबोधिले जाते. लिंगांगानुसंधानात्मक एकशे एक स्थलांचे रहस्य गुरुमुखातून श्रवण करून विशेषरूपाने जाणतो तो 'विशेष वीरशैव' होय. अशा साधकावरील कर्माचे ओझे (कर्मभार) निवृत्त झाल्यावर त्या साधकास 'निराभार' असे संबोधिले जाते. सर्व प्रकारचा अभिमान सोडून नि:स्पृह वृत्तीने जीवन्मुक्तासारखे जीवन जगतो तो निराभार वीरशैव.

**वीरशैव दर्शनशास्त्र**

'दृश्यते स्वात्मरूपेण साक्षात्क्रियते परशिवतत्त्वं येन तद्दर्शनम्.' म्हणजे परशिवतत्त्वाचा साक्षात्कार करून देते त्याला दर्शनशास्त्र म्हणतात. या व्याख्येप्रमाणे वीरशैव हे एक दर्शनशास्त्र आहे. या दर्शनशास्त्रातही मुक्तावस्थेत जीव हा परशिवस्वरूप असतो हे मानण्यात आले आहे. वीरशैवांचे साहित्य विपुल असून त्यात या दर्शनाची अनेक नावे सुचविली आहेत. काही नावांचा व्युत्पत्तिपूर्वक विचार करू.

**विशेषाद्वैत :**

या शब्दाची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे आहे:-

विश्चशेषश्च विशेषौ ईशजीवौ तयो: अद्वैतं विशेषाद्वैतम्।

वि म्हणजे परमात्मा आणि शेष म्हणजे जीव. या दोहोंचे अद्वैत हेच विशेषाद्वैत होय. 'एकाक्षरकोशा'प्रमाणे (विश्चक्षुषि व्योम्नि वाते परमात्मनि पक्षिणि) वि शब्दाचे नेत्र, आकाश, वायू, परमात्मा व पक्षी हे अर्थ होतात. 'वि' म्हणजे परमात्मा. नैघण्टुकामध्ये 'वि' शब्द परमात्मवाचक आहे. 'वात्युत्पादयतीति वि:' या व्युत्पत्तीप्रमाणे वाति- उत्पादयति- उत्पन्न करतो तो 'वि' म्हणून 'वि'ने जगत्कारण सूचित होते. अर्थात् ईश्वरत्व सूचित होते. 'द्वासुपर्णा सयुजा सखाया'

मंत्रात परमात्म्याला पक्षी म्हटले आहे. म्हणून 'वि' म्हणजे परमात्मा व शेष म्हणजे जीव अभिप्रेत आहे. जीव हा परमात्म्याचा अंश मानला आहे. 'ब्रह्मसूत्र श्रीकरभाष्या'त विशेषाद्वैताविषयी एक श्लोक मंगलाचरणात आलेला आहे:-

विशब्देनोच्यते शम्भुर्हंसहंसेति मन्त्रत:।
शेषशब्देन शारीरो यथाग्नेरिति मंत्रत:।
अद्वैतेन भवेद्योगो यथा नद्य इति श्रुते:।। श्री.भा. मंगलश्लोक १६

'हंस हंसेति' मंत्राने 'वि' म्हणजे शिव, 'यथाग्ने' मंत्राने 'शेष' शब्दाने जीव सूचित केला जातो तर 'यथानद्य' मंत्राने दोघांचे अद्वैत सुचविले आहे.

**शक्तिविशिष्टाद्वैत :**

'शक्तिश्च शक्तिश्च शक्ती ताभ्यां विशिष्टौ जीवेशौ तयो: अद्वैतं शक्तिविशिष्टाद्वैतम्।'

जीव हा स्थूलचिदचिद्रूप शक्तिविशिष्टचैतन्य व शिव हा सूक्ष्मचिदचिद्रूप शक्तिविशिष्ट चैतन्य यांचे अद्वैत म्हणजे जीवशिवैक्य होय. जीवाची स्थूल (मलसहित) संकुचित ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती शिवाची सूक्ष्म (निर्मल) विकसित ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती मानली आहे. जीव अल्पज्ञ तर शिव सर्वज्ञ आहे. अल्पत्व नाहीसे करण्यासाठी जीव गुरुकृपेने साधना करतो व शक्तींचा विकास होतो. चरम विकास झाला की, तो शिवरूपच होतो. मग दोघांचे ऐक्य घडते.

जले जलमिवं न्यस्तं वन्हौ वन्हिरिवार्पितम्।
परब्रह्मणि लीनात्मा विभागेन न दृश्यते।। सि.शि. २०.६१

अर्थात् 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या वचनाप्रमाणे जल जलात मिसळावे, अग्नी अग्नीत मिसळावा तसा जीव शिवात मिसळून जातो, ऐक्य होते. हीच जीवाची इतिकर्तव्यता. म्हणून वीरशैव दर्शनशास्त्राला 'शक्तिविशिष्टाद्वैत' नाव दिले आहे.

**शिवाद्वैत :**

'शिवश्च शिवश्च शिवौ तयो: अद्वैतं शिवाद्वैतम्' अशी व्युत्पत्ती दिली आहे. यातील प्रथम शिवपद स्थूलचिदचिद् शक्तिविशिष्ट जीव तर द्वितीय शिवपद सूक्ष्मचिदचिद् शक्तिविशिष्ट शिव असून त्यांचे ऐक्य म्हणजे शिवाद्वैत होय. बद्धावस्थेत जीव परमात्म्यापासून भिन्न असतो तर मुक्तावस्थेत जीव परमात्म्याशी अभिन्न असतो.

**वीरशैवधर्मसंस्थापकाचार्य :**

यदा यदा हि धर्मस्य हानिर्भवति भूतले।
तदा तदावतारोऽयं गणेशस्य महीतले।।

'स्कंदपुराणा'तील या वचनात म्हटले आहे की, जेव्हा जेव्हा धर्माला ग्लानी येते, धर्म क्षीण होतो तेव्हा तेव्हा भ. शिवाच्या पार्श्ववर्ती राहणारे शिवगण धर्मस्थापनेसाठी भूलोकावर अवतार घेऊन धर्म स्थापन करतात.

वीरशैवधर्मसंस्थापक आचार्य संख्येने पाच असल्यामुळे त्यांना 'पंचाचार्य' म्हणतात. भ. शिवाच्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान या पंचमुखांतून हे उत्पन्न होतात. प्रत्येक युगात यांचा अवतार होत असून प्रत्येक युगात त्यांना वेगवेगळी नावे असतात.

कृतयुगात एकाक्षर शिवाचार्य, द्व्यक्षर शिवाचार्य, त्र्यक्षर शिवाचार्य, चतुरक्षर शिवाचार्य व पंचाक्षर शिवाचार्य अशी नावे आहेत.

त्रेतायुगात एकवक्त्र शिवाचार्य, द्विवक्त्र शिवाचार्य, त्रिवक्त्र शिवाचार्य, चतुर्वक्त्र शिवाचार्य व पंचवक्त्र शिवाचार्य अशी नावे आहेत.

द्वापरयुगात रेणुक शिवाचार्य, दारुक शिवाचार्य, घंटाकर्ण शिवाचार्य, धेनुकर्ण शिवाचार्य व विश्वकर्ण शिवाचार्य अशी नावे आहेत.

कलियुगात रेवणाराध्य, मरुळाराध्य, एकोरामाराध्य, पंडिताराध्य व विश्वाराध्य अशी पाच नावे असतात.

एतेषां प्रतिनामानि युगभेदेन च श्रुणु।
एकाक्षरो द्व्यक्षरश्च त्र्यक्षरश्चतुक्षरः।
पंचाक्षरः कृतयुगे पंचनामानि सर्वशः।।
एकवक्त्रो द्विवक्त्रश्च त्रिवक्त्रश्चतुराननः।
पंचवक्त्र इति ख्यातस्त्रेतायां तु महेश्वरि।।
द्वापरे रेणुकश्चेति दारुकश्च द्वितीयकः।
तृतीयः शंकुकर्णश्च चतुर्थो धेनुकर्णकः।
पंचमो विश्वकर्णाख्यः पंचनामानि वै श्रुणु।।
रेवणो मरुळश्चैकोरामः पंडित एव च।
विश्वाराध्य इति प्रोक्तः कलावपि मम प्रिये ।। वी.स.सं. १.३०-३१

कलियुगात झालेल्या पंचाचार्यांचा उद्भव परशिवाच्या पंचमुखस्वरूप प्रसिद्ध अशा पाच लिंगांतून झालेला आहे. त्याचे विवरण पुढीलप्रमाणे-

**१. रेवणाराध्य :**

आंध्र प्रदेशातील कुल्यपाक (कोल्लनुपाक) क्षेत्रातील सोमेश्वर लिंगातून रेवणाराध्यांचा उद्भव झाला. यांनी धर्मप्रचारासाठी कर्नाटकात चिक्कमंगळूर जिल्ह्यातील बाळेहोन्नूर ग्रामी एका पीठाची स्थापना केली. जे पीठ आजही रंभापुरी पीठ नावाने प्रसिद्ध आहे. यांचे गोत्र 'वीर' असून यांनी अगस्त्य महर्षींना 'पडविडी' सूत्राचा उपदेश केला. याची रेणुकशाखा असून हे पीठ वीरसिंहासन म्हणून प्रसिद्ध आहे. या परंपरेचे १२० वे पीठाधीश्वर सध्या श्रीजगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी हे आहेत.

**२. मरुळाराध्य :**

मध्यप्रदेशातील अवन्तिका (उज्जयिनी) नगरीतील वटक्षेत्री असलेल्या सिद्धेश्वर महालिंगातून श्रीमरुळाराध्यांचा उद्भव झाला. काही काळानंतर हे पीठ उज्जयिनीहून कर्नाटकातील बल्लारी जिल्ह्यातील उज्जयिनी येथे स्थलांतरित झाले, ते सध्या सद्धर्मपीठ म्हणून प्रसिद्ध आहे. त्याची शाखा दारुक, गोत्र नंदी असून या आचार्यांनी दधीची मुनीस वृष्टिसूत्राचा उपदेश केला आहे. या पीठाचे जगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी हे आहेत.

**३. एकोरामाराध्य :**

द्राक्षाराम क्षेत्रातील रामनाथ लिंगातून प्रादुर्भूत झालेले एकोरामाराध्य उत्तरांचलातील केदारपीठाधिपती असून त्यांनी स्थापन केलेल्या पीठास वैराग्य सिंहासन म्हणतात. शाखा घंटाकर्ण, भृंगीगोत्र असून या आचार्यांनी लंबनसूत्राचा व्यास महर्षींना उपदेश केला आहे. हे पीठ ऊखीमठ म्हणून प्रसिद्ध आहे. जनमेजय महाराजांनी आपल्या मातापित्यांना शिवलोक प्राप्त व्हावा म्हणून सूर्यग्रहण पर्वकाळी तत्कालीन पीठाधीश्वर आनंदलिंग जंगमाचार्य यांना मंदाकिनी, क्षीरगंगा तथा सरस्वती नद्यांच्या त्रिवेणी संगमावरील मध्यभागी असलेले केदारक्षेत्र दान म्हणून दिले, असा उल्लेख असलेले ताम्रपत्र आजही ऊखीमठात सुरक्षित आहे. ते असे-

स्वस्ति श्रीजयाभ्युदये युधिष्ठिरशके प्लवंगाख्ये एकोननवतिवत्सरे सहसि मासि अमावस्यायां सोमवासरे श्रीमन्तो महाराजाधिराजपरमेश्वरवैयाघ्रपदगोत्रज-

श्रीजनमेजयभूपा इन्द्रप्रस्थनगरीसिंहासनस्था: सकलवर्णाश्रमधर्मपरिपालका उत्तरहिमालये श्रीकेदारक्षेत्रे तत्रत्यमुनिरुषामठस्य श्रीगोस्वामि-आनंदलिंगजंगम: श्रीमच्छिष्यज्ञानलिंगजंगमद्वारा आराधित-श्रीकेदारनाथस्य पूजार्थं चतुस्सीमा-परिमितिक्रम:। पूर्वभागे दक्षिणवाहिनी मन्दाकिनी, पश्चिमदक्षिणभागे क्षीरगंगा, उत्तरपश्चिमे मधुगंगा, पूर्वोत्तरभागे स्वर्गद्वारनदी, दक्षिणे सरस्वतीमन्दाकिन्यो: संगम:। एतन्मध्ये श्रीकेदारक्षेत्रम्। भवच्छिष्यपरम्परया चन्द्रार्कपर्यन्तं निधिनिक्षेपजल-पाषाणा-गामिसिद्धसाद्ध्यतेज: स्वाम्यसहितं स्वबुद्ध्यानुकुल्येनास्मन्मातृपितृणां शिवलोकप्राप्त्यर्थं श्रीकेदारेश्वरसन्निधावुपरागसमये सहिरण्यमन्दाकिनीजलधारा-पूर्वकं क्षेत्रमिदं हस्ते दत्तवानस्मि। एतद्धर्मसाधनस्य साक्षिण:-

आदित्यचन्द्रावनिलोऽनलश्च द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च।
अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये धर्मश्च जानन्ति नरस्य वृत्तम्।।
दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोऽनुपालनम्।
दानात्स्वर्गमवाप्नोति पालनाद्द्विगुणं फलम्।।
स्वदत्ताद् द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालने।
परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत्।।
स्वदत्ता पुत्रिका ज्ञेया पितृदत्ता सहोदरा।
अन्यदत्ता तु जननी दत्तभूमिं परित्यजेत्।।
अन्यैस्तु छर्दितं भुंक्ते स्वार्थैश्च छर्दितं न तु।
तत: कष्टस्ततो नीच: स्वयं दत्तापहारक:।।
स्वदत्तां परदत्तां वा ब्रह्मवृत्तिं हरेच्च य:।
षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते क्रिमि:।।इति।।६।।

अर्थ : श्रीकेदारेश्वरास नमस्कार असो.

स्वस्तिश्री जयाभ्युदय युधिष्ठिर शकाच्या प्लवंग नामक ८९व्या संवत्सरातील सहस मासातील अमावस्या तिथीस सोमवारी श्रीमन्महाराजाधिराज परमेश्वर वैयाघ्रपदगोत्रोत्पन्न श्रीजनमेजय दानदाता नृप आहेत. हे नृप इंद्रप्रस्थ नगरीच्या सिंहासनावर विराजमान असून सकल वर्णाश्रम धर्माचे परिपालक आहेत. दानग्रहणकर्ता गोस्वामी आनंदलिंग जंगम आहेत. ते उत्तर हिमालयातील केदारक्षेत्रातील उषामठाचे मुनी आहेत. शिष्य ज्ञानलिंग जंगमद्वारा आराधित

श्रीकेदारनाथाच्या पूजेप्रीत्यर्थ्य दान दिल्या जाणाऱ्या क्षेत्राची चतु:सीमा अशा प्रकारची आहे. पूर्वभागी दक्षिणवाहिनी मंदाकिनी, पश्चिम–दक्षिण भागात क्षीरगंगा, उत्तर–पश्चिमेकडे मधुगंगा, पूर्वोत्तर भागात स्वर्गद्वारनदी, दक्षिणेकडे सरस्वती व मंदाकिनीचा संगम असून यामध्ये केदारक्षेत्र आहे. चंद्र, सूर्य असेपर्यंत आपल्या शिष्यपरंपरेतील सर्व आचार्यांना या क्षेत्राचे स्वामित्व राहील. हे क्षेत्र राजा जनमेजयांनी आपल्या मातापित्यांना शिवलोक प्राप्त व्हावा म्हणून सुवर्ण व मंदाकिनी जलधारा घेऊन दानाचा संकल्प सूर्यग्रहण पर्वकाळी केला आहे. या उल्लेखात स्पष्ट केले आहे की, सूर्यचंद्र असेपर्यंत निधिनिक्षेप प्रभृती तेज:स्वाम्यसहित केदारक्षेत्र दान दिले आहे. या दानधर्मकर्त्यास साक्षी असलेल्यांचा उल्लेख श्लोकात केलेला आहे, तो पुढीलप्रमाणे:–

सूर्य, चंद्र, वायू, अग्नी, द्युलोक, भूलोक, जल, हृदय, यम, दिवस, दोन्ही संध्याकाल, धर्म हे प्राण्यांच्या शुभाशुभ कर्माचे साक्षी आहेत. दान देणे तसेच दिलेल्या धनाचे सुयोग्य पालन या दोहोंमध्ये दानापेक्षा पालन श्रेयस्कर आहे, कारण दानामुळे स्वर्गप्राप्ती होते तर त्याच्या अनुपालनाने द्विगुणित (दुप्पट) फळ प्राप्त होते. स्वदत्त धनापेक्षा दुप्पट फळ त्याच्या रक्षणामुळे प्राप्त होते, तर दुसऱ्याने दिलेल्या धनाचा अपहार स्वदत्त दानदेखील निष्फळ होत असते. ज्या भूमीचे दान स्वत: केले त्या भूमीला कन्या मानावे. पित्याने दान दिलेली भूमी बहीण मानावी. अन्य कोणी दान दिलेली भूमी माता मानावी. याप्रमाणे प्रदत्त भूमीचा सर्वथा परित्याग करावा, भोग नव्हे. दान दिलेल्या वस्तूचा अपहार करणे अत्यंत नीच कर्म असते. स्वत: दान दिलेल्या किंवा दुसऱ्याने दान दिलेल्या ब्रह्मवृत्तीचे अपहरण करणारा साठ हजार वर्षेपर्यंत विष्ठेतील किडा होऊन दु:ख भोगत असतो.

या दानपत्राच्या आशयावरून उषामठाचा काल पाच हजार वर्षांपेक्षा कमी नाही, असे इतिहासकारांचे म्हणणे आहे. सध्या ३२४ वे पीठाधीश्वर 'रावल' श्रीजगद्गुरू भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी या पीठावर विराजमान आहेत.

**४. पंडिताराध्य :**

आंध्र प्रदेशातील श्रीशैल क्षेत्रातील मल्लिकार्जुन ज्योतिर्लिंगातून श्रीपंडिताराध्यांचा

उद्भव झाला. याच क्षेत्री त्यांनी सूर्यसिंहासनाची स्थापना केली. त्यांनी मुक्तागुच्छ सूत्राचा उपदेश सानंद महर्षींना केला असून त्यांची शाखा धेनुकर्ण, गोत्र वृषभ मानले जाते. सध्या या पीठावर जगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी विराजमान आहेत.

**५. विश्वाराध्य :**

काशीक्षेत्री विश्वनाथ ज्योतिर्लिंगातून विश्वाराध्यांचा उद्भव झाला असून काशीक्षेत्रीच त्यांनी ज्ञानसिंहासनाची स्थापना केली. गोत्र स्कंद, शाखा विश्वकर्ण मानली जाते. यांनी दुर्वास ऋषींना पंचवर्णसूत्राचा उपदेश केला. या पीठास 'जंगमवाडी मठ' असे म्हणतात. या पीठास काशीनरेश जयनंददेव यांनी दिलेल्या दानपत्रावरून याची प्राचीनता १००४ वर्षे मानली जाते, असा इतिहासकारांचा अभिप्राय आहे. या दानपत्राचा संस्कृत अनुवाद पुढीलप्रमाणे आहे-

।।श्रीगणेशाय नमः।।

श्रीविश्वेश्वरः

स्वस्ति श्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजजयनन्ददेवकाशीनरेशादेशात् श्रीविश्वाराध्य-सिंहासनस्य मल्लिकार्जुनजंगमशिवयोगिभ्यः प्रदत्तमिदं भूदानशासनम्। कर्दमेश्वर-महादेवगंगानद्योर्मध्ये गोसंचरद्वनमध्ये शिवप्रीत्यर्थं प्रदत्तम्। भूमेश्चतुर्दिक्प्रमाणं पूर्वपश्चिमदिशोः अष्टशतपरग (८००) परिमाणं, उत्तरदक्षिणदिशोः अष्टशतपरग (८००) परिमाणम्। एतत्परिमाणयुतभूमौ यदुत्पद्यते, तत्सर्वं मल्लिकार्जुन-जंगमसाम्प्रदायिकाः सर्वदाऽनुभवन्तु। एतद्भूमौ यः पातयेन्मन्ददृष्टिं सोऽवश्यं नश्येत्।

स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत्पृथिवीमिमाम्।<br>
षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते कृमिः।।१।।<br>
आदित्यचन्द्रावनिलोऽनलश्च द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च।<br>
अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये धर्मश्च जानन्ति नरस्य वृत्तम्।।२।।<br>
दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोऽनुपालनम्।<br>
दानात् स्वर्गमवाप्नोति पालनादद्भुतं पदम्।।३।।<br>
स्वदत्ताद् द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनम्।<br>
परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत्।।४।।

विक्रमाब्दीयैकत्रिंशदधिकषट्शत (६३१) संख्यान्वितकार्तिकशुद्ध-देवोत्थानैकादश्यां तिथौ (११)।

एकत्रिंशदधिकषट्शतसंख्यायुताब्दे (६३१) जयनन्दनदेवकाशीनरेशेन दत्तदानशासनस्याविकलप्रतिलिपिरियं वर्तते। अस्माभिरवलोकितं शासनम्। तदतिजीर्णीभूतमित्येतत्ताम्रफलके लिखितम्। द्व्यशीत्यधिकैकोनविंशतिशत-(१९८२)

संख्यान्विताब्दाषाढशुद्धाष्टम्यां (८) तिथौ लिखितमिदम् 'प्रभुनारायणसिंहः काशीराजः।' इति।

हे दानपत्र संवत् ६३१ मधील कार्तिक शु. ११ या दिवशी लिहिले गेले. याची मूळ प्रत सुरक्षित असून जयनंददेव नरेशांचे वंशज प्रभुनारायणसिंह यांनी आम्ही आमच्या पूर्वजांनी दिलेले दानपत्र पाहिले असून ते अत्यंत जीर्ण झालेले आहे. म्हणून त्याचा उल्लेख आषाढ शु. अष्टमीला ताम्रपत्रावर केला आहे. खाली प्रभुनारायणसिंह यांची स्वाक्षरी आहे. ही ताम्रपत्रावरील प्रतही जंगमवाडी मठात उपलब्ध आहे. याव्यतिरिक्त हुमायून, अकबर, जहाँगीर, औरंगजेब इत्यादी यवनराजांनीही दिलेली दानपत्रे मठात उपलब्ध आहेत. सध्या या पीठावर ८६ वे जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी हे विराजमान आहेत.

या जंगमवाडी मठाची शाखा नेपाळ देशातील भक्तपूर (भातगाँव) येथे आहे. नेपाळ नरेशांनी सं. ६९२ मध्ये दिलेले भूमिदानविषयक शिलाशासन अद्याप मठात आहे. रेवणाराध्य, मरुळाराध्य, एकोरामाराध्य, पण्डिताराध्य, विश्वाराध्य नावाच्या आचार्यांना 'पंचाचार्य' म्हणतात. यांनीच वीरशैवमताची स्थापना केली. हे वीरमाहेश्वर (जंगम) वंशोत्पन्न असतात. त्यांनाच परंपरागत पीठाचार्यांचा पट्टाभिषेक होतो. या महाचार्यांना 'जगद्गुरू' असे म्हणतात. कर्नाटक, आंध्र या प्रदेशांतील गावोगावी वीरशैव मठ आहेत. त्यापैकी प्रत्येक मठ वरील पाचांपैकी एकाचे शाखा-सूत्र-गोत्राचे अनुयायी असतात.

**श्रीबसवेश्वर हे धर्मसंस्थापक असल्याचा भ्रमनिरास :**

असे म्हटले जाते की, बाराव्या शतकातील चालुक्य वंशाच्या बिज्जलराजाचे प्रधानमंत्री असलेल्या बसवेश्वर नावाच्या महापुरुषाने वीरशैवमताची संस्थापना केली; परंतु ते योग्य नाही. ब्राह्मण वंशात जन्मलेल्या बसवेश्वर यांनी ब्राह्मणकुलात

चालत आलेला उपनयन संस्कार सोडून श्रीकूडलसंगमक्षेत्राधिपती जातवेदमुनी नावाच्या वीरशैवाचार्यांकडून वीरशैवधर्मात प्रचलित असलेली इष्टलिंगदीक्षा घेतली, असे त्यांच्या चरित्रावरून समजते. श्रीबसवेश्वरांनी वीरशैवधर्माची दीक्षा घेतली म्हणजे वीरशैवधर्म बसवेश्वरांपेक्षा प्राचीन आहे हे सहज कळण्यासारखे आहे.

असे मात्र निश्चित म्हणता येईल की, वीरशैवधर्माची दीक्षा घेतलेल्या बसवेश्वरांनी या धर्माचे पुनरुज्जीवन केले. जसे अद्वैतवेदान्तशास्त्राचा भगवत्पाद शंकराचार्यांनी प्रचार केल्यामुळे श्रीशंकराचार्य अद्वैतमतस्थापनाचार्य मानले जातात, तसे बसवेश्वरापासून वीरशैवधर्माचा प्रचार अधिक झाल्याने त्यांना धर्मसंस्थापक म्हणत असावेत. परंतु त्यांना धर्माचे संस्थापक म्हणणे योग्य नाही.

आधुनिक इतिहासकार व दार्शनिक श्रीबसवेश्वर हे धर्मप्रचारकच होते, संस्थापक नव्हते असेच प्रतिपादन करतात. डॉ. कांतिचंद्र पांडेय महोदय म्हणतात की, वीरशैव लोक बसवेश्वरांना धर्मप्रचारक मानतात, धर्मसंस्थापक मानत नाहीत. हेच मत योग्य वाटते.

राजशेखर आपल्या 'षड्दर्शनसमुच्चया'मध्ये म्हणतात की, काही शैवमतानुयायी प्राणलिंगधारण करतात. श्रीपतिपंडिताराध्यांनी 'श्रीकरभाष्या'त म्हटले की, 'सदानंदोपनिषदा'तील सामजैगीषीय शाखेत प्राणलिंगधारण करण्याचा विधी सांगितलेला आहे. वीरशैवात रेणुक, दारुक, एकोराम, पंडिताराध्य व विश्वाराध्य आचार्य असून त्यामुळेच हे पंचाचार्यमत असल्याचे प्रसिद्ध आहे. डॉ. यदुवंशी यांचे म्हणणे असे आहे की, दक्षिणेत एका नवीन संप्रदायासच पुढे वीरशैव किंवा लिंगायत म्हणतात. या संप्रदायाचे संस्थापक कोण हे विवादास्पद असले तरी बसवेश्वर मात्र या संप्रदायाचे संस्थापक मुळीच नव्हते. त्यांनी याचा प्रचार केला म्हणून ते संस्थापक नव्हतेच.

श्री. के.ए. नीलकंठशास्त्री यांनी म्हटले आहे की, Lingayat tradition avers that the sect is very old and founded by five asceties Ekoram, Panditaradya, Revana, Marula and Vishwaradhya who were held to have sprung them the five heads of Shiva. Basava, they say was but the reviver of the faith.

अर्थात् वीरशैवमत प्राचीन असून याचे संस्थापक एकोराम, पंडिताराध्य,

रेवण, मरुळ व विश्वाराध्य हे होत. या पाच आचार्यांची उत्पत्ती भ. शिवाच्या पाच मुखांपासून झाली होती. श्रीबसवेश्वरांनी या मताचे पुनरुज्जीवन केले.

डॉ. नंदिमठ हे इंग्रजीत Hand book of veershaivism या ग्रंथात म्हणतात की, डॉ. भांडारकरांशिवाय बहुतेक सर्व संशोधकांनी मान्य केले आहे की, कलचूरी बिज्जल राजाचे प्रधानमंत्री बसवेश्वर यांनी वीरशैवधर्माची स्थापना केली नाही. कन्नड तसेच वीरशैव भाषेतील ग्रंथांत असा उल्लेख नाही की, बसवेश्वर वीरशैवधर्माचे संस्थापक होते. याप्रमाणे डॉ. नंदिमठांनी बसवेश्वर धर्मसंस्थापक असल्याच्या मताचे निराकरण केले आहे.

प्रसिद्ध इतिहासकार मि.इ. थर्स्टन यांनी वीरशैव मतासंबंधी इंग्रजीत आपले मत प्रतिपादन केले आहे. त्यानुसार वीरशैव पंचगोत्रांचे प्रवर्तक अशा पाच आचार्यांनी भारतातील विभिन्न प्रदेशांत पाच महामठांची स्थापना केली आहे. त्यापैकी आचार्य एकोरामांनी हिमाचलातील केदार क्षेत्री, विश्वाचार्यांनी काशी क्षेत्री, मरुळाचार्यांनी उज्जयिनी क्षेत्री, पंडिताचार्यांनी श्रीशैल क्षेत्री तसेच रेणुकाचार्यांनी मैसूर प्रदेशातील बाळेहोन्नूर क्षेत्री मठस्थापना केली. हे पाच मठ आजही विद्यमान आहेत. अशा प्रकारे वीरशैवांच्या पंचपीठांची प्राचीनता सिद्ध केली आहे.

डॉ. जे. एन. फर्क्युहर यांनी वीरशैव मतासंबंधी केलेल्या इंग्रजी समीक्षणात म्हटले आहे की, प्रत्येक युगात भ. शिवाच्या पंचमुखांतून उद्भूत झालेल्या एकोरामादी पाच यती आचार्यांनी वीरशैवधर्माची प्रतिष्ठापना केली आहे. बसवेश्वर तर फक्त पुनरुज्जीवक आहेत. डॉ. फर्क्युहर यांनी अशाप्रकारे वीरशैवधर्माचे संस्थापक पंचाचार्य आहेत, या मताचे समर्थन केले आहे.

अशाप्रकारे वीरशैवधर्माची स्थापना पंचाचार्यांनी केली असून बसवेश्वरांनी या धर्माचे पुनरुज्जीवन केले आहे, हे इतिहासकारांच्या मताप्रमाणे सिद्ध झाले आहे. यासंबंधी कलियुगातील व्यास अशी ख्याती असलेल्या रायचूर चंद्रशेखरशास्त्रींनी विस्तृत रूपाने विवेचन केले आहे. त्यांच्या कन्नड भाषेतील ग्रंथाचे नाव 'जगद्गुरू पंचाचार्यरि वीरशैवमतस्थापकरु' हे आहे.

**वीरशैव साहित्य व त्याचे प्रणेते**

सिद्धान्ताख्ये महातन्त्रे कामिकाद्ये शिवोदिते।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम्।। सि.शि. ५-१४

अर्थात् कामिकागमापासून वातुलागमापर्यंत असलेले अठ्ठावीस आगम भ. शंकरांनी सांगितले असून त्यांना सिद्धान्तागम असे म्हणतात. त्या आगमांच्या उत्तर भागामध्ये वीरशैवमताचे विवेचन केलेले आढळते, असे आचार्य रेणुक भगवत्पादांनी सांगितले आहे. त्याच अनुरोधाने पुढे वीरशैव साहित्याची रचना केली, असे मानले जाते. श्रीपतिपंडिताराध्य यांनी ब्रह्मसूत्रावर केलेले 'श्रीकरभाष्य' नावाचे भाष्य आहे. त्यावरून असे समजते की, मतसंस्थापक पाच आचार्यांपैकी रेवणसिद्ध, मरुळसिद्ध व एकोरामभगवत्पाद या तीन आचार्यांनी ब्रह्मसूत्र, वेद व उपनिषदांवर वीरशैवपर भाष्ये लिहिली. परंतु आज ती उपलब्ध नाहीत.

**अगस्त्यमुनी :**

श्रीपति पंडिताराध्यप्रणीत 'श्रीकरभाष्या'त असा उल्लेख आला आहे:-

अगस्त्यमुनिचंद्रेण कृतां वैयासिकीं शुभाम्।
सूत्रवृत्तिं समालोक्य कृतं भाष्यं शिवंकरम्।।

(श्री.भा.मंगलाचरण, श्लोक १७)

ज्या अगस्त्य ऋषींनी भगवत्पादाचार्य ज. रेणुकाचार्यांकडून 'श्रीसिद्धान्त-शिखामणी'च्या रूपात जो उपदेश श्रवण केला त्याच्याद्वारा अगस्त्यांनी 'ब्रह्मसूत्रवृत्ती' नावाचा ब्रह्मसूत्रावरील भाष्यग्रंथ लिहिला. पण तो पाहण्यात नाही. कुंभकोण नगरीत त्याची एक प्रत असल्याचे समजते. वीरशैवांच्या संस्कृत ग्रंथात ब्रह्मसूत्रवृत्तीचा उल्लेख महत्त्वाचा मानावा लागेल.

**शिवयोगी शिवाचार्य :**

शिवयोगी शिवाचार्यांनी इ.स. आठव्या शतकात शैवागमावर आधारित 'श्रीसिद्धान्तशिखामणी' नावाच्या पद्यात्मक ग्रंथाची रचना केली. हा ग्रंथ प्राचीन आणि प्रामाणिक आहे. रेणुकाचार्यांनी अगस्त्य महर्षींस जो उपदेश केला त्याचा काळ रामायणकाळ असावा, कारण त्यात रेणुकाचार्यांनी श्रीलंकेत जाऊन तत्कालीन लंकेश विभीषणाकडून तीन कोटी लिंगांची स्थापना करविली. हा उपदेश एवढा प्राचीन असला तरी हजारो वर्षे तो उपदेश गुरुशिष्यपरंपरेने मौखिक रूपाने जिवंत ठेवला. हा उपदेश आठव्या शतकात झालेल्या शिवयोगी शिवाचार्यांनी एकवीस परिच्छेदांत विभागून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' नावाचा ग्रंथ पद्यरूपात निर्माण केला. यात एकूण एकशे एक स्थले आहेत. मलत्रयांनी बद्ध जीव आत्मशक्तीचा विकास

करीत गुरूपदेशाने शिवत्व प्राप्त करतो. त्याच्या प्रगतीचा सोपान म्हणजे एकशे एक स्थले. भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्य ही सहा प्रमुख स्थले. ही सहा अंगस्थले व सहा लिंगस्थले अशी दोन प्रकारची होतात. सहा अंगस्थलाचे उपप्रकार असे आहेत–

भक्त– १५, माहेश्वर– ९, प्रसादी– ७, प्राणलिंगी– ५, शरण– ४, ऐक्य– ४ असे एकूण ४४ होतात. लिंगस्थलातील सहा भेदांचे उपभेद असे– भक्त– ९, माहेश्वर– ९, प्रसादी– ९, प्राणलिंगी– ९, शरण– १२ व ऐक्य– ९ असे एकूण ५७ होतात. अंगस्थलातील ४४ व लिंगस्थलातील ५७ मिळून एकशे एक स्थले होतात. या ग्रंथावर मरितोंटदार्यांची 'तत्त्वप्रदीपिका व्याख्या' नावाची टीका आहे.

हा ग्रंथ वारद ग्रंथमालेतून इ.स. १९०५ मध्ये प्रकाशित झाला. त्यानंतर प.पू. काशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी संपादन करून त्यास विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. डॉ. चंद्रशेखर कपाळे, डॉ. शे.दे. पसारकर, पं. शरणय्या अचलेरी यांनी मराठी अनुवाद केला आहे. दुसऱ्या प्रतीमध्ये डॉ. कपाळे यांनी अन्वयासह अर्थ लिहिला आहे.

**नीलकंठ शिवाचार्य :**

नीलकंठ शिवाचार्य नावाचे दोन आचार्य होऊन गेले. एक, ब्रह्मसूत्रावरील भाष्य लिहिणारे हे आद्य शंकराचार्यांचे समकालीन तर दुसरे, नीलकंठ शिवाचार्य हे 'क्रियासार' नावाच्या तीन भागात कारिकारूपाने ब्रह्मसूत्र भाष्यासहित अनेक विषयांचे स्पष्टीकरण देणारे. ते म्हणतात:–

मयापि तस्य तात्पर्यं श्रोतृणां सुखबुद्धये।
कारिकारूपतः सर्वं क्रमेणैव निबध्यते।। क्रि.सा. १.३३

त्यांच्या रचनेवरून त्यांचा काल चौदावे शतक असावा.

**श्रीपतिपंडिताराध्य :**

हे इ.स. अकराव्या शतकात होऊन गेले. त्यांनी ब्रह्मसूत्रावर 'श्रीकरभाष्य' नावाचे भाष्य लिहिले आहे. हा ग्रंथ १९७७–७८ साली प्राच्यविद्या संशोधनालयद्वारा दोन खंडांत प्रकाशित झाला. त्यात वीरशैवात अप्रचलित शिखासूत्र, एकादशी व्रताचा उल्लेख येतो. ते स्वत:ला वीरशैव मानतात.

**मायिदेव :**

हे पंधराव्या शतकतील श्रेष्ठ साहित्यिक होत. त्यांचा 'अनुभवसूत्र' नावाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. तो वातुलतंत्रावर आधारित आहे. यांच्या 'विशेषार्थप्रकाशिका' नामक ग्रंथास अनुभवसूत्राचा उत्तरार्ध मानले जाते. या व्यतिरिक्त वीरशैवोत्कर्ष, शतकत्रयम्, इ. ग्रंथ आहेत.

**नंदिकेश्वर :**

पंधराव्या शतकात झालेल्या नंदिकेश्वरांच्या नावावर 'लिंगधारणचंद्रिका' नावाचा महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. यात वैदिक मंत्राच्या आधारे इष्टलिंगधारणेचे प्रतिपादन केले आहे. या ग्रंथावर शिवकुमार मिश्र नावाच्या वीरशैवेतर विद्वानाची 'शरद्' नावाची संस्कृत टीका उपलब्ध आहे. काशी जंगमवाडी मठातर्फे या ग्रंथाचे प्रकाशन १९०५ मध्ये काशीजगद्‌गुरू राजेश्वर महास्वामींनी केले. इ.स. १९८८ मध्ये प्रा. व्रजवल्लभ द्विवेदींनी भाषानुवादासह संपादन करून शैवभारती भवनातर्फे प्रकाशित केले.

**स्वप्रभानंद शिवाचार्य :**

'शिवाद्वैतमंजरी' नावाच्या ग्रंथाचे कर्ते स्वप्रभानंद शिवाचार्य काश्मीरनिवासी होते. यात पहिल्यांदा द्वैतमताचे खंडन केले असून शिवाद्वैत सिद्धान्ताचे मंडन केले आहे. १७ व्या शतकात झालेल्या या आचार्यांनी लिहिलेल्या ग्रंथाचे संपादन ज. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी १९८६ मध्ये करून जंगमवाडी मठातर्फे प्रकाशन केले आहे.

**मरितोंटदार्य :**

सतराव्या शतकात झालेल्या या विद्वान पंडितांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर 'तत्त्वप्रदीपिका' नावाची टीका लिहिली आहे. यांचा 'श्रीसिद्धान्तशिखामणी' (सटीक) वारद ग्रंथमालेने १९०५ मध्ये प्रकाशित केला. या व्यतिरिक्त 'वीरशैवानंद चंद्रिका' नावाचा स्वतंत्र ग्रंथ निर्माण केला. यात क्रिया, वाद व कथा अशी त्रिकांडात्मक मांडणी केलेली आहे. वादकांडात चार्वाक, बौद्ध, जैन, मीमांसक, सांख्य, शाक्त, गौतमीय, योग, शंकर, रामानुज, मध्व यांचे निराकरण केले आहे व वीरशैवमतोत्कर्ष संवादरूपात सिद्ध केला. 'कैवल्यसार' नावाचा ग्रंथही त्यांच्या नावावर आहे.

**केळदीबसव भूपाल :**

सतराव्या शतकातील कर्नाटकातील केळदी संस्थानचे राजे होते. ते साहित्य व धर्मप्रेमी विद्वान होते. त्यांनी 'शिवतत्त्वरत्नाकर' नावाचा ग्रंथ लिहिला. या व्यतिरिक्त 'सुभाषितसुरद्रुम' व 'सूक्तिसुधाकर' हे दोन ग्रंथही लिहिले. यातील सूक्तिसुधाकर उपलब्ध नाही. सुभाषितसुरद्रुम मैसूर प्राच्यविद्या संशोधनालय ग्रंथालयात उपलब्ध असून त्याचे प्रकाशन झाले नाही. शिवतत्त्वरत्नाकर या ग्रंथाचे १९२७ मध्ये बी. रामराव व पी. सुंदरशास्त्री यांनी मद्रास येथे प्रकाशन केले. त्यानंतर मैसूर विश्वविद्यालयाच्या प्राच्यविद्या संशोधनालयातर्फे १९६४ मध्ये प्रथम भाग, १९६९ मध्ये द्वितीय भाग व १९८८ मध्ये तृतीय भाग क्रमाक्रमाने प्रकाशित झाले.

**उमचिगीशंकरशास्त्री :**

धर्मरत्न पदवीविभूषित शंकरशास्त्रींनी ईश, केन, मुंडक व सिद्धान्तशिखोपनिषद या उपनिषद ग्रंथांवर संस्कृत टीका लिहिल्या आहेत. याशिवाय व्यासविरचित ब्रह्मसूत्रावर 'ब्रह्मसूत्रवृत्ती' नावाची विद्वत्तापूर्ण टीका लिहिली आहे. हे सर्व ग्रंथ मैसूर येथील श्रीशंकरविलास संस्कृत पाठशालाध्यक्ष श्रीमदुज्जयिनी सद्धर्मसिंहासनाध्यक्ष ज. मरुळाराध्य शिवाचार्य महास्वामींनी प्रकाशित केले आहेत.

वीरशैव दर्शनशास्त्रावर आजपर्यंत लिहिल्या गेलेल्या संस्कृत ग्रंथ, त्यांचे कर्ते व रचनाकाल पुढीलप्रमाणे आहे.

**अ.क्र. / ग्रंथनाम / ग्रंथकर्ता / लेखनकाल**

१. अमृतेश्वरभाष्यम् / सर्वेश्वरयती / इ.स. १६००
२. अनादिवीरशैवसारसंग्रह / गुलुरुसिद्धवीरणाचार्य / इ.स. १६००
३. आनंदगीता / मल्लिकार्जुनपंडिताराध्य / इ.स. ११३०
४. एकोत्तरशतस्थली / जक्कणार्यः / इ.स. ..
५. कविकर्णरसायन / यत्नंदू षडक्षरकविः / इ.स. १६६५
६. कामिकाद्यष्टाविंशत्यागम-वृत्तयो दीपिकाश्च / सकलागमाचार्य / इ.स. ११५०
७. कैवल्योपनिषत्सादाशिवभाष्यम् / सदाशिवशिवाचार्य / इ.स. १९४८
८. कैवल्यसारः / मरितोंटदार्यः / इ.स. १६६०
९. चन्नबसवपुराणम् / कुमारस्वामिशास्त्री / ..
१०. चोल-रेणुकसंवादः (शिवाधिक्यशिखामणिः) / सोसलेरेवणाराध्यः / १६६०

११. ज्ञानशतकम् / सर्पभूषणशिवयोगी
१२. नंदिकेश्वरकारिका / नंदिकेश्वरशिवाचार्य
१३. नीलकंठभाष्यम् (ब्रह्मसूत्रस्य) / नीलकंठशिवाचार्यः / इ.स. ८००
१४. पंडिताराध्यचरितम् / गुरुराजकविः
१५. प्रश्नरेणुकम् (हस्तलेखः) / रुद्रमुनीश्वरः
१६. बसवराजीयम् / पाल्कुरिकेसोमनाथः / इ.स. ११८०
१७. बसवेशविजयम् / कंचिशंकराराध्यः
१८. भक्ताधिक्यरत्नावलिः /षडक्षरदेवः / इ.स. १६६५
१९. भगवद्गीतावीरशैवभाष्यम् / टी.जी. सिद्धप्पाराध्यः / इ.स. १९६६
२०. भीमेश्वरगद्यम् / मल्लिकार्जुनपंडिताराध्यः / इ.स. ११३०
२१. महानारायणोपनिषद्भाष्यम् / वृषभपंडिताराध्यः / इ.स. १४००
२२. माचिदेवमनोविलासः / बसवलिंगशिवयोगी
२३. रेणुकचंपूः / ईशानशिवगुरुः / इ.स. ९५०
२४. रेणुकविजयचंपूः / सिद्धनाथशिवाचार्यः / इ.स. ९६०
२५. रेवणसिद्धचरितम् / ईशानशिवगुरुः / इ.स. ९५०
२६. लिंगराजीयः / लिंगराजः (कोडगुनृपः) / इ.स. १८००
२७. लिंगोद्भवकाव्यम् / मल्लिकार्जुनपंडितराध्यः / इ.स. ११३०
२८. वातुलोत्तरव्याख्यानम् / गुब्बिमल्लणार्यः / इ.स. ११३०
२९. वीरमाहेश्वराचारसंग्रहः / नीलकंठनागनाथाचार्यः / इ.स. १३००
३०. वीरमाहेश्वराचारसारोद्धारः / लक्ष्मीधराराध्यः
३१. वीरशैवधर्मशिरोमणिः / षडक्षरमंत्री / इ.स. १७००
३२. वीरशैवप्रदीपिका / मरितोंटदार्यः / इ.स. १६६०
३३. वीरशैवविलासः / पादपूजाबसवलिंगदेशिकेंद्रः
३४. वीरशैवसदाचारसंग्रहः / श्रीनागनाथाचार्यः
३५. वीरशिवान्वयचंद्रिका / आराध्यवीरेशशास्त्री
३६. वीरशैवाचारकौस्तुभः / मौनप्पपंडितः / इ.स. १७००
३७. वीरशैवाचारप्रदीपिका / गुरुदेवकविः
३८. वीरशैवाचारसुधानिधिः / गुरुबसवः / इ.स. १७००

३९. वीरशैवाष्टावरणप्रमाणाष्टकाभरणम् / इवटूरिनंदिकेश्वरशास्त्री
४०. वीरशैवेंदुशेखरः / पंडितसदाशिवशास्त्री / इ.स. १९२०
४१. वीरशैवोत्कर्षसंग्रहः / पी.आर. करिबसवशास्त्री / इ.स. १९०८
४२. वीरभद्रदंडकम् / षडक्षरदेवः / इ.स. १६६५
४३. विवेकचिंतामणिः / लिंगराजः (कोडगुनृपः) / इ.स. १८००
४४. वीरशैवोत्कर्षप्रदीपिका / चन्नबसवदेशिकः
४५. वेदान्तसारवीरशैवचिंतामणिः / निड्डूरिनंजणाचार्यः
४६. श्वेताश्वतरोपनिषद्वीरशैवभाष्यम् (प्रबंधः) / टी.जी.सिद्धप्पाराध्यः / १९६५
४७. शक्तिविशिष्टाद्वैतदर्शनम् (शोधप्रबंधः) / टी. जी. सिद्धप्पाराध्यः / १९६५
४८. शंकरगीता / मल्लिकार्जुनपंडिताराध्यः / इ.स. ११३०
४९. शरणगीता (कन्नडवचनानां पद्यानुवादः) / टी. जी. सिद्धप्पाराध्यः / १९६६
५०. शिवाधिक्यरत्नाकरः /केलदीबसवभूपालः / १६००
५१. शिवाधिक्यरत्नावलिः / षडक्षरदेवः / इ.स. १६६५
५२. शिवाद्वैतपरिभाषा / हूलीनीलकंठशिवाचार्यः / इ.स. १९२०
५३. शिवाद्वैतदर्पणः / शिवानुभवशिवाचार्यः
५४. शिवपंचस्तवव्याख्या / विश्वाराध्यपंडितः
५५. शिवपंचविंशतिलीलाशीः शतकम् (हस्तलेखः)/ श्रीकाशीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्याः / इ.स. १९४५
५६. शिवप्रसंगरत्नाकरः / वृषभलिंगशिवयोगी
५७. शिवमंत्रोपविधिः (संग्रहात्मकः) / मूरुसावीरमठगंगाधरस्वामी / इ.स. १९२१
५८. शिवयोगप्रदीपिका / चन्नसदाशिवयोगी
५९. शिवलिंगसूर्योदयः (वीरशैवधर्मबोधनाटकम्) / मल्लणाराध्यः
६०. शिवज्ञानदीपिका / मल्लार्यगुरुः / इ.स. १२००
६१. शिवसहस्रनामभाष्यम् / संगमेश्वरयतिः / इ.स. १७८०
६२. शिवज्ञानप्रदीपिका / विश्वनाथाचार्यः
६३. शिवज्ञानबोधः / शिवयोगीन्द्रज्ञानशिवाचार्यः
६४. शिवज्ञानभाष्यम् / शिवयोगीन्द्रज्ञानशिवाचार्यः
६५. शिवज्ञानसमुच्चयः / जक्षराराध्यनागेशगुरुः / इ.स. १२००

६६. शैवरत्नाकर: / श्रीमज्ज्योतिर्नाथ: / इ.स. ११००
६७. श्रीबसवोदाहरणम् / पाल्कुरिकिसोमनाथ: / इ.स. ११८०
६८. श्रुतिसारभाष्यम् / श्रीशिवपूजालिंगशिवयोगींद्र: / इ.स. १७४५
६९. सव्याख्या पंचश्लोकी / श्रीमत्केलदीबसवसुमतीवास:
७०. सानंदचरितम् / पद्मराज: (केरेयपद्मरस:) / इ.स. ११८०
७१. सारोद्धार: / लक्ष्मीदेवगुरु: / इ.स. १२००
७२. सिद्धान्तसारावलि: / त्रिलोचनशिवाचार्य
७३. सिद्धार्थबोधिनी (सिद्धान्तशिखामणे: कन्नडटीका) / सोसलेरेवणाराध्य: इ.स. १६६०
७४. स्तवनमंजरी / अभिनवकालिदासो बसवशास्त्री
७५. हरलीला / उद्भटाराध्य: / इ.स. १०२०

❑❑

दुसरा परिच्छेद

# 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाचा परिचय

प्रस्तुत शोधप्रबंधामध्ये 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथातील दार्शनिक सिद्धान्ताची समीक्षा करावयाची आहे. जिज्ञासू अभ्यासकांच्या मनामध्ये अनेक प्रश्न उत्पन्न होतात. हा 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ कोणता? यातील दार्शनिक तत्त्वज्ञान काय आहे? प्रतिपाद्य विषय किंवा सिद्धान्त कोणता आहे? इत्यादी. या परिच्छेदात सर्व संभाव्य प्रश्नांची उत्तरे सप्रमाण प्रस्तुत करण्याचा यथामती प्रयत्न केलेला आहे.

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा वीरशैवधर्म व दर्शन यांचे सिद्धान्त प्रतिपादन करणारा प्रमुख व प्रमाण ग्रंथ आहे. वेदान्तप्रस्थानत्रयीमधील संपूर्ण उपनिषदांचे सार असलेली 'गीता' भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनास उपदेशिली व हाच उपदेश पुन्हा कृष्णार्जुनसंवादरूपाने महर्षी व्यासांनी ग्रंथबद्ध केला. अगदी याचप्रकारे कामिकादिवातुलान्त शैवागमांचे सार असलेला वीरशैवसिद्धान्तसुद्धा भगवत्पादपूज्य श्रीरेणुकाचार्यांनी मुनिश्रेष्ठ अगस्त्य यांना उपदेशिला. हा उपदेश शिवयोगी शिवाचार्य यांनी संकलित व संपादित केला. याविषयी श्रीमरितोण्टदार्य म्हणतात:-

रेणुकागस्त्यसंवादं निगमागमविश्रुतम्।
प्रदीपयति गुप्तार्थमुद्धृत्य शिवयोगिराट्।। सि.शि. भाग १, पृ. १

निगम आणि आगम या दोन्ही ज्ञानशाखांमध्ये प्रसिद्ध रेणुक व अगस्त्य यांचा संवाद व त्यातील गूढ रहस्य शिवयोगी यांनी प्रकट केले आहे.

भगवान श्रीकृष्णाच्या पद्यात्मक उपदेशास 'भगवद्‌गीता' असे संबोधतात, तर हा पद्यमयी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ 'रेणुकगीता' या नावाने प्रसिद्ध आहे.

भगवद्‌गीतेच्या अकराव्या अध्यायामध्ये भगवंतांनी अर्जुनास विश्वरूप दर्शन करवून अनुग्रहीत केले, तर 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या एकविसाव्या परिच्छेदात विभीषणाच्या प्रार्थनेनुसार तीन कोटी शिवलिंगस्थापना करून श्रीरेणुकाचार्यांनी तीन कोटी आचार्यांच्या स्वरूपात विभीषणास विश्वरूपदर्शन देऊन अनुग्रह केला आहे. अशा प्रकारे रेणुकगीता व भगवद्‌गीता सैद्धान्तिकदृष्ट्या समान आहेत, यात संदेह नाही.

या ग्रंथामध्ये एकवीस परिच्छेद आहेत, तर १४०५ श्लोक आहेत. ग्रंथातील एक ते चार व एकविसाव्या परिच्छेदातील २६६ श्लोकांमध्ये चरित्रात्मक वर्णन आले आहे. तर पाचव्या परिच्छेदापासून विसाव्या परिच्छेदांपर्यंत ११३९ श्लोकांमध्ये वीरशैव षट्स्थलसिद्धान्त प्रतिपादन केला आहे. या ग्रंथास रेणुकागस्त्यसंवाद, रेणुकगीता, 'श्रीसिद्धान्तशिखामणी' अशा तीन नावांनी संबोधले जाते. यापैकी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हे प्रसिद्ध नाव आहे.

### ग्रंथनामाचे रहस्य

स्वत: शिवयोगी शिवाचार्यांनीच स्वरचित श्रीरेणुक-अगस्त्य संवादात्मक ग्रंथाचे नाव 'श्रीसिद्धान्तशिखामणी' असे प्रयोजिले आहे. या नावाचा हेतू असा आहे- शिवाने उपदेश केलेल्या कामिकादिवातुलान्त अठ्ठावीस आगमांना 'सिद्धान्त' असे म्हणतात. या संदर्भात टिप्पणी करताना अघोर शिवाचार्य म्हणतात, 'सिद्धान्तशब्द: पंकजादिशब्दवद्योगरूढ्या शिवप्रणीतेषु कामिकादिषु दशाष्टदशतंत्रेषु प्रसिद्ध:' इति।' (दहा + अठरा) अठ्ठावीस तंत्रांकरिता असलेला 'सिद्धान्त' शब्द पंकज इत्यादी शब्दाप्रमाणे यौगिक अर्थाने प्रसिद्ध आहे. या 'सिद्धान्त' नावाने प्रसिद्ध शैवागमांच्या उत्तरभागात वीरशैवसिद्धान्त म्हणून प्रतिपादन केला आहे. याविषयी रेणुकाचार्य म्हणतात:-

> सिद्धान्ताख्ये महातंत्रे कामिकाद्ये शिवोदिते।
> निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम्।। सि.शि. ५.१४

अशाप्रकारे सर्व शैवसिद्धान्तांच्या उत्तर भागात विशेषरूपाने प्रतिपादित वीरशैवसिद्धान्ताचे सार श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी संग्रहित करून सिद्धान्ताचा शिखामणी = 'श्रीसिद्धान्तशिखामणी' असे सार्थ नामाभिधान असलेला ग्रंथ निर्माण केला. म्हणूनच ग्रंथकारसुद्धा म्हणतात:-

> सर्वेषां शैवतंत्राणामुत्तरत्वान्निरुत्तरम्।
> नाम्ना प्रतीयते लोके यत् सिद्धान्तशिखामणि:।। सि.शि. १.३१

### ग्रंथकर्ता व ग्रंथनिर्माण कालखंड

ग्रंथारंभी शिवयोगी शिवाचार्य वर्णन करतात:-

> कश्चिदाचारसिद्धानामग्रणी: शिवयोगिनाम्।

शिवयोगीति विख्यातः शिवज्ञानमहोदधिः।।
तस्य वंशे समुत्पन्नो मुक्तामणिरिवामलः।
मुद्ददेवाभिधाचार्यो मूर्धन्यः शिवयोगिनाम्।।
तस्यासीन्नदनः शान्तः सिद्धनाथाभिधः शुचिः।
शिवसिद्धान्तनिर्णेता शिवाचार्यः शिवात्मकः।।
तस्य वीरशैवाचार्य शिखारत्नस्य नन्दनः।
अभवच्छिवयोगीति सिन्धोरिव सुधाकरः।। सि.शि. १.१३,१५,१७,२०

अशाप्रकारे कवीने स्ववंशवर्णन केले आहे. यावरून असे स्पष्ट होते की, हे शिवयोगी यांचे पणतू, मुद्ददेवांचे नातू तर सिद्धनाथांचे पुत्र रचनाकार शिवयोगी होत. याशिवाय त्यांचा देश व काल यांविषयी कुठलीही माहिती प्राप्त होत नाही.

ग्रंथकार शिवयोगी यांच्या पणजोबांचे नावसुद्धा शिवयोगी शिवाचार्यच होते. ही एक लोकपरंपरा आहे की, पणजोबा, आजोबा किंवा ज्येष्ठ यांची नावे परिवारातील पुत्र, नातू, पणतू यांना पुन्हा उपयोजिली जातात. ह्यानुसार ग्रंथकार शिवयोगीसुद्धा पणजोबांच्या नावाने जगप्रसिद्ध झाले.

**वंशावळ**

शिवयोगी – मुद्ददेव – सिद्धनाथ – शिवयोगी ('श्रीसिद्धान्तशिखामणी'चे रचनाकार)

'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावर श्रीमरितोण्टदार्य (१७०० इ.) यांनी 'तत्त्वप्रदीपिका' नावाची संस्कृत व्याख्या केली आहे. ग्रंथाच्या आरंभीच मरितोण्टदार्य यांनी उल्लेख केला:–

'अत्र कलिकालप्रवेशानन्तरं लोकहितार्थं रेणुकगणेश्वर इति प्रसिद्धो रेवणसिद्धेश्वरः कुम्भसम्भवाय वीरशैवशास्त्रमुपदिष्टवान्। तदनन्तरं रेवणसिद्धेश्वर–दृष्टिगर्भसम्भूतसिद्धरामेश्वर संप्रदायप्रसिद्धः सकल निगमागमपारगः शिवयोगीश्वर इत्यभिधानवान् कश्चिद् माहेश्वरस्तद्रेणुकागस्त्यसंवादं निर्विघ्नेन स्वशिष्यान् बोधयितुं स्वमनसि कृतसकलसिद्धान्तश्रेष्ठ निगमागमैक्यगर्भीकार लक्षणस्वेष्टदेवता–नमस्काररूपमङ्गलं शिष्यशिक्षार्थं सप्तभिः श्लोकैर्निबध्नाति।'

(कलिकालप्रवेश झाल्यानंतर लोकांवर अनुग्रह करण्यासाठी रेणुकगणेश्वर या नावाने प्रसिद्ध रेवणसिद्धेश्वरांनी अगस्त्य ऋषींना उपदेश केला. यानंतर

रेवणसिद्धेश्वरांच्या कृपाकटाक्षाने जन्म घेतलेला सिद्धरामेश्वर संप्रदायामध्ये प्रसिद्ध संपूर्ण आगम व निगम यांमध्ये पारंगत असलेले शिवयोगी नावाच्या आचार्याने स्वशिष्यांना रेणुकागस्त्यसंवाद निर्विघ्नपणे समजावून सांगण्याकरिता स्वमनामध्ये सिद्धान्तश्रेष्ठ, निगमागमैक्यस्वरूपी, स्वेष्टदेवतेस नमन करणारे सात श्लोक सांगितले आहेत.)

अशाप्रकारे या भाष्यपंक्तींमध्ये ग्रंथकाराने शिवयोगी शिवाचार्य रेवण-सिद्धेश्वरांच्या कृपेने सोलापूर येथील सिद्धरामेश्वरांचे वंशज होते, असे नमूद केलेले आहे.

या प्रसंगी हे लक्षात घ्यावे लागेल की, महाराष्ट्र राज्यात 'सोलापूर' नावाचे प्रसिद्ध शहर आहे. या शहरातील निवासी मुद्दगौड व सुगलादेवी या पतिपत्नीस वयाच्या साठाव्या वर्षी वीरशैवाचार्य श्रीरेवणसिद्धेश्वरांच्या आशीर्वादाने 'सिद्धरामेश्वर' नावाचा पुत्र प्राप्त झाला होता. तोच सिद्धराम शिवयोगी या नावाने इसवी सनाच्या बाराव्या शतकात प्रसिद्ध झाला (सिद्धराम शिवयोगी, एम. बी. कोट्रशेट्टीविरचित कन्नड शोधप्रबंधः, पृ. ६९-८५, कर्नाटक विश्वविद्यालय प्रकाशनम्, १९७५ इसवी). सिद्धरामांनीच आपला स्वानुभव कन्नड भाषेत काव्यमय रचनांच्या माध्यमातून व्यक्त केला. ही काव्यसंपदा 'सिद्धरामेश्वरवचनगळु' या नावाने प्रसिद्ध आहे. श्रीमरितोण्टदार्य यांनी (इसवी १७००) 'श्रीसिद्धान्त-शिखामणी'च्या व्याख्याप्रसंगी कविवंशवर्णनात आलेले 'मुद्ददेव' हे नाव पाहून हेच पूर्वीचे सिद्धरामेश्वरांचे वडील मुद्ददेवच असावेत, असे मत व्यक्त केले.

तस्यासीन्नन्दनः शान्तः सिद्धनाथाभिधः शुचिः।
शिवसिद्धान्तनिर्णेता शिवाचार्यः शिवात्मकः।। सि.शि. १.१७

या श्लोकाच्या व्याख्येत- 'तस्य मुद्ददेवस्य... सिद्धनाथाभिधः सिद्ध-रामेश्वराभिधासंयुक्तः सिद्धनाथाचार्याख्यो नन्दनः कुमार आसीदभवदित्यर्थः' (सि.शि. तत्त्वप्रदीपिका, १.१७) त्या मुद्ददेवांचा सिद्धनाथ, सिद्धरामेश्वर नावाने युक्त सिद्धनाथाचार्य होता असा अर्थ व्यक्त केला आहे. याचबरोबर

तस्य वीरशैवाचार्यशिखारत्नस्य नन्दनः।
अभवच्छिवयोगीति सिन्धोरिव सुधाकरः।। सि.शि. १.२०

त्या वीरशिवाचार्यांचा पुत्र हा शिवयोगी समुद्रातील चंद्राप्रमाणे शोभून दिसत होता, या श्लोकावर व्याख्या करीत असताना सिद्धनाथाचार्यांचा पुत्र समुद्रातून

चंद्र जसा उत्पन्न होतो त्याप्रमाणे हा शिवयोगी जन्मला होता अशाप्रकारे सिद्धरामेश्वराचा / सिद्धनाथाचाच पुत्र शिवयोगी शिवाचार्य होत, अशी भूमिका स्पष्ट करून शिवयोगी शिवाचार्य सिद्धरामेश्वरांच्या वंशात जन्मले होते, असे मत मांडले आहे.

अशा प्रकारच्या मरितोण्टदार्यांच्या उक्तीमुळे 'सिद्धान्तशिखामणी' ग्रंथाचा कालखंड बाराव्या शतकातील बसवेश्वर-सिद्धरामेश्वर इत्यादींच्या नंतरचा आहे, असे होते. परंतु कविकाळ व वंशाविषयी मरितोण्टदार्यांची भूमिका सदोष आहे, असे वीरशैवाचार्य मानतात.

यापैकी डॉ. ज. च. नि. महोदयांच्या मते, मरितोण्टदार्यांच्या व्याख्येनुसार मुद्ददेवांचा पुत्र सिद्धनाथ किंवा सिद्धरामेश्वर व त्यांचे पुत्र शिवयोगी शिवाचार्य होते, हे स्वीकारार्ह नाही. कारण सिद्धरामेश्वर (सोलापूर) हे अविवाहित होते. विवाहाशिवाय पुत्र कसा होणार? जर सिद्धरामेश्वर हेच शिवयोगी शिवाचार्यांचे वडील होते तर शिवयोगी शिवाचार्यांनी स्वतःच्या वडिलांचे नाव सिद्धरामेश्वर असे लिहावयास हवे होते. परंतु काव्यात 'सिद्धनाथ' असा स्पष्ट उल्लेख आहे. यामुळे काव्यात छंदोभंगसुद्धा झाला नसता. जसे- 'तस्यासीन्नन्दनः शान्तः सिद्धनाथाभिधः शुचिः' असे म्हणण्याऐवजी 'तस्यासीन्नन्दनः शान्तः सिद्धरामाभिधः शुचिः' असेही वर्णन करणे शक्य होते. तसेच सोलापूरच्या सिद्धरामेश्वरांच्या वडिलांचे नाव मुद्दगौड होते, मुद्ददेव नाही. केवळ नामातील काही वर्णसाधर्म्यामुळे व्यक्तिवंश निश्चित करणे संयुक्तिक होणार नाही.

जर शिवयोगी नावाचे प्रसिद्ध आचार्य व सिद्धरामेश्वरांचे वर्णन स्वीकारले तरी ते अयोग्य होईल. कारण की, शिवयोगी शिवाचार्य ग्रंथात स्पष्ट उल्लेख करतात:-

आलोक्य शैव तंत्राणि कामाकाद्यानि सादरम्।
वातुलान्तानि शैवानि पुराणान्यखिलानि तु।। सि.शि. १.२५

कामिकादी शैवतंत्र व शैवपुराणांचा अभ्यास करून या 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाची निर्मिती झाली आहे. या श्लोकावरून असे प्रकर्षाने जाणवते की, शिवयोगी शिवाचार्यांनी आजोबांनी रचलेली वचने पाहिली आहेत, असे वर्णन करावयास हवे होते. परंतु वास्तविकता तशी नाही. म्हणून असे स्पष्टपणे दिसून येते की, सोलापूरचे सिद्धरामेश्वर शिवयोगी शिवाचार्यांचे मूलपुरुष पूर्वज नाहीत. याशिवाय

ग्रंथाच्या सुरुवातीस शैवागमांचा, पुराणांचाच केवळ उल्लेख केला आहे. येथे वचनशास्त्राचा उल्लेखच नसल्यामुळे ग्रंथकार शिवयोगी शिवाचार्य हे वचनकार सिद्धरामेश्वर-बसवेश्वर यांच्यापेक्षा प्राचीन होते.

याचबरोबर शिवयोगी शिवाचार्यांनी स्वत:च्या वंशावळीत ग्रामाचा किंवा आईचा उल्लेख केलेला नाही. म्हणून हा ग्रंथ गृहस्थाश्रमाचा नसून उत्तराश्रमी आचार्य परंपरेचा असू शकतो. तसेच

येन रक्षावती जाता शिवभक्ति: सनातनी।
बौद्धादिप्रतिसिद्धान्तमहाध्वान्तांशुमालिना।। सि.शि. १.२३

या श्लोकावरून असे स्पष्ट होते की, शिवयोगी शिवाचार्यांच्या वेळी बौद्धादी अवैदिक धर्माचा अधिक प्रसार होता. त्या मताचे खंडन करण्यासाठीच या ग्रंथाची निर्मिती झालेली आहे. बाराव्या शतकात सिद्धरामेश्वर-बसवेश्वर यांच्या काळात कर्नाटक प्रांतात बौद्धमताचे प्राबल्य नव्हते. म्हणून कवी सिद्धराम-बसवेश्वर इत्यादी शरणांपेक्षा निश्चितच प्राचीन होते, असे स्पष्टपणे सांगता येईल.

म्हैसूरचे प्रसिद्ध विद्वान पं. एन. आर. करिबसवशास्त्री यांनी म्हटले आहे की, ग्रंथकार शिवयोगी शिवाचार्य पूर्वपीठिकेत स्ववंशक्रमाचे वर्णन करतात. त्यांचा कालखंड, देश यांचे स्पष्टीकरण प्राप्त होत नाही. सोलापूरच्या सिद्धरामेश्वराचे वंशज नाहीत, याबद्दल प्रमाणे उपलब्ध आहेत. तसेच हे मरितोण्टदार्य यांच्या व्याख्येनिमित्त अगोदरच हे स्पष्ट झाले की, हा ग्रंथ बसवादींपेक्षा प्राचीन आहे.

### ग्रंथकालनिर्णयाविषयी श्रीदासगुप्ता यांचा गैरसमज

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या कालखंडाविषयी डॉ. एस. एन. दासगुप्ता महोदयांचे मत असे की, 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथामध्ये बसवेश्वरांचा उल्लेख आहे. श्रीपती यांनी स्वरचना 'श्रीकरभाष्या'मध्ये 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील संदर्भप्रमाणे उल्लेखिली आहेत. (सि.शि. कन्नड प्रस्तावना, पृ. ५, ग्रंथप्रसार मण्डली, १९२९) म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ बसवेश्वरांच्या नंतर व श्रीपती यांच्यापूर्वी रचला असावा. (A History of Indian Phylosophy, Vol 5, p. 44) असे दोन तर्क मांडले आहेत. या दोन तर्कांपकी एक तर्क असा की, श्रीकरभाष्यामध्ये श्रीपती यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या श्लोकांचा संदर्भ दिला आहे, म्हणजे हे स्वत:

सिद्ध आहे की, 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा 'श्रीकरभाष्या'पेक्षा प्राचीन आहे. परंतु दुसरा तर्क असा की, 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये बसवेश्वरांचा उल्लेख आहे, हा तर्क प्रमादपूर्ण वाटतो. कारण श्रीदासगुप्तांच्या मते, 'शिवनिन्दकस्य वध आवश्यक इति बसवेश्वर विचार: सिद्धान्तशिखामणावुल्लिखित:' (A History of Indian Phylosophy, Vol 5, p. 45) असे सांगून हा वीरभद्राचार होय, अशी भक्ताचार भेदाविषयी टिप्पणी करतात.

शिवनिन्दाकरं दृष्ट्वा घातयेदथवा शपेत्।
स्थानं वा तत् परित्यज्य गच्छेद् यद्यक्षमो भवेत्।। सि.शि. ९.३६

असा 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा संदर्भ देतात. परंतु उद्धृत अंशामध्ये मूळ 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या श्लोकात बसवेश्वरांचा उल्लेख नाही, तर तो उल्लेख टीकाकार मरितोण्टदार्य यांच्या अवतरणिकेत आलेला आहे. याप्रसंगी सूक्ष्मपणे विवेचन केल्यास उपरोक्त श्लोकामध्ये वीरशैवसंमत पंचाचारांपैकी गणाचाराचे वर्णन केले आहे.

लिंगाचार: सदाचार: शिवाचारस्तथैव च।
भृत्याचारो गणाचार: पंचाचारा: प्रकीर्तिता:।। चं.आ. क्रियापाद ९.४

अर्थात् शिवभक्त सक्षम असेल तर त्याने शिवनिंदकास पाहाताच शाप द्यावा किंवा त्याचा वध करावा. जर शाप देण्यास किंवा वध करण्यास समर्थ नसेल तर कान झाकून त्या ठिकाणाचा त्याग करावा. शिवभक्ताने कधीही शिवनिंदा ऐकू नये, हे गणाचारात सांगितले आहे. या श्लोकावर भाष्य करीत असताना श्रीमरितोण्टदार्यांनी अवतरणिकेत श्रीवीरभद्राचा व श्रीबसवेश्वरांचा उल्लेख दृष्टान्त म्हणून केला आहे.

याचा भावार्थ असा की, जसे शिवांचा अवमान करणाऱ्या दक्ष ब्राह्मणाचा यज्ञ पाहून श्रीवीरभद्राने तो यज्ञ व दक्ष दोघांचा नाश केला, तसे बिज्जल राजाच्या सैनिकांनी शिवभक्तांवर जो अत्याचार केला तो सहन न झाल्यामुळे शिवभक्त बसवेश्वरांनी बिज्जल राज्यमंत्रिपद सोडून ते विजापूरनजीक संगमक्षेत्राकडे गेले. जर शिवभक्त सक्षम असेल तर वीरभद्राप्रमाणे शिवनिंदकाचा वध करावा. शिवभक्त सक्षम नसेल तर बसवेश्वराप्रमाणे त्या शिवनिंदास्थलाचा त्याग करावा. असे गणाचाराचे स्पष्टीकरण करताना वीरभद्राचाराचा व बसवेश्वराचाराचा दृष्टान्त

येथे उद्धृत केला आहे.

तसेच श्रीबसवेश्वरांचा नामोल्लेख मूळ 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात आला आहे का? तो टीकाकाराच्या अवतरणिकेत आला आहे याचा अभ्यास न करताच डॉ. एस. एन. दासगुप्ता महोदय यांचे वचन उपहासास कारण होते. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ बसवेश्वरांच्या नंतर निर्माण झाला, हे दासगुप्ता यांचे वचन प्रमाणशून्य व दोषयुक्त आहे.

याशिवाय दासगुप्तांनी दुसरा एक प्रमाद केला आहे. तो असा– श्रीबसवेश्वर बालपणी स्वशिक्षणासाठी स्वतःचे मामा व बिज्जलमंत्री बलदेव यांच्याकडे गेले होते, ही घटना इतिहासप्रसिद्ध आहे. बिज्जल राजाची राजधानी कर्नाटक प्रांतातील बिदर जिल्ह्यातील कल्याण ही होती. या इतिहासाची अवहेलना करणारे दासगुप्ता म्हणतात, श्रीबसवेश्वर बालपणीच स्वजन्म ठिकाण बागेवाडीपासून मुंबईजवळच्या कल्याणनगरामध्ये गेले होते. तेथेच इसवी ११५९–११६७ पर्यंत बिज्जल राजाचे शासन होते. श्रीबलदेव आजारी असल्यामुळे श्रीबसवेश्वरांना प्रधानमंत्रिपदावर नियुक्त करण्यात आले. ते कल्याण नगर मुंबई नगराजवळचे कल्याण होते, असे ते वर्णन करतात. (A History of Indian Phylosophy, Vol 5, p. 42).

दासगुप्तांचे असे वक्तव्य इतिहासकारांच्या मनामध्ये वेदना उत्पन्न करणारे आहे. अशा या महोदयांची लेखनी दर्शन व इतिहास यांविषयी कितपत तथ्य प्रतिपादन करू शकेल याची जाण पारंपरिक विद्वानांना नक्की होईल. म्हणून बसवेश्वरांच्या नंतर हा ग्रंथ निर्माण झाला, हे दासगुप्तांचे वचन स्वीकार्य नाही. दुसरे असे की–

प्रसादाद् देवताभक्तिः प्रसादो भक्तिसम्भवः।
यथैवाङ्कुरतो बीजं बीजतो वा यथाङ्कुरः।। सि.शि. ९.११

यद्यप्यत्र प्रसादादेव सा भक्तिः इति वर्तते, तथापि स पाठभेदो भवितुमर्हति.

'... आप जिस पर प्रसन्न है, वही धन्य है. जग में पावन है; कूडलसंगमदेव।' ('बसवेश्वर के वचन' भा. १, पृ. १०७, कर्नाटक विश्वविद्यालय प्रकाशनम्, १९७६) या बसवेश्वरांच्या वचनामध्ये प्रमाण म्हणून उद्धृत केलेला संस्कृत श्लोक 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथातील नवव्या परिच्छेदातील अकरावा श्लोक आहे. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा बसवेश्वरांपेक्षा प्राचीन आहे याचे प्रमाण

स्वत: बसवेश्वरांचे वचनच होय.

याशिवाय बाराव्या शतकातील वीरशैव वचनकार देवरदासिमय्य–बसवेश्वर–अक्कमहादेवी–अल्लमप्रभुदेव इत्यादींच्या साहित्यावर 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा प्रभाव होता, असे डॉ. ज.च.नि. महोदयांनी उदाहरणांसह स्पष्ट केले आहे. (मणिमुकुरप्रभाया: कन्नडभाषाया: अनुबन्ध:, पृ. ११७–१२०, सम्पादक: पञ्चाक्षरी हिरेमठ:, ताराग्रन्थ प्रकाशनम्, धारवाड, १९७६) या सर्व प्रमाणांना सारगर्भित दृष्टीने पाहिले असता हे स्पष्ट होते की, 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा बसवेश्वरांच्या कालखंडापेक्षा पूर्वीच लिहिला गेला आहे.

### श्रीकरभाष्यापेक्षा 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे प्राचीनत्व

आता 'श्रीसिद्धान्तशिखामणी' बसवेश्वरांपेक्षा प्राचीन आहे हे सिद्ध झाले. परंतु हा ग्रंथ किती प्राचीन आहे याविषयी जिज्ञासा निर्माण होते. समादरणीय श्रीपतिपंडिताराध्यांनी 'श्रीकरभाष्या'मध्ये 'पवित्रं ते' (पवित्रं ते विततम्- ऋ. ९. ३१) या ऋग्वेदमंत्रावर भाष्य करताना

ऋगित्याह पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते।
तस्मात् पवित्रं तल्लिङ्गं धार्यं शैवमनामयम्।।
दीक्षया रहित: साक्षान्नाप्नुयाल्लिंगमुत्तमम्। सि.शि. ६.५९–६०

हे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील रेणुकाचार्यांनी लिंगधारणेविषयी वर्णन केलेले श्लोक निर्देशित केले आहे. अशा प्रकारे अनेक स्थलांतील 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील श्लोक 'श्रीकरभाष्या'त प्रमाण म्हणून प्रयोजिले आहेत. यावरून हा ग्रंथ 'श्रीकरभाष्या'पेक्षा प्राचीन आहे हे सिद्ध होते.

श्रीपतिपंडिताराध्यांच्या कालखंडाविषयी काही मतमतांतरे आहेत. यावर संक्षिप्तरीत्या त्यावर विवेचन करू. श्रीकरभाष्यामध्ये प्रसंगानुरूप नीलकंठ– ('नीलकंठ भगवत्पाद–भट्टभास्कर–घंटानाथ–ज्योतिर्नाथादि–पूर्वाचार्यैश्छान्दोग्यभाष्ये... व्याख्यातम्' (श्री.भा. १.१.२१). ) भट्टभास्कर–श्रीकण्ठ – (अत्र शिवाग्रगण्य श्रीकण्ठशिवाराध्यकृत ब्रह्मसूत्रमीमांसाभाष्ये विशिष्टाद्वैतं स्वाभिप्रेतत्वेन प्रसाधितम् (श्री.भा. २.१.२२)– रामानुज आदींचा (चिदचिदीश्वर परिभाषा प्रधान रामानुजशास्त्रं वेदमूलकत्वाभावादवैदिकमिति घण्टाघोष: (श्री.भा. २.१.२२) यांच्या

सिद्धान्तांचे (अभिमत व अनभिमत यांचे) प्रतिपादन श्रीपती करतात. म्हणजे उपरोक्त सर्व श्रीपतीपेक्षा प्राचीन होते हे लक्षात येते.

नीलकंठ यांचा कालखंड साधनांच्या अभावामुळे प्राचीनत्व स्वीकारण्यास भाग पाडतो. श्रीभट्टभास्करांच्या सिद्धान्तांचा स्पष्टोल्लेख इ.स. ९८० मध्ये कुसुमांजलीकार उदयनाचार्यांनी केला. त्यावरून श्रीभास्कर यांचा कालखंड इ.स. ९०० शताब्दी होता, असे मत डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी व्यक्त केले आहे. (Indian Phylosophy, Vol 2, p. 670) हा त्यांनीच श्रीरामानुजांचा काळ इ.स. १०२७ असे नोंदविले आहे. (Indian Phylosophy, Vol 2, p. 665)

चिदरेमठाध्यक्ष श्रीवीरभद्र शर्मा यांनी श्रीकण्ठाचार्य यांचा कालखंड इसवी सन १०६४ असा स्पष्ट मानला आहे. श्रीकण्ठाचार्यकालोऽपि ख्रि. १०४० तमाब्द इत्यघोरशिवाचार्यकृते– महोत्सवविधौ स्वकालस्य ख्रि.श. ११५४ तमाब्दत्वेन निर्देशात्, श्रीकण्ठश्च स्वप्रपितामहत्वकथनाच्च निश्चीयते (श्रीकरभाष्यचतु:सूत्री, पीठिका, पृ. ४, जंगमवाडी मठ, वाराणसी प्रकाशनम्– १९५६ इ.) अशाप्रकारे श्रीकण्ठ, नीलकण्ठ, भट्टभास्कर, रामानुजाचार्य यांच्यानंतर होऊन गेलेल्या श्रीपतिपण्डिताराध्यांचा कालखंड कोणता असेल? या जिज्ञासेचे समाधान करीत असताना श्री. टी.एस. नारायणशास्त्री यांनी प्राचीन शिलालेखांच्या आधारे श्रीपतींचा कालखंड इ.स. १०७२ असे मत मांडले आहे. आचार्य बलदेव उपाध्याय यांनीसुद्धा श्रीपतींचा कालखंड इ.स. १०६० असाच स्वीकारला आहे. (Indian Review, Vol 16, May 1915, N-5) या सर्व विवेचनावरून स्पष्ट होते की, श्रीपतींचा कालखंड इसवी सनाचे अकरावे शतक होय. (भारतीय दर्शनम् पृ. ४६९, चौखम्बा ओरियन्टालिया १९७६ इ.)

### सी. हयवदनराव महोदयांचा भ्रम

बेंगलोरनिवासी मध्वमताचे अनुयायी श्री. सी. हयवदनराव यांनी 'श्रीकरभाष्या'मध्ये मध्वाद्वैतक्षपणकतार्किकादय: (अत्र मध्वाद्वैत क्षपणकतार्किकादय इति प्रथमान्तपाठस्थाने तृतीयान्त: पाठ उचित: प्रतिभाति।) (तार्किकादिभि:) जीवानां विभुत्वाङ्गीकारात् तन्निरासार्थमेतदधिकरणप्रारम्भ:' (श्रीकरभाष्य २.३.१८). प्रस्तुत ठिकाणी मध्वशब्द पाहून श्रीकरभाष्य मध्वाचार्यानंतरचे आहे.

(सी. हयवदनरावकृता श्रीकरभाष्यस्याङ्ग्लभाषामयभूमिका, पृ. ९५-९८, बेंगलोर प्रेस, बेंगलोर, १९३६ इ.) हे अयोग्य वाटते. कारण येथे 'मध्व' शब्द प्रक्षिप्त आहे. श्रीपतिपंडिताराध्यांनी 'उत्क्रान्तिगत्यागतीनाम्' (श्री.भा. २.३.१८) या बादरायणसूत्रावर भाष्य करीत असताना जीवात्म्याचे व्यापकत्व, त्याची उत्क्रान्ती, गति-अगती, संभव-अभाव तसेच आत्म्याचे अणुत्व स्वीकारले व आत्म्याविषयी विभुत्ववाद्यांचे मत खंडित केले. येथे अद्वैततार्किकांद्वारा आत्म्याचे विभुत्व स्वीकारून त्यांचे निराकरण कसे शक्य होईल, म्हणून हा उल्लेख अशक्य आहे. कारण येथे आत्म्याचे अणुत्व स्वीकारले आहे. मध्वाचार्यांच्या मते, 'हेतुनां सकाशादणुरेव' (श्री.भा. पूर्णप्रज्ञभाष्यम् २.३.२०), तसेच- 'अणोरपि जीवस्य शरीराण्याप्तिर्यज्यते, यथा हरिचन्दनविप्लुष एकादशपतिताया: सर्वशरीरण्याप्ति:' (श्री.भा. पूर्णप्रज्ञभाष्यम् २.३.२४).

त्यामुळे मध्वाद्वैत-क्षपणक-तार्किकांचे जीवांच्या विभुत्वास अंगीकारून त्याचे निराकरण करण्यासाठी हे अधिकरण प्रारंभ करीत आहोत. अशा या श्रीपतिपंडिताराध्यांच्या वाक्यातील 'मध्व' शब्द प्रसंगानुरूप असंयुक्त आहे. निश्चितपणे तो नंतर जोडला गेला आहे. अशा प्रकारे प्रत्येक ठिकाणी 'श्रीकरभाष्या'तील 'मध्व' शब्द (श्री.भा. २.२.४१, पृ. २३७, श्री.भा. २.३.४०, पृ. २७३) प्रक्षिप्तच होय.

याशिवाय 'श्रीकरभाष्या'च्या हस्तलिखित प्रतीमध्ये 'मध्व' शब्द कुठेही दृष्टिगोचर होत नाही, असे मत एम. जी. नंजुंडाराध्यांनी व्यक्त केले आहे. (श्री.भा., भूमिका, पृ. १२१, मैसूर विश्वविद्यालय प्रकाशन, १९७७)

चिदरेमठाध्यक्ष वीरभद्र शर्मा यांच्या मते, 'शंकर-रामानुजभाष्यांतील वाक्ये जशी 'श्रीकरभाष्या'त उद्धृत केलेली दिसतात, तशी 'मध्वभाष्या'तील एकही वाक्य पाहावयास मिळत नाही. येथे भाष्यात उपलब्ध असलेले मध्वाचार्य मत द्वैतखंडनामध्ये पाहावयास मिळत नाही, तर ते प्राचीन द्वैतमतामध्ये आलेले आहे (श्री.भा., चतु:सूत्री, पीठिका, पृ. १०, जंगमवाडी मठ प्रकाशन). यावरून 'श्रीकरभाष्या'तील 'मध्व' शब्द प्रक्षिप्त आहे, हे सिद्ध होते.

श्रीमध्वाचार्यांचा कालखंड इ.स.चे १२वे शतक होते, असे मत डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी मांडले आहे. (इंडियन फिलॉसॉफी, खंड २, पृ. ७३८)

तर याअगोदर स्पष्ट केल्यानुसार श्रीपतींचा कालखंड इसवी सनाचे ११ वे शतक आहे. अर्थात् श्रीपती मध्वाचार्यांपेक्षा प्राचीन होते असे लक्षात येते. टी. एस. नारायणशास्त्रींनीसुद्धा श्रीमध्वाचार्य हे श्रीपतीनंतर झाले होते, असेच मत मान्य केले आहे. (इंडियन रिव्ह्यू, खंड १६, मे १९१५, एन् ५)

अशाप्रकारे 'श्रीकरभाष्या'चा कालखंड ११ वे शतक होता हे निश्चित झाल्यानंतर 'श्रीकरभाष्या'त प्रमाणस्वरूपात उद्धृत केलेला 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ त्याहीपेक्षा प्राचीन होता, हे सिद्ध होते.

**श्रीकंठभाष्यापेक्षा 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे प्राचीनत्व**

श्रीकंठ यांनी रचलेल्या 'ब्रह्मसूत्र श्रीकंठभाष्या'मध्ये 'अविभागेन दृष्टत्वात्' (श्री.भा. १.४.४) याविषयी स्पष्टीकरण करताना 'मुक्तः शिवसमो भवेत्' (सि.शि. ९.१४) असा 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा अंश प्रमाण म्हणून उद्धृत केला आहे. श्रीकंठाचा कालखंड इसवी सनाचे १० वे शतक किंवा तत्पूर्व स्वीकारला आहे. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' त्यांच्यापेक्षा प्राचीन आहे, हे स्पष्ट होते.

याशिवाय डॉ. ज.च.नि. महोदयांनी मत व्यक्त केले आहे की, ग्रंथकार शिवयोगी शिवाचार्य इसवी सनाच्या आठव्या शतकात सालुहट्टी (सालोटगी) विद्यापीठामध्ये प्राचार्य होते, असे ऐकिवात आहे. जे आज विजापूर जिल्ह्यातील 'इंडी' नगराजवळ आहे. तेथे शिवयोगी यांची एक समाधी आहे, असेही सांगतात. (सिद्धान्तशिखामणेः सौन्दर्यदर्शनस्य कन्नडपीठिका, १९७६, पृ.क्र. १०-१२). यावरून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा कालखंड आठवे शतक आहे, असे निश्चित होते.

याशिवाय 'गुरुवंशकाव्या'मध्ये, 'शिवतत्त्वरत्नाकर' या ग्रंथामध्ये श्रीरेणुकाचार्यांचा अवतार असलेल्या रेवणसिद्ध यांनी श्रीशंकराचार्यांना चंद्रमौलीश्वरलिंग व रत्नगर्भगणपती प्रदान केला, असा उल्लेख आहे. हा इतिहास सर्वज्ञात आहे. हा विषय शिवयोगी शिवाचार्यांना ज्ञात नव्हता. जसे ईशानशिवगुरू, चतुर्मुखबोम्मरसाद यांनी स्वरचनांमध्ये रेणुकचम्पू-रेवणसिद्धेश्वर पुराण इत्यादी ग्रंथांमध्ये श्रीगुरू रेणुकाचार्यांच्या लीलांचे वर्णन करताना श्रीरेणुकाचार्याद्वारा शंकराचार्यांना दिलेल्या चंद्रमौलीश्वर लिंगप्रसंगाचे वर्णन आले आहे. तसे हा विषय 'श्रीसिद्धान्त-

शिखामणी'मध्ये शिवयोगी शिवाचार्यांनी नमूद केला नाही. यावरून हे स्पष्ट होते की, शिवयोगी शिवाचार्यांपेक्षा प्राचीन होते. परंतु पं. काशीनाथ शास्त्री यांनी

येन रक्षावती जाता शिवभक्तिः सनातनी।
बौद्धादिप्रतिसिद्धान्तमहाध्वान्तांशुमालिना।। सि.शि. १.२३

या श्लोकामध्ये भारत देशामध्ये दोन हजार वर्षांपूर्वी बौद्धमताचा प्रभाव होता, म्हणून शिवयोगी शिवाचार्यांचा व 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा कालखंड दोन हजार वर्षांपूर्वीचाच होता असा युक्तिवाद पं. काशीनाथशास्त्री यांनी मांडला होता. (सि.शि., प्रस्तावना, पृ. ७, काशीनाथशास्त्री ग्रंथमाला, मैसूर, १९७२)

तरीसुद्धा 'श्रीसिद्धान्तशिखामणी' दोन हजार वर्षांपूर्वीचा आहे, या संभावनेपेक्षा तो निश्चितच इसवी सनाच्या आठव्या शतकापूर्वीचा आहे, हे निश्चितपणे आमचे मत आहे.

## शिवयोगी शिवाचार्यांचा देशविचार

'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये शिवयोगी शिवाचार्यांनी स्वदेशाचा नामोल्लेख केलेला नाही. परंतु त्यांचे आजोबा मुद्ददेव यांच्या उल्लेखावरून ते कर्नाटक प्रांतातील होते, असे मत काशीनाथ शास्त्री यांनी व्यक्त केले आहे. त्यांच्या मते मुद्ददेव हा शब्द कन्नड भाषेतील आहे. कन्नड भाषेत याचा अर्थ प्रीती असा आहे. याप्रमाणे हा कन्नड शब्द मुदं ददाति मुद्दः असा व्युत्पन्न होतो.

मुद्दानात् सर्वजन्तूनां प्रणतानां प्रबोधतः।
मुद्ददेवेति विख्यात समाख्या यस्य विश्रुता।। सि.शि. १.१६

या उल्लेखावरून ते कर्नाटक प्रांतातील होते हे स्पष्ट होते. (सि.शि. प्रस्तावना, पृ. ७, काशीनाथशास्त्री ग्रंथमाला प्रकाशन)

## 'श्रीसिद्धान्तशिखामणी'ची हस्तलिखिते

धारवाड येथील कर्नाटक विश्वविद्यालयातील कन्नड अध्ययन केंद्रामध्ये 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे पाच हस्तलिखित ग्रंथ आहेत. त्यांचे अनुक्रमांक १५०७, १५६०, २३४१, २३७७, २४६८ असे आहेत. यापैकी २४६८ संख्या असलेली प्रत तेलुगू लिपीतील आहे. इतर सर्व प्रती कन्नड लिपीतील आहेत. यापैकी २३७७ क्रमांकाच्या हस्तलिखितात तर कन्नड व्याख्या आहे.

कर्नाटक विश्वविद्यालयातील कन्नडशोध केंद्रामध्ये ताडपत्रावर लेख असलेली 'श्रीसिद्धान्तशिखामणी'ची प्रत आहे. या प्रतीचा क्रमांक २९४ आहे. या सर्व प्रतींचे आम्ही स्वत: अवलोकन केले आहे.

मद्रास येथील गव्हर्नमेंट ओरियण्टल मैन्युस्क्रिप्ट्स लायब्ररीच्या ताडपत्रसूचिनुसार असे लक्षात आले की, तेथे व्होल्युम १०, बुक नं. ५११९, ५१२०, वोल्युम ९, बुक नं. ५५५१ या तीन 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या प्रती उपलब्ध आहेत. या सर्व प्रती तेलुगू लिपीतील आहेत.

### 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे संस्कृत–प्राकृत टीकाकार

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या टीकाकारांमध्ये पदवाक्यप्रमाणपारावारधुरीण श्रीमरितोण्टदार्य सर्वप्रथम होत. त्यांचा कालखंड १७ व्या शतकातला मानला जातो. (वी.आ.चं., भूमिका, पृ. ३) यांनी संस्कृत भाषेत 'तत्त्वप्रदीपिका' नामक व्याख्या रचली. या व्याख्येसह 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे प्रथम प्रकाशन कन्नड लिपीमध्ये मैसूर येथील स्व.वै.वीरसंगप्प महोदयांनी केले होते. त्यानंतर सोलापूरचे स्व.वारद मलप्पा यांनी हा ग्रंथ दोन खंडांमध्ये देवनागरी लिपीमध्ये इसवी १९०५ मध्ये प्रकाशित केला होता.

श्रीवीरणाराध्य यांचा नातू सिद्धय्यांचा पुत्र सोसले रेवणाराध्य यांनी इ.स. १७ व्या शतकामध्ये 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावर 'सिद्धार्थबोधिनी' नावाची कन्नड व्याख्या लिहिली आहे.

मैसूर महाराजांच्या सभेतील विद्वान एन.आर. करिबसवशास्त्री यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावर 'तात्पर्यदीपिका' नावाची कन्नड व्याख्या केली आहे. हा ग्रंथ मैसूर येथून इ.स. १९१९ व १९२१ असा दोन वेळा प्रसिद्ध झाला आहे.

पं. काशीनाथशास्त्री यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावर 'भावप्रकाश' नावाची व्याख्या केली, जी मैसूर येथील श्रीपंचाचार्य मुद्रणालयाने प्रकाशित केली आहे. लोकप्रिय अशी ही व्याख्या इसवी सन १९७२ पर्यंत पाच वेळा मुद्रित झाली आहे.

मैसूर येथील श्री. एम. एल. नागण्णा यांनी मरितोण्टदार्यांच्या 'तत्त्वप्रदीपिका' व्याख्येचा कन्नड अनुवाद करून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ कन्नड लिपीमध्ये इसवी सन १९५९ मध्ये प्रकाशित केला.

प्रसिद्ध साहित्यकार डॉ. ज. च. नि. यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील सर्व श्लोकांचा कन्नड भाषेत पद्यात्मक अनुवाद केला. हा ग्रंथ 'मणिमुकुर' या नावाने प्रसिद्ध आहे. याशिवाय 'जीवनसिद्धान्त' या नावाने सहा खंडांमध्ये 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा प्रतिपाद्य विषय दीर्घ स्वरूपात निरूपिला आहे. हा ग्रंथ १९६९-१९७० इसवी मध्ये निठुमाडि पुस्तक भांडार, बेंगळुरू येथून पहिल्यांदा प्रकाशित झाला.

कर्नाटक राज्यातील विजापूरनिवासी ज्ञानयोग आश्रमाचे संस्थापक श्रीमल्लिकार्जुन स्वामी यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील श्लोकांचा कन्नड व मराठी भाषांमध्ये शब्दानुवाद आणि भावानुवाद केला आहे. हे दोन्ही स्वतंत्र प्रकाशित ग्रंथ आहेत. यापैकी कन्नड ग्रंथ इ.स.१९६६ मध्ये शिवानंद मठ, गदग या संस्थेने प्रकाशित केला आहे.

कर्नाटकातील चित्रदुर्ग येथील निजगुणसिद्ध पदवीने विभूषित एस. एम. सिद्धय्या यांनी 'श्रीरेणुकगीते' या नावाने भामिनीषट्पदी नामक कन्नड छंदामध्ये या ग्रंथाचा अनुवाद केला आहे. ही रचना सरळ, काव्यमय व सुमधुर आहे.

बेंगळुरू विश्वविद्यालयाचे संस्कृत विभागाध्यक्ष डॉ. एम. शिवकुमार स्वामी यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा इंग्रजी भाषेत अनुवाद केला आहे. १९६८ मध्ये 'श्रीरेणुकगीता' नावाने हा ग्रंथ प्रकाशित झाला. याशिवाय 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा काळ व सिद्धान्त यावर संशोधन पूर्ण 'श्रीसिद्धान्तशिखामणी': ओन्दु अध्ययन' या नावाने कन्नड भाषेत एक सुंदर लघुग्रंथ १९८७ मध्ये प्रकाशित केला आहे.

काशी विद्यापीठातील कन्नड विषयाचे प्राध्यापक डॉ. शान्तशर्मा (श्री ष. ब्र. श्रीपतिपण्डिताराध्य शिवाचार्य हिरेमठ) यांनी 'भावमंजूषा' नावाने हिंदी व्याख्या केली आहे. ती अजून प्रकाशन कार्यालयामध्ये आहे.

कर्नाटक प्रदेशातील गुलेद्‌गुड्डु अमरेश्वर मठातील आम्ही या ग्रंथावर दीर्घ अशी कन्नड व्याख्या केली आहे. श्रीगुरू अमरेश्वर प्रकाशन संस्थेद्वारे (अमरेश्वर मठ गुलेद्‌गुड्डु, जि. विजापूर, कर्नाटक) १०१ भागांमध्ये ही व्याख्या प्रकाशित करण्याचे योजिले आहे. या योजने अंतर्गत 'श्रीसिद्धान्तशिखामणी प्रवचनप्रभे' या नावाने सहा भाग प्रकाशित झाले आहेत. कन्नड व्याख्येचे ऊर्वरित क्रमशः दहा वर्षांमध्ये प्रकाशित होतील.

**श्रीमद्‌जगद्‌गुरू रेणुकाचार्यांची अवतारसमीक्षा**

भगवत्पादपूज्य श्रीरेणुकाचार्य व महर्षी अगस्त्य यांचा संवादस्वरूपी हा 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ होय. याबद्दल पूर्वीच विवेचन केले आहे. आता या आचार्यांचा अवतार कधी व कसा झाला, याचे विवेचन करणे आवश्यक आहे.

वीरशैवधर्माचे संस्थापक रेणुक-दारुक-घण्टाकर्ण-धेनुकर्ण-विश्वकर्ण नावाने पाच महाचार्य होते, ही आगमोक्ती प्रसिद्ध आहे. हे सर्व कैलासनिवासी शिवाचे प्रधान प्रमथगण होत. या आचार्यांपैकी रेणुक-दारुक हे दोन गणेश्वर चंद्रमौलीश्वराचे विश्वस्त व अन्त:पुराचे द्वारपाल होते.

गणेश्वरौ रेणुकदारुकावुभौ विश्वासभूतौ नवचन्द्रमौले:।
अन्त:पुरद्वारगतौ सदा तौ वितेनतुर्विश्वपतेस्तु सेवाम्।। सि.शि. २.३३

एकदा शुभ्र अशा कैलासावर रत्नजडित सिंहासनावर माता भवानीसह भगवान शिव तेहतीस कोटी देव सभोवती असलेल्या सभेत विराजमान होते. भगवान सर्वांच्या सेवांचा स्वीकार करून त्यांना अनुग्रहीत करीत होते, तेवढ्यात त्यांनी परमप्रिय रेणुकगणेश्वरास तांबुलप्रसाद घेण्यासाठी बोलाविले. भगवंताच्या बोलविण्याने आनंदित झालेल्या रेणुकगणेश्वराने समोरील दारुकगणास ओलांडले व ते शिवाजवळ पोहोचले. 'शम्भोराव्हान संतोषसंभ्रमेणैव दारुकम्। उल्लङ्घ्य पार्श्वगमल्लोकनाथस्य रेणुक:।।' (सि. शि. ३.३७) अशा प्रकारे भक्ताचे उल्लंघनाचा अपराध सहन करणारे शिव आज्ञा देतात:-

अविचारेण मद्भक्तो लंघितो दारुकस्त्वया।
एव त्वं रेणुकानेन जन्मवान् भव भूतले।। सि.शि. ३.७७

अविचारपूर्वक माझ्या भक्तास- दारुकास तू ओलांडले आहे. म्हणून हे रेणुक, तू भूतलावर जन्म घेशील. हे ऐकून रेणुकाने भगवान शिवाकडे पृथ्वीवर जन्म, मानवजन्म नको अशी कृपा करण्याची विनंती केली. अशा प्रकारे रेणुक गणेश्वराची प्रार्थना करणाऱ्या रेणुकास मनुष्यजन्माच्या भयापासून अभय प्रदान केले. त्यानंतर

श्रीशैलस्योत्तरे भागे त्रिलिंगविषये शुभे।
कोल्लिपाक्यभिधानोऽस्ति कोऽपि ग्रामो महत्तर:।।
सोमेश्वराभिधानोस्य तत्र वासवतो मम।

अस्पृशन्मानुषं भावं लिंगात् प्रादुर्भविष्यसि।।
मदद्वैतपरं शास्त्रं वेदवेदान्तसम्मतम्।
स्थापयिष्यसि भूलोके सर्वेषां हितकारकम्।।
मम प्रतापमतुलं मद्भक्तानां विशेषत:।
प्रकाशय महीभागे वेदमार्गानुसारत:।। सि.शि. ३.८३,८४,८६,८७

श्रीशैलपर्वताच्या उत्तर भागात त्रिलिंग प्रदेश आहे. त्या सुंदर प्रदेशात कोल्लिपाक नावाचे एक पुण्यक्षेत्र गाव आहे. तेथे मी सोमेश्वरलिंग नावाने विराजमान आहे. तू त्या लिंगातून मानवी स्पर्शाशिवाय प्रादुर्भूत होशील. त्यानंतर माझे वेदवेदान्तास संमत असलेले अद्वैत परमशास्त्र तू लोककल्याणाकरिता भूलोकावर स्थापन कर. माझ्या प्रभावामुळे व माझ्या भक्ताकरिता वेदमार्गाला अनुरूप हा सिद्धान्त पृथ्वीवर स्थापन कर अशी आज्ञा देऊन भगवान शिव माता पार्वती व नंदी आदी गणांसह अंत:पुराकडे गेले. रेणुकगणेश्वरानेसुद्धा शिवाज्ञेनुसार आंध्र प्रदेशातील कोल्लिपाक क्षेत्रातील सोमेश्वर लिंगातून अवतार घेतला. (सि.शि. ४.१)

शिवलिंगातून अवतरलेल्या रेणुकगणेश्वरांना पाहून तेथील आश्चर्यचकित झालेल्या लोकांना आश्वस्त करून स्वअवताराचे प्रयोजन सांगून रेणुक आकाशमार्गाने मलय पर्वताकडे गेले. (सि.शि. ४.९-१३). मलय पर्वतावर अगस्त्य ऋषींनी दिव्य दृष्टीद्वारे हे रेणुकगणेश्वर आहेत हे जाणून लोपामुद्रेने आणलेल्या जलाद्वारे शिवयोगी यांचे पादप्रक्षालन केले व यथोचित आदरातिथ्य केले. त्यानंतर प्रार्थना केली:-

स्थिरमद्य शिवज्ञानं स्थिरा मे तापसक्रिया।
भवद्दर्शन पुण्येन स्थिरा मे मुनिराजता।।
रेणुकं त्वां विजानामि गणनाथं शिवप्रियं।
अवतीर्णमिमां भूमिं मदनुग्रहकाङ्क्षया।।
त्वन्मुखाच्छ्रोतुमिच्छामि सिद्धान्तं श्रुतिसंगतम्।
सर्वज्ञ वद मे साक्षाच्छैवं सर्वार्थसाधकम्।। सि.शि. ४.४७,५०,५२

हे रेणुकगणेश्वरा, आपल्या दर्शनाने आज मी, माझे तप, शिवज्ञान, मुनिआचरण सर्व काही चिरंतन, शाश्वतरूपी झाले आहे. मी आपणास ओळखतो. आपण शिवप्रिय गणेश्वर रेणुक आहात आणि मला अनुग्रहीत करण्याकरिताच पृथ्वीवर

अवतरला आहात. आपल्या मुखातून श्रुतिसंमत असा सिद्धान्त श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. तेव्हा सर्व साध्य करून देणारा शैवसिद्धान्त मला शिकवून अनुग्रहित करा. अशा या प्रार्थनेनंतर विविध आगमांचा अभ्यास करून संदिग्ध झालेल्या महर्षी अगस्त्यांना कामिकादिवातुलान्त २८ आगमांचा उत्तरभाग असलेला वीरशैवसिद्धान्त रेणुकाचार्यांनी सविस्तर उपदेशिला. तोच उपदेश आज 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या नावाने प्रसिद्ध आहे. याप्रसंगी हा उपदेश ऐकून अगस्त्य महर्षी स्वजन्म साफल्याचे वर्णन करतात:-

अद्य मे सफलं जन्म गतो मे चित्तविभ्रम:।
संजाता पाशविच्छित्तिस्तपांसि फलितानि मे।। सि.शि. २०.७६

आज माझा जन्म यशस्वी झाला. आज माझ्या चित्तातील परस्परविरोध संपला. खरोखर सर्व पाशबंधनातून सुटून मला आपल्या मार्गदर्शनामुळे सर्व तपांचे फळ प्राप्त झाले आहे. तेव्हा रेणुक गणेश्वर म्हणतात, 'हे मुनिश्रेष्ठ अगस्त्य, तू सर्व लोकांमध्ये या शैवतंत्राची स्थापना कर, कारण यासारखे श्रेष्ठ साधन अन्यत्र नाही. मी याच कार्यासाठी पृथ्वीवर अवतरलो आहे आणि आता तू सुद्धा याच ज्ञानराशीला लोकांपर्यंत घेऊन जा. (सि.शि. २०.१३-१७) अशी आज्ञा देऊन रेणुकगणेश्वर अंतर्धान पावले. तेव्हा या 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या संदर्भावरून स्पष्ट होते की, रेणुकागस्त्यामध्ये गुरुशिष्यभाव आहे. म्हणून तर भगवत्पाद पूज्य श्रीनीलकण्ठ शिवाचार्य म्हणतात:-

अगस्त्यो जैमिनिश्चैव विश्वामित्रोऽथ काश्यप:।
भरद्वाजोऽङ्गिरा अत्रिर्वसिष्ठो रोमहर्षण:।।
एते सर्वे महाभागा अतिवर्णाश्रमे रता:।
वीरशैवा: समाख्याता जीवन्मुक्ता न संशय:।। क्रि.सा. भाग १, पृ. १२

अगस्त्य, जैमिनी, विश्वामित्र, कश्यप, भरद्वाज, अंगिरा, अत्री, वसिष्ठ व रोमहर्ष हे सर्व अतिवर्णाश्रमात रममाण होते. त्यांना वीरशैव जाणावे. ते जीवन्मुक्त होत, यात लेशमात्रही संशय नाही. अशाप्रकारे वीरशैव महर्षी पंक्तीत अगस्त्य हे सर्वप्रथम होत. शिवसिद्धान्ताचे महान अभ्यासक असलेल्या महर्षी अगस्त्यांनी रेणुकाचार्यांच्या आज्ञेनुसार स्वत: श्रवण केलेल्या शैवसिद्धान्ताच्या प्रचारासाठी बादरायण सूत्रावर वीरशैव सिद्धान्तास अनुसरून वृत्तीची रचना केली.

अगस्त्यमुनिचन्द्रेण कृतां वैयासिकीं शुभाम्।
सूत्रवृत्तिं समालोक्य कृतं भाष्यं शिवङ्करम्।। श्री.भा., मंगलश्लोक १७

अशी एक कारिका 'श्रीकरभाष्या'मध्ये आलेली आहे.

श्रीपतिपंडिताराध्यांनी अगस्त्यवृत्तीचे उदाहरण दिले आहे. 'ब्रह्मसूत्र श्रीकरभाष्या'त अगस्त्यमुनिरचित लघुसूत्रवृत्तीमध्ये 'लिंगे सुषुप्तिः' इत्यादी ठिकाणी घट-कुंभ हे जसे पर्यायवाची शब्द आहेत तसे ब्रह्म आणि लिंग हे शब्द पर्यायवाची मानले आहेत. लिंग हा शब्द ब्रह्माचा पर्यायवाची असल्यामुळे दहरादी सर्व विद्यांचे उपास्य मानला जातो. मर्त्यलोक व शिवलोकांदरम्यान राहणारे दहरादी विद्यांचे उपासक मानले जातात. म्हणजे मर्त्यलोक-दहरादी लोक-शिवलोक असा शिडीसारखा मार्ग मानला जातो. अगस्त्यवृत्तीचेच नाव 'मुनिचंद्रवृत्ती' असे आहे. ही वृत्ती कुंभकोणमध्ये आहे, असे म्हटले जाते. पूज्य विद्वान भट्टोजी दीक्षित यांनी 'तेनातप्ततनुरज्ञ इत्यादिना- आप्नुयाल्लिंगमुत्तमम्' या वचनाद्वारे श्रीरेणुकाचार्यांनी अगस्त्य महर्षींस लिंगधारण हे किती पवित्र आहे, हे सांगितले आहे. वरील उक्तीमुळे अगस्त्यांना भगवद्पाद रेणुकांनी उपदेश केला याचे समर्थन केले गेले आहे. भगवद्पादाचार्यांच्या आदेशाने अगस्त्यांनी वीरशैव शास्त्राचा प्रचार केला यात शंकेला अजिबात थारा नाही.

## अगस्त्यमुनींचा देश आणि काल

'श्रीकरभाष्य'भूमिकेमध्ये श्री. एम.जी. नंजुण्डाराध्य यांनी अगस्त्य ऋषींना अनुसरून बंगाल प्रांतातील ओ. सि. गांगुली यांनी लिहिलेला लेख 'पूर्वकालीन द्वीपानंतर संचारी अगस्त्य' याचा संदर्भ देऊन व फ.गु. हळकट्टी यांनी लिहिलेल्या कन्नड लेखाचा सार ग्रहण केला आहे. त्याचा अंश असा- गांगुली यांच्या मते अगस्त्य हे पूर्वी वाराणसीमध्ये निवास करीत होते. तेथून ते विंध्य पर्वत ओलांडून दक्षिणेकडे गेले. तेथे नाशिक भागात त्यांनी आश्रम उभारला. तेथील वातापी व इल्वल नावाच्या राक्षसांचा महर्षींनी केवळ संकल्पानेच नाश केला. 'जीर्णस्ते जाठरे वह्नौ दृप्तौ वातापिदानवः।३ (सि.शि. ४.४०)

तेथून पुढे अगस्त्यांनी दक्षिणेतील पाण्ड्य राज्यात प्रवेश करून राजगुरू पदवी प्राप्त केली. त्याच ठिकाणी त्यांनी 'अगति' नावाने तमिळ व्याकरण ग्रंथ रचला

होता. कन्याकुमारीनजीकच 'पोधीय' पर्वतामध्ये अगस्त्य लुप्त झाले व तेथेच तपश्चर्या करीत आहेत, असा द्रविडांचा विश्वास आहे. तेथून ते सागरमार्गाने कम्बोडिया द्वीपास गेले. याचे पौराणिकांनी सप्तसागरपान असे वर्णन केले. 'आचान्ता भवता पूर्वं पङ्कशेषा: पयोधय:' (सि.शि. ४.४०)

कम्बोडिया येथील 'अङ्कोरवाट' शिलालेखात आर्य देशातील कोणी अगस्त्य नामक ब्राह्मण कम्बोडिया द्वीपामध्ये येऊन शिवयोगसिद्ध होऊन अलौकिक शक्तींद्वारे भद्रेश्वराची पूजा करीत होता, असा स्पष्ट उल्लेख आहे.

जावा देशातील पूर्वभागात 'दिनमया' नावाच्या गावाजवळ कोणत्या तरी राजाने इ.स.पूर्व ७६० मध्ये अगस्त्य यांची मूर्ती कोरली आहे. तेथे अगस्त्यांना 'शिवगुरू' भट्टारकगुरू, इत्यादी नावाने संबोधले आहे.

फ.गु. हळकट्टी यांच्या मतानुसार अगस्त्य ऋषींची जन्मभूमी कर्नाटक राज्यातील 'कलश' नावाचे गाव आहे (चिक्कमंगळूर जिल्हा). या गावातसुद्धा अगस्त्याचे स्मारक आहे. हेच त्यांच्या कुंभसंभव इत्यादी पौराणिक वर्णनांचे मूळ आहे. 'ददर्श स महायोगी मुनिं कलशसम्भवम्।' (सि.शि. ४.३३,). गांगुली यांच्या मते, मलय पर्वत सुमात्रा द्वीपात आहे. परंतु हळकट्टी महोदयांनी त्यांचे खंडन करीत हा मलय पर्वत दक्षिण भारतातील श्रीरेणुकाचार्यांच्या रंभापुरी पीठाजवळ आहे, असे मत मांडले आहे. त्यांनी अगस्त्य महर्षींना आद्य रेणुकाचार्यांनी तत्त्वोपदेश केला, हे निश्चितपणे स्पष्ट करून अगस्त्यांचा कालखंड इ.पू.७८० असा मांडला आहे. (श्री.भा., भूमिका, पृ. १४४-१४५, मैसूर वि.वि. प्रकाशनम्, १९७७)

**श्रीरेणुकाचार्यांची तीन कोटी आचार्यरूपधारणलीला**

अगस्त्य ऋषींना वीरशैवशास्त्राचा उपदेश केल्यानंतर निर्मळ, स्वेच्छाचारी परमपवित्र रेणुक गणेश्वर लंकानगरीत गेले. आचार्यांना विभीषणाने स्वतःच्या घरी नेऊन आसनावर विराजमान करून अर्घ्यपाद्य इत्यादी पूजासाहित्यांनी त्यांची पूजा केली.

> कृतार्था मे पुरी ह्येषा कृतार्थो राक्षसान्वय:।
> जीवितं च कृतार्थं मे यस्य त्वं दृष्टिगोचर:।। सि.शि. २१.११

आज माझी नगरी, राक्षसवंश, माझे जीवन आपल्या कृपाकटाक्षाने धन्य झाले आहे, अशी प्रार्थना करून विभीषणाने स्वत:चे दु:ख आचार्यांपुढे व्यक्त केले. हे, गणेश्वरा, माझा भाऊ रावण याने लंकानगरीत नऊ कोटी लिंगस्थापनेचा संकल्प केला होता. त्यापैकी सहा कोटी लिंगस्थापना झाल्यावर स्वचारित्र्यापासून भ्रष्ट झालेल्या रावणाचा विष्णु-अवतारात श्रीरामांनी वध केला आहे. रणांगणावर गतप्राण होत असलेला रावण माझ्याकडे पाहून म्हणाला:-

कोटिषट्कं तु लिंगानां मया साधु प्रतिष्ठितम्।
कोटित्रयं तु लिंगानां स्थापनीयमतस्त्वया।। सि.शि. २१.२७

असे म्हणून तो पंचत्वात लीन झाला. तेव्हापासून या कार्यासाठी मी चिंतातुर आहे हे मनोरथ पूर्ण करावे, असे मी निवेदन करतो. तेव्हा रेणुक गणेश्वराने पौलस्त्यांच्या सिद्धीसाठी तीन कोटी आचार्यांचे रूप धारण करून शास्त्रोक्त पद्धतीने तीन कोटी लिंगांची स्थापना केली. (सि.शि. २१.३३)

विभीषणाचे मनोरथ पूर्ण केल्यानंतर श्रीरेणुक गणेश्वर आकाशमार्गाने मार्गक्रमण करीत असताना अनेक सद्भक्तांना कृपाकटाक्षाने कृतकृत्य करून यंत्रमंत्रादी चौसष्ट कलांमध्ये पारंगत कापालिक इत्यादी परमतवाद्यांचे स्वसामर्थ्याने खंडन करून कामिकादिशिवागमांचा सिद्धान्त स्थापन करून ते कोल्लिपाक नगरीत येऊन

त्वदाज्ञया मयैतावत्कालमात्रं महीतले।
अचारि भवदुक्तानामागमानां प्रसिद्धये।।
अत:परं स्वरूपं ते प्राप्तुकामोऽस्मि शङ्कर।
अन्तरं देहि मे किञ्चिदनुकम्पाविशेषत:।। सि.शि. २१.४९-५०

श्रीरेणुकाचार्यांनी श्रीसोमेश्वरलिंगास प्रार्थना केली की, आपल्या आज्ञेनुसार एवढा काळ मी पृथ्वीवर राहिलो. आपल्याकडून निर्माण केलेल्या आगमांची प्रचार-प्रसिद्धी केली. आता मी आपल्या स्वरूपास प्राप्त होऊ इच्छितो. कृपया माझ्यावर अनुग्रह करून मला धन्य करावे.

तेव्हा शिवलिंगातून एक ध्वनी आला की, 'हे मुला, तुझ्या भक्तिभावाने मी प्रसन्न झालो आहे.' सोमेश्वर लिंगातून निर्माण झालेला ध्वनी ऐकणारे शिवयोग्याद्वारे स्तुती गायली जात आहे असे रेणुकाचार्य ज्योतिस्वरूपी सोमेश्वर लिंगात एकरूप झाले. (सि.शि. २१.५१-५२)

या क्रमाने रेणुकाचार्यांनी शिवाज्ञेनुसार सोमेश्वरलिंगातून अवतार, अगस्त्य महर्षींना उपदेश, विभीषणाच्या प्रार्थनेनुसार तीन कोटी आचार्य स्वरूपधारणा, तीन कोटी लिंगस्थापना, स्वावतार कार्यपूर्तता, पुन्हा सोमेश्वर लिंगामध्ये ऐक्य इत्यादी सर्व आचार्यांच्या अवतारलीला 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये वर्णिलेल्या आहेत. अशा प्रकारे असामान्य लिंगातून जन्म व पुन्हा लिंगैक्य यावरून आचार्यांचे दिव्यत्व प्रत्ययास येते. वीरशैव प्रसिद्ध शरणी अक्कमहादेवी आपल्या कन्नड वचनात म्हणतात–

लिंगदिन्दुदयिसि, अंगविडिदिप्प पुरातनर
इंगितवनेनेन्दु बेसगोम्बिऱ्यया?
अवर नडेये आगम, अवर नुडिये वेद
अवर लोकद मानवरेन्दन्नबहुदे अय्या?
अदेन्तेन्दडे साक्षि
'वृक्षाद्भवति बीजं हि तद्वृक्षे लीयते पुनः।
रुद्रलोकं परित्यक्त्वा शिवलोके भविष्यति।।'
यन्दुदागि,
अंकोलेय बीजदिन्दायित्तु वृक्षव
आ वृक्ष मरलि आ बीजदोलडगित्तु
आप्रकारदल्लि लिंगदोलगिन्द पुरातनरुद्भविसि
मरलि आ पुरातनरु आलिंगदोलगे बेरसिदरू नोडिऱ्यया
इन्तप्प पुरातनरिगे नानु शरणेन्दु हुट्टगेट्टेनय्या,
चन्नमल्लिकार्जुना।

('महादेवियक्कनवचनगळु' संख्या ९३, कर्नाटक वि.वि. प्रकाशन, १९७३)

प्रस्तुत वचनामध्ये अगदी रेणुकाचार्यांसारखेच लिंगातून उत्पत्ती व त्यात लय या क्रियांचे दृष्टांत देऊन सुंदर रीतीने अक्कमहादेवी वर्णन करतात. प्रस्तुत कन्नड वचनाचा अभिप्राय असा– जसे बीज वृक्षापासून उत्पन्न होते व पुन्हा व पुन्हा वृक्षात विलीन होते. तद्वत् आचार्यसुद्धा शिवलिंगातून उत्पन्न होऊन पुन्हा शिवलिंगात लीन होतात. अशा दिव्य आचार्यांचे वचन वेद होत तर त्यांचे आचरणच आगम होत. यांना नमस्कार करणारा मी भवरोगापासून मुक्त आहे. अशा प्रकारे दिव्य

आचार्यांचे माहात्म्य व त्यांनी स्थापन केलेल्या वीरशैवधर्माची श्रेष्ठता प्रतिपादन केली आहे.

### रेणुकाचार्य किती?

वीरशैवाचार्य परंपरेत रेणुक, रेवण, रेवणसिद्ध, रेवणसिद्धेश्वर या नावाचे आचार्य प्रसिद्ध आहेत. या सर्वांचा कालखंड वेगवेगळा आहे. श्रीरेणुकाचार्यांनी अगस्त्य ऋषींना शिवाद्वैत सिद्धान्ताचा उपदेश केला. विभीषणाच्या प्रार्थनेनुसार लंकेत रावणाच्या संकल्पानुसार तीन कोटी शिवलिंगस्थापना या सर्वांचा उल्लेख श्री'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये येतो. यापैकी प्रथम आचार्य रेणुक यांचा काल अगस्त्य व विभीषण यांचा काल होता. हेच आद्य आचार्य होत. हरिभद्रसूरींच्या 'षड्दर्शन समुच्चय' नामक ग्रंथाच्या व्याख्येत मणिभद्रसूरींनी

> उत्पल: कारिकां वेत्ति तन्त्रं वेत्ति प्रभाकर:।
> वामनस्तूभयं वेत्ति न किञ्चिदपि रेवण:।। ष.स., पृ. ४

याप्रमाणे उत्पल, प्रभाकर, वामन इत्यादी दार्शनिकांसोबत 'रेवण' हे नाव उल्लेखित करून मणिभद्रसूरींच्या पूर्वाचार्यांचे समकालीन होते असे लक्षात येते. हे द्वितीय आचार्य होत.

आता तिसरे रेवणसिद्ध नावाचे आचार्य यांच्याकडून आद्य शंकराचार्यांना चंद्रमौळीश्वरलिंग व रत्नगर्भगणपती प्रदान करण्यात आला, असा उल्लेख गुरुवंशकाव्य, शिवतत्त्वरत्नाकर इत्यादी ग्रंथांमध्ये स्पष्टपणे केला आहे. श्रीशृंगेरी मठाचे विद्वान काशीलक्ष्मणशास्त्री यांनी

> श्रीचन्द्रमौलीश्वरलिंगमस्मै सद्रत्नगर्भं गणनायकं च।
> स विश्वरूपाय सुसिद्धदत्तं दत्वा न्यगादिच्चिरमर्चयेति।।
>
> (गु.वं.का., ३.३३)

आदिशंकरांच्या नित्यार्चनेकरिता रेवणसिद्ध महायोगी श्रीचंद्रमौलीश्वरलिंग व सद्रत्नगर्भ गणपती स्वशिष्य श्रीसुरेश्वराचार्य यांच्याद्वारे शंकराचार्यांना दिला, असे 'गुरुवंशकाव्या'तील शंकरचरित्रात वर्णन केलेले आहे. उपरोक्त श्लोकावर व्याख्या करताना 'सुसिद्धेन'– 'रेवणसिद्धमहायोगिना' 'सुसिद्ध' अर्थात् 'रेवणसिद्धमहायोगी' अशी सुसिद्ध या पदाची व्याख्या केली आहे.

आचार्य बलदेव उपाध्याय यांनी संपादित केलेल्या 'शंकरदिग्विजय' ग्रंथाच्या परिशिष्टामध्ये 'गुरुवंशकाव्या'चे वैशिष्ट्य देत असताना रेवणसिद्ध महायोगीद्वारा प्राप्त चंद्रमौलीश्वरलिंग व रत्नगर्भगणपती यांचा वृत्तांत सविस्तृत नमूद केला आहे ('शंकरदिग्विजय' परिशिष्ट क, पृ. ५८६-५८८ हरिद्वार प्रकाशन).

याशिवाय केळदीबसवभूपाल यांनी 'शिवतत्त्वरत्नाकर' नावाच्या ग्रंथामध्ये

ततः स रेवणसिद्धसम्प्रदाय प्रवर्तितानाम्।
शङ्कराचार्यवर्याणां पारम्पर्यक्रमागतम्।।
संन्यासिनमुपाश्रित्य विनयावनतोऽधिकम्।
वृत्तांतमखिलं तस्मै यतये स्वं व्यजिज्ञपत्।।
इत्युक्तेनार्थितस्तेन स संन्यासमुपादिशत्।
विद्यारण्य इति प्रादादाख्यां तस्मै ततः परम्।।
रेवणासिद्धसम्प्राप्तं चन्द्रमौलीशमप्यदात्।
आख्याच्चानेन लिंगेन तवाभीष्टाप्तिरित्यपि।।

शि.त.र. ४.१२.९,१०, २२,२३

रेवणसिद्ध महायोगींनी आद्यशंकराचार्यांना चंद्रमौलीश्वरलिंग प्रदान केले व तेच परंपरेने श्रीविद्यारण्यस्वामींना प्राप्त झाले, असा विषय उल्लेखिला आहे. तेच लिंग आजसुद्धा शृंगेरीपीठामध्ये परंपरेने आचार्यांकडून पूजिले जाते. यावरून आद्य शंकराचार्यांच्या काळामध्ये एक रेवणसिद्ध नावाचे वीरशैवाचार्य होते, हे स्पष्ट होते. 'शिवरत्नाकर' ग्रंथाच्या इंग्रजी अनुवाद भूमिकेमध्ये प्रसिद्ध पुरातत्त्वशास्त्राचे विद्वान हो. कृष्णशास्त्री यांनी रेवणसिद्ध हे वीरशैवाचार्य (लिंगायत) संप्रदायाचे आचार्य होते. "We know Revansiddha is a well known Saiva teacher, whom the Lingayatas still claim as one of their earliest acharyas") (Sivatattva Ratnakar, P-10, Publisher- B.M. Nath & Co. Vepery, Madras, 1927).

इ.स.च्या ११ व्या शतकामध्ये रेवणसिद्धेश्वर नावाचे आचार्य झाले होते, ते एकशे सात वर्षांपर्यंत आयुसंपन्न होते. त्यांचे स्थान महाराष्ट्रातील सोलापूरजवळ भीमानदीतीरावरील मासणूर (माचनूर) हे ग्राम होय. यांच्याच कृपेने वयाच्या साठाव्या वर्षी सुगलादेवी यांच्या उदरातून सोलापूरच्या सिद्धरामेश्वरांचा जन्म

झाला, असे सिद्धरामचरित्रातून स्पष्ट होते (सिद्धरामशिवयोगी, पृ. ७५). याच आचार्यांनी मासणूरनजीकच्या गावातील लोकांना त्रास देणाऱ्या यक्षदांपत्याचा संहार केला होता. कोल्हापूरनरेश गोरक्षनाथ यांचे गर्वहरण केले होते व कांची येथील वरदराजमूर्तीचे कंपित मस्तक स्थिर केले, हे इतिहासात नमूद आहे (शिवांक, पृ. ३५०-३५५, कल्याण, गोरखपूर, १९९० वि. संवत्).

अशाप्रकारे रेणुक, रेवण, रेवणसिद्ध, रेवणसिद्धेश्वर या नावाचे आचार्य वेगवेगळ्या कालखंडांत होऊन गेले, असे स्पष्ट होते. हेसुद्धा सत्य आहे की, बाराव्या शतकानंतरच्या वीरशैव साहित्यकारांनी या चौघांचे चरित्रचित्रण एकत्रित करून लिहिले आहे. यामुळे एकाच रेणुकाचार्यांची रेवण, रेवणसिद्ध, रेवणसिद्धेश्वर ही पर्यायी नावे आहेत का? असा संभ्रम निर्माण केला आहे. परंतु सत्य असे नाही हे विद्वानांच्या लक्षात येईलच.

याप्रमाणे 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाच्या परिचयासंदर्भात अनेक विषय येथे बुद्धिसामर्थ्यानुसार सप्रमाण प्रस्तुत केले आहेत. या सर्वांवरून श्रीसिद्धान्त-शिखामणिविषयक सर्व जिज्ञासूंचे समाधान होईल.

□□

तिसरा परिच्छेद

# ईश्वरस्वरूप विमर्श

**श्रीरेवणाराध्याय नमः।**

काही लोक भारतीय दर्शनांनी जगाची उत्पत्ती, स्थिती आणि संहार यांची व्यवस्था करण्यासाठी, जीवाच्या अदृष्टानुरूप सुखदुःखरूप फलप्रदानासाठी आणि वेदांचे प्रामाण्य सिद्ध करण्यासाठी आपल्यापेक्षा विलक्षण, सर्वज्ञत्वादी गुणगणसमूहान्वित ईश्वर आवश्यक आहे म्हणून अनेक प्रमाणांद्वारा ईश्वराचे अस्तित्व सिद्ध केले आहे, असे मानतात. आता वीरशैवदर्शनामध्ये ईश्वराचा अंगीकार कशासाठी केला आहे आणि ईश्वराचे स्वरूप काय आहे यासंबंधी विवेचन करावे लागेल.

वीरशैवदर्शनामध्ये ईश्वरतत्त्व स्थल, लिंग, परशिव इत्यादी नावांनी ओळखले जाते. हे परशिवतत्त्व सगुण (सकल) आणि निर्गुण (निष्कल) असे द्विविध आहे. परशिव शक्तीच्या संकोचावस्थेत निर्गुण तर शक्तीच्या विकासावस्थेत सगुण असतो. 'ब्रह्मसूत्रभाष्य'कार श्रीपतिपंडिताराध्य भगवत्पाद याबाबतीत म्हणतात:-

सृष्टेः पूर्वं महादेवः शक्तिसंकोचहेतुना।
निर्गुणत्वेन शास्त्रेषु गीयते तत्त्ववेदिभिः।।
सृष्ट्यादौ परमेशस्य शक्तेः प्राचुर्यवैभवात्।
सर्वज्ञत्वादिकल्याणगुणवानिति कीर्त्यते।। श्री.भा. १.३.७

अर्थात् सृष्टीपूर्वी भ.शिव आपल्या शक्तीला संकुचित करतात म्हणून शास्त्रात त्यांना निर्गुण म्हणतात. सृष्टीच्या आरंभी परमेश्वराच्या शक्तीची प्रचुरता वाढल्याने व सर्वज्ञतादी कल्याणगुण उदित झाल्यामुळे परशिवाला सगुण म्हणतात. यालाच वीरशैवदर्शनामध्ये सकल आणि निष्कल असेही म्हणतात. म्हणून वीरशैवदर्शनात 'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्', 'अस्थूलमनण्वमन्हस्वदीर्घमलोहितम्' इत्यादी शब्दादी गुणांचा निषेध करणाऱ्या श्रुतिवचनांचा संबंध शक्तिसंकोचकालातील सृष्टिविमुख परमेश्वराच्या स्थितीशी असतो, तर 'स ईषां चक्रे' व 'तदैक्षत बहुस्यां प्रजायेय'

इत्यादी सगुण श्रुतिवचनांचा संबंध शक्तिविकासकालातील सृष्ट्युन्मुख परमेश्वराच्या स्थितीशी असतो.

येथे एक बाब लक्षात घ्यावी लागेल ती अशी की, अद्वैतवेदान्तात निर्गुण ब्रह्माला निर्विशेष म्हणतात तसे वीरशैवदर्शनात मानत नाहीत. इथे निर्गुण परशिव निर्विशेष नाही. स्वरूपस्थ अवस्थेमध्ये परशिवात शक्तीच्या ज्ञानादी गुणांच्या विकासाच्या अभावामुळे तो परशिव निर्गुण मानला जातो; पण तेथे सूक्ष्मरूपाने शक्ती असतेच. त्यामुळे त्यास सविशेष म्हणतात. हे अद्वैतवेदान्तापासून वेगळे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये रेणुकभगवत्पादाचार्य म्हणतात:-

परिच्छेदकथाशून्यं प्रपंचातीतवैभवम्।<br>
प्रत्यक्षादिप्रमाणानामगोचरपदे स्थितम्।।<br>
स्वप्रकाशं पराकाशमनौपम्यमनामयम्।<br>
सर्वज्ञं सर्वगं शान्तं सर्वशक्तिनिरंकुशम्।। २.४-५

अर्थात् त्या परशिव परब्रह्माचे देश-वस्तु-कालानुसार परिच्छेद होत नाहीत. ते प्राकृतिक प्रपंचाच्या पलीकडले आणि प्रत्यक्ष-अनुमानादी प्रमाणांना अगोचर आहे. ते स्वयंप्रकाशित, जन्ममरणादी दोषांपासून मुक्त, उपमातीत, सर्वज्ञ, सर्वांतर्यामी, रागद्वेषविरहित, शांत, सर्वसामर्थ्यवान, सर्वव्यापी असून त्यांच्यावर कोणाचाही अधिकार नाही. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये याप्रमाणे तो शक्तिमान असल्याचे सूचित केले आहे.

### शक्तीचे स्वरूप

'महार्थमंजरी' ग्रंथावरील 'परिमल' टीकेत वर्णन केले आहे:-

औष्ण्यं हुताश इव शीतलिमानमिन्दौ<br>
शय्यासु मार्दवमिवाश्मसु कर्कशत्वम्।<br>
बाह्येषु मोह इव योगिषु च प्रबोध:<br>
स्वातंत्र्यमस्ति हि नियंत्रयितुमहन्मे।।

अर्थात् अग्नीमध्ये उष्णता, चंद्रात शीतलता, शय्येत मृदुता, लोहात कर्कशता, बाह्य वस्तूंमध्ये मोह, योगिजनांमध्ये प्रबोध ज्याप्रमाणे राहतो, त्याप्रमाणे सर्व

जगाचे नियंत्रण करणाऱ्या माझ्यामध्ये निरवधिक स्वातंत्र्य आहे, असे भ. शिव म्हणतात.

सृष्टीतील प्रत्येक पदार्थ हा शक्तिविशिष्ट आहे. हे जगत् व याचा निर्माता शिव शक्तिविशिष्ट आहे, यात मुळीच शंका नाही. शक्तीचे स्वरूप काय, याचे विवेचन करताना शिवयोगी शिवाचार्य 'तदीया परमा शक्तिः सच्चिदानंदलक्षणा', 'गुणत्रयात्मिका शक्तिर्ब्रह्मनिष्ठा सनातनी' इत्यादी श्लोकांमधून शक्तीचे वर्णन करतात की, ही शक्ती सच्चिदानंदरूपिणी आहे. सत्त्व, रज, तम या गुणांनी युक्त असून सनातन आहे, ब्रह्मनिष्ठ आहे. ही शक्ती दोन प्रकारची आहे. एक अविभागपरामर्शा व दुसरी विभागपरामर्शा. विभागपरामर्शदशेत ती प्रपंचोत्तीर्ण व सच्चिदानंदस्वरूपिणी असते. अविभागपरामर्शदशेत 'अस्मि प्रकाशे नन्दामि' असा जो अनुभव आहे तीच परशिवाची विमर्शशक्ती होय. विभागपरामर्शदशेत ती प्रपंचात्मक असते. जगताच्या निर्मितीसाठी गुणांची आवश्यकता असते. निर्मितीसाठी रजोगुणाला, पालनासाठी सत्त्वगुणाला व संहारासाठी तमोगुणाला अंगीकृत करून हा व्यवहार शिव सांभाळतात. गुण हे शक्तीचेच असल्याने यात शक्तीचा अंगीकार केला जातो. कारण परामर्शस्वरूपाचा अनुभव शिवामध्ये नसेल तर तो स्वप्रकाश असूनही त्याचे ज्ञान–भान होत नाही तसा प्रकार होईल. शिवाचे सच्चिदानंदपद व्यर्थ होईल म्हणून परशिवामधील विमर्शशक्तीचा अंगीकार अवश्य मानावा लागेल. म्हणूनच शिवयोगी शिवाचार्य शक्तिस्तुती करताना 'वन्दे तां परमानंद प्रबोधलहरीं शिवाम्' असे म्हणून वंदन करतात. इथे त्यांनी शक्तीला परमानंद शिवाची 'प्रबोधलहरी' मानले आहे. हीच शक्ती जगताच्या उत्पत्तीच्या वेळी इच्छा, ज्ञानादी रूपांनी विभागपरामर्शदशेला प्राप्त होऊन सत्वादी त्रिगुणात्मिका माया होते. याप्रमाणे वस्तुतः शक्ती सच्चिदानंदरूपिणी असून माया तिचे परिणत रूप आहे. त्याच विमर्शशक्तीला चिच्छक्तीसुद्धा म्हणतात. चंद्रामध्ये चंद्रिका असावी तशी ही परिशिवनिष्ठ आहे. ती शक्ती विश्ववैचित्र्य निर्माण करते. शक्तीच्या सामर्थ्यानेच परशिवस्वरूप ब्रह्माला विश्वभाजन ही संज्ञा प्रदान केली जाते. ज. रेणुकभगवत्पादाचार्य 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हणतातः–

विमर्शाख्या पराशक्तिर्विश्ववैचित्र्यकारिणी।
यस्मिन् प्रतिष्ठिता ब्रह्म तदिदं विश्वभाजनम्।।

यथा चन्द्रे स्थिरा ज्योत्स्ना विश्ववस्तुप्रकाशिनी।
तथा शक्तिर्विमर्शाख्या प्रकाशे ब्रह्मणि स्थिरा।। २०.३६,३८

चित्रविचित्र विश्वाची उत्पत्ती करणारी विमर्शनामक पराशक्ती ज्याच्या ठिकाणी अविनाभावसंबंधाने प्रतिष्ठित असते ते परब्रह्मच विश्वभाजन होय. चंद्रामध्ये स्थिर राहणारे चांदणे एका ठिकाणी चंद्रामध्ये असले तरी ते जसे जगाला प्रकाशित करते त्याप्रमाणे परशिवब्रह्मात अविनाभावसंबंधाने राहणारी विमर्शात्मक शक्ती आपल्या एका अंशाने सर्व विश्वाला प्रकाशित करते.

### शक्तिसद्भावासाठी प्रमाण

स्वरूपाच्या अतिरिक्त अशी शक्तिनामक वस्तू काय आहे? शक्तीच्या अस्तित्वासाठी काय प्रमाण आहे, याविषयी लोकानुभवानुसार व वेदप्रामाण्यानुसार शक्तीचा स्वीकार केला जातो. लोकव्यवहारात आपण अग्नी दाहयुक्त पाहतो. तोच अग्नी मणी, मंत्र किंवा औषधप्रयोगाच्या सान्निध्याने दाहरहितही असल्याचे अनुभवतो. त्याचप्रमाणे उंदराने कुरतडलेले धान्याचे बी दुसऱ्या बियांसारखे दिसते पण ते जमिनीत पेरल्यावर उगवत नाही.

शक्ती आणि शक्तिमान या दोहोत अत्यंतभेद नाही व अत्यंत अभेदही नाही. म्हणून दोघांत भेदाभेदसंबंध मानला जातो. यासाठी पुढील प्रमाण आहे. 'परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च' (श्वे.उ. ६.८), न शिवेन विना शक्तिः न शक्ति रहितः शिवः' (वी.आ.चं. पृ. ७)

### शिव–शक्तिसंबंध

काही दार्शनिक शिव व शक्ती यांच्यात समवायसंबंध मानतात, तर काही त्यांच्यात तादात्म्यसंबंध मानतात. शिवाद्वैतसिद्धान्तात यांच्यात अविनाभावसंबंध मानतात. विनाभाव म्हणजे एका तत्त्वाशिवाय दुसऱ्याचे अस्तित्व मानणे. अविनाभाव म्हणजे एका तत्त्वाशिवाय दुसरे तत्त्व न राहणे. पूज्य आचार्य मरितोंटदार्य म्हणतातः–

न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः।
पुष्पगंधवदन्योन्यं मारुताम्बरयोरिव।। वी.आ.चं. पृ. ७

अर्थात् शिवाविना शक्ती नसते तसेच शक्तीविना शिव नसतो. पुष्प आणि गंध जसे एकमेकाशिवाय राहू शकत नाहीत, जसे वायू आणि आकाश एकमेकाशिवाय

राहू शकत नाहीत; तसेच शिव आणि शक्ती एकमेकाशिवाय राहू शकत नाहीत. ज. रेणुकभगवत्पादाचार्य 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये चंद्रचंद्रिका दृष्टान्ताने हे स्पष्ट करतात:-

यथा चन्द्रे स्थिरा ज्योत्स्ना विश्ववस्तुप्रकाशिनी।
तथा शक्तिर्विमर्शाख्या प्रकाशे ब्रह्मणि स्थिरा।। २०.३८

जसे पुष्प व गंध, वायू आणि आकाश, तसेच चंद्र व चंद्रिका इत्यादी दृष्टांतांनी शिव-शक्तीमध्ये अत्यंतभेद नाही व अभेदही नाही, तर यांच्यात भेदाभेदसंबंध मानला आहे. केवलावस्थेत विमर्शशक्ती शिवाशी अभिन्न होऊन राहते तर लीलावस्थेत तीच शक्ती क्षुभित होऊन विश्वाकार होते. म्हणून शिवाहून भिन्न दिसते. अर्थात् शिव-शक्तीमध्ये अवस्थाभेदाने तसेच कालभेदाने भेदाभेदसंबंध सिद्ध होतो. म्हणूनच 'कूर्मपुराणा'मध्ये म्हटले आहे:-

एषा शक्तिः शिवा ह्येतत् शक्तिमानुच्यते शिवः।
शक्तिशक्तिमतोर्भेदं वदन्ति परमार्थतः।।
अभेदं चानुपश्यन्ति योगिनस्तत्त्वचिंतकाः।

परमेश्वराच्या या शक्तीला 'शिवा' असे म्हणतात व परमेश्वराला शिव असे म्हणतात. अर्थात् दोघात परमार्थतः भेद आहे तर योगी व तत्त्वचिंतक यांच्यात अभेद पाहतात. कविकुलगुरू कालिदास आपल्या 'रघुवंश' महाकाव्याच्या पहिल्या सर्गाच्या पहिल्या श्लोकात

वागर्थाविव सम्पृक्तौ वागर्थप्रतिपत्तये।
जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ।। १.१

शब्द आणि अर्थ हे जसे अभिन्न वाटतात तसेच शिव-शक्ती अभिन्न आहेत. ते जगताचे मातापिता आहेत, येथे भेद दिसतो.

### शक्तीचे प्रभेद

योगिजनांच्या उपकारासाठी चिच्छक्तिविशिष्ट शिव संकल्प करून ईक्षणपरायण होऊन अनेक होण्याची इच्छा करतात. परशिवस्थित ही शक्ती सहा प्रकारची असते. चिच्छक्ती, पराशक्ती, आदिशक्ती, इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती. यातील चिच्छक्ती ही परशिवाच्या सच्चिदानंद स्वरूपाची बोधिका

असून ती परशिवात समरस होऊन राहते. ते सृष्टिसमयी चिच्छक्तिविशिष्ट परशिवाच्या सहस्रांशाने पराशक्ती, तिच्या सहस्रांशाने आदिशक्ती तसेच आदिशक्तीच्या सहस्रांशाने इच्छाशक्ती, तिच्या सहस्रांशाने ज्ञानशक्ती, तिच्या सहस्रांशाने क्रियाशक्ती उत्पन्न होते. या शक्तीचे विवेचन 'वातुलशुद्धाख्य तंत्रा'त आले आहे:-

योगिनामुपकाराय स्वेच्छया चिंत्यते शिव:।
तच्छिवे तु पराशक्ति: सहस्रांशेन जायते।।
तच्छक्तेस्तु सहस्रांशादादिशक्तिसमुद्भव:।
आदिशक्तिसहस्रांशादिच्छाशक्तिसमुद्भव:।।
इच्छाशक्तिसहस्रांशाद् ज्ञानशक्तिसमुद्भव:।
ज्ञानशक्तिसहस्रांशात् क्रियाशक्तिसमुद्भव:।।
एता वै शक्तय: पंच निष्कलाश्चेति कीर्तिता:। १.२४-२७

**परशिवाचे महेश्वर नाव**

पूर्वोक्त षड्विध शक्तींमध्ये अंगांगीभावसंबंध मानलेला आहे. चिच्छक्ती अंगी-शक्ती असून बाकी परा, आदी, इच्छा, ज्ञान व क्रिया या अंग-शक्ती मानल्या आहेत. पंचविध अंगशक्तिविशिष्ट अंगी ही चिच्छक्ती विभागपरामर्शदशेत अर्थात् शिवाच्या सृष्टि-उन्मुखावस्थेत सत्त्वादी गुणत्रयात्मिका होते. ही शक्ती या सिद्धान्ताप्रमाणे परामाया, ऊर्ध्वमाया इत्यादी नावांनी ओळखली जाते. अशा महामायेने युक्त परशिवास महेश्वर म्हणतात. 'श्वेताश्वतर उपनिषदा'त म्हटले आहे:-

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्।। ४.१०

जसे मायासंबंधाने परशिवाला महेश्वर असे नाव प्राप्त झाले तसे परशिवसंबंधाने शक्तीदेखील 'माया' शब्दाने ओळखली जाते म्हणूनच 'सिद्धान्तागमा'त म्हटले आहे:-

मं शिवं परमं ब्रह्म प्राप्नोतीति स्वभावत:।
मायेति प्रोच्यते लोके ब्रह्मनिष्ठा सनातनी।। पृ. ३

वीरशैवसिद्धान्तात शांकराद्वैतसिद्धान्ताप्रमाणे 'या मा सा माया' जी नाहीच ती

माया असे संबोधले जात नाही तर 'मं- शिवं अयति स्वभावत: प्राप्नोति' म्हणजे परशिवपरब्रह्माला आश्रित होते ती माया. अर्थात् माया ही ब्रह्मामध्ये असलेली सनातन शक्ती आहे. मायेचा शिवाशी नित्यसंबध आहे. म्हणून शक्तीची मायासंज्ञा जशी अन्वर्थक आहे तशीच मायेने विशिष्ट असल्याने शिवाचे नाव महेश्वर हेदेखील अन्वर्थकच आहे. महेश्वर व माया यांचे अनादित्व आणि नित्यत्व हे येथे सूचित केले आहे. ही परामाया शुद्धसत्त्वगुणप्रधान असते. ती स्वाश्रयाला महेश्वराला मोहित करीत नाही. तर त्याच्या सर्वज्ञतादी उत्कृष्ट गुणांनी त्याला अलंकृत करते. म्हणूनच ज. रेणुकभगवत्पादांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

उपाधि: पुनराख्यात: शुद्धाशुद्धविभेदत:।
शुद्धोपाधि: परामाया स्वाश्रयाऽमोहकारिणी।।
मायाशक्तिवशादीशो नानामूर्तिधर: प्रभु:।
सर्वज्ञ: सर्वकर्ता च नित्यमुक्तो महेश्वर:।। ५.४४-४६

अर्थात् माया शुद्ध आणि अशुद्ध अशी दोन प्रकारची असते. शुद्धोपाधी असलेल्या मायेस 'परामाया' असे म्हणतात. ती आपल्या आश्रयाला मोहित करीत नाही. मायेमुळे तो परमेश्वर नानामूर्तिधर बनतो, ऐश्वर्यवान बनतो. तो सर्वज्ञ व सर्वकर्ता असून नित्यमुक्तही आहे.

**महेश्वरत्व स्वीकारण्याचे प्रयोजन**

नैयायिक, वैशेषिक, योग तसेच अद्वैतदर्शन यांचे आचार्य परमेश्वराचे निर्गुणासोबत सगुण रूपही मानतात. वीरशैव दर्शनाचार्यही शिवाच्या सगुण रूपाचा अंगीकार करतात. प्राण्यांच्या अदृष्टानुसार सृष्टी, स्थिती आणि लय यांची व्यवस्था लावण्यासाठी सगुणरूपधारी महेश्वराला मानले आहे. शिवयोगी शिवाचार्य 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात म्हणतात:-

शिवाभिधं परंब्रह्म जगन्निर्मातुमिच्छया।
स्वरूपमादधे किंचित्सुखत्स्फूर्ति विजृम्भितम्।।
विशुद्धज्ञानकरणं विषयं सर्वयोगिनाम्।
कोटिसूर्यप्रतीकाशं चंद्रकोटिसमप्रभम्।।
अप्राकृतगुणाधारं अनन्तमहिमास्पदम्। २.८,११

अर्थात् विमर्शशक्तिविशिष्ट परशिव विश्वरचनेचा संकल्प करून आनंदघन बनतात. घृतकाठिन्यन्यायाने महेश्वर हे घनीभूत होतात. द्रवीभूत होऊन पसरलेले पातळ झालेले तूप घट्ट होते, तसे शिव आनंदघन होतात. हेच परशिवाचे सगुण रूप असते. सृष्टी, स्थिती, लय, तिरोधान आणि अनुग्रह यांना पंचकृत्ये म्हणतात. हे शिवच करतो म्हणून त्यास पंचकृत्यपरायण असे म्हणतात. सगुण शिव स्वेच्छेने हे करतात.

येथे एक प्रश्न असा संभवतो की, विश्ववैचित्र्याच्या व्यवस्थेसाठी पूर्वपूर्व सृष्टीतील प्राण्यांचे अदृष्ट तर आवश्यक आहे. मग उत्तरोत्तर सृष्टीसाठी अदृष्टाशिवाय ईश्वरेच्छा का आवश्यक आहे? याचे समाधान असे दिले जाते की, केवळ अदृष्टाच्या आधारावर सृष्टी निर्माण कशी होईल? होणार नाही. अदृष्ट (कर्म) तर जड आहे, ते स्वत: कर्मफलदान करण्यास समर्थ नाही. म्हणून त्याच्या नियंत्रणासाठी साक्षी व प्रेरक असलेले ईश्वरतत्त्व आवश्यक आहे. यासाठी ज. रेणुकभगवत्पादाचार्य म्हणतात:-

एतेषां देहिनां साक्षी प्रेरक: परमेश्वर:।<br>
एतेषां भ्रमतां नित्यं कर्मयंत्रनियंत्रणे।।<br>
देहिनां प्रेरक: शम्भुर्हितमार्गोपदेशक:।<br>
पुनरावृत्तिरहितमोक्षमार्गोपदेशक:।। सि.शि. ५.५०-५१

अद्वैतवेदान्तशास्त्राप्रमाणेच वीरशैवदर्शनाने 'यथोर्णनाभि: सृजते गृण्हते च' या श्रुतीच्या प्रमाणाने सृष्टीसाठी मायाविशिष्ट महेश्वराचे अस्तित्व मानले असून तो अभिन्ननिमित्तोपादान कारण असल्याचे स्वीकारले आहे.

माया ही सत्त्व, रज व तम गुणांनी युक्त असल्यामुळे तोच सृष्टीचे उपादानकारण व निमित्तकारणही आहे. एखादा घट निर्माण करण्यासाठी माती हे उपादानकारण तर कुंभार हे निमित्तकारण मानले जाते. इथे 'न शिवेन विनाशक्तिर्नशक्तिरहित: शिव:' म्हणजे शिवाशिवाय शक्ती नाही व शक्तीशिवाय शिव नाही, या वचनाप्रमाणे शिव व शक्ती एकरूप असल्यामुळे सृष्टीचे निमित्तकारण तसेच उपादानकारण दोन्ही शिवच आहेत. 'ब्रह्मसूत्र श्रीकरभाष्या'त म्हटले आहे:-

शक्तिरस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वर:।<br>
शक्तिस्तुशक्तिमद्रूपाद् व्यतिरिक्त हि न: क्वचित्।। १.४.१०

शिवशक्तिसंबंधाचा विचार करताना दोघांत भेद मानला नाही.

शक्त्यंडमृत्पिंडमुपाददानो मायांडचक्रभ्रमणक्रमेण।
मूलांडदंडेन मुहुर्विधत्ते ब्रह्मांडभांडं भगवान् कुलालः।।

असे 'शक्तिविशिष्टाद्वैतदर्शन' (पृ. ६६) या ग्रंथात समर्थन केले आहे. भगवान भाष्यकारही म्हणतातः-

शिव एवहि देवोऽन्तः स्थितमिच्छावशाद् बहिः।
योगीवनिरुपादानमर्थजातं प्रकाशयेत्।। श्री.भा. २.१.२५

या प्रमाणाप्रमाणे देवाधिदेव शिव आपल्या अंतर्गत (अहं) विमर्शाने विमर्शनीय (जगत्) इदं रूपाने प्रकाशित करण्यासाठी केवळ इच्छाशक्तीचा उपयोग करतात. अन्य उपादानरूप सामग्रीची आवश्यकता नाही. आपल्याहून भिन्न, बहिर्भूत सामग्रीच्या अपेक्षेशिवाय निर्माणसमर्थ योग्याप्रमाणे महेश्वर हेच जगत्कर्ता आहेत.

### सृष्टी लीलारूप आहे

इथे एक शंका अशी की, सृष्टिनिर्माणकार्यात महेश्वराचे काय प्रयोजन आहे? काही प्रयोजन असेल तर त्याला आप्तकाम कसे म्हणावे? प्रयोजन नसेल तर उन्मत्त स्थिती मानावी लागेल, हा आक्षेप घेतला जाईल. ही सृष्टी महेश्वराची लीला आहे. 'लीला तु प्रयोजनशून्या' या उक्तीप्रमाणे इथे ती लीला सहज घडते. वीरशैवदर्शनशास्त्रात परशिव ब्रह्माच्या दोन अवस्था सांगितल्या आहेत. लीलावस्था व कैवल्यावस्था. कैवल्यावस्थेत व्यापार चालत नाहीत. सृष्टी, स्थिती आदी पंचकृत्ये होतात ती लीलावस्थेत. जसे एखादा तरबेज नट अनेक रूपे धारण करून अभिनय करतो तसेच परशिवही आपल्या सामर्थ्याने कधी सृष्टी, कधी पालन, कधी संहार, कधी तिरोधान तर कधी अनुग्रह करतो. तो सर्वैश्वर्य, धैर्य, वीर्य, पराक्रमादी सामर्थ्याचा उपयोग करून सप्तद्वीपांमधून विशेष प्रयोजनाशिवाय क्रीडाविहार करतो. आणि म्हणून लीला प्रयोजनशून्य आहे असेच मानले जाते. मरितोंटदार्य म्हणतातः-

'स्वेच्छाशक्तिरूपापोहनटंकवशाच्छिवादिधरण्यन्तषट्त्रिंवशत्तत्त्वात्मना विचित्रीकृत्य सृष्टिस्थितिसंहारबंधमोक्षलक्षणपंचकृत्यमहानाट्यरसिकः सन् क्रीडतीति राधान्तः।'

वास्तविक सृष्टी ही लीलापदार्थ आहे. सृष्टी, स्थिती, संहार, बंध, मोक्ष या पंचकृत्यांसाठी महेश्वरला कोणत्या प्रयोजनाची गरज नाही. महेश्वर स्वेच्छाशक्तिरूप आपोहनाद्वारा शिव, शक्ती इत्यादी छत्तीस तत्त्वांची निर्मिती करतात. ग्रंथकर्ते शिवयोगी शिवाचार्य त्यासाठीच म्हणतात:-

स्वेच्छाविग्रहयुक्ताय स्वेच्छावर्तनवर्तिने।
स्वेच्छाकृतत्रिलोकाय नमः सांबाय शंभवे।। सि.शि. १.६

त्यांच्या केवळ इच्छेने जगत्कर्तृत्वाचे प्रतिपादन केले आहे.

**वैषम्य व नैर्घृण्य या दोषांचा परिहार**

वास्तविक शिव निर्लिप्त आहे त्याला जगत्‌निर्माण कार्यात कारण मानले तर देव, तिर्यक्, मनुष्यांसारखे उत्तम, अधम, मध्यम सृष्टीतील विषमतेस बद्ध जीवांप्रमाणे वैषम्य व निर्दयतेचा आरोप शिवावर होईल. याच्या निवृत्तीकरिता सृष्टी निर्माण करताना उत्तरोत्तर सृष्टीतील निर्मितीसाठी जीवाच्या पूर्वपूर्व सृष्टीतील कर्मसापेक्षतेचा अंगीकार केला आहे. वैषम्यासाठी कारण म्हणून पूर्वसृष्टीतील कर्म मानले आहे. मग शिवावर वैषम्याचा दोष राहणार नाही. रेणुकभगवत्पादाचार्यही म्हणतात:-

अविद्यामोहिता जीवा ब्रह्मैक्यज्ञानवर्जिताः।
परिभ्रमन्ति संसारे निजकर्मानुसारतः।
देवतिर्यङ्मनुष्यादि नानायोनिविभेदतः।।
चक्रनेमिक्रमेणैव भ्रमन्ति हि शरीरिणः।
ज्यात्यायुर्भोगवैषम्यकारणं कर्म केवलम्।। सि.शि. ५.४७,४९

जन्म कुठे व्हावा, आयुष्य किती मिळावे व आयुष्यात कोणते सुखदुःखात्मक भोग मिळावेत हे ज्याच्या त्याच्या कर्मावर अवलंबून असते.

एतेषां देहिनां साक्षी प्रेरकः परमेश्वरः।
एतेषां भ्रमतां नित्यं कर्मयंत्रनियंत्रणे।। सि.शि. ५.५०

जीव जे कर्म करतो त्याचा साक्षी व नियंत्रक परमेश्वर असतो. भगवान भाष्यकार श्रीपतिपंडिताराध्य म्हणतात:-

निमित्तमात्रमेवासौ सृज्यानां सर्गकर्मणि।
प्रधानकारणीभूता यतोवैसृज्यशक्तय:।। श्री.भा. २.१.३४

जगत्सृष्टीच्या संदर्भात शिव केवळ निमित्तमात्र असून देव मनुष्यादी विभिन्न योनी निर्माण करताना त्याला कारण पूर्वपूर्व जन्मांतील कर्मेच होत. हा कर्मविपाकसिद्धान्त पाहिल्यावर परमेश्वरावर वैषम्य व नैर्घृण्य हे दोष ठेवले जातात. म्हणजे योनींतील भिन्नता व श्रेष्ठकनिष्ठता पाहिल्यावर हे असे का, असा प्रश्न निर्माण होतो. या दोषांचा परिहार करावा लागेल. उत्तरोत्तर सृष्टीतील प्राण्यांच्या भोगाला कारणीभूत पूर्वपूर्व सृष्टीतील कर्मच होय असे मानले जाते. प्रलयानंतरच्या सृष्टीतील भिन्नभिन्न योनींचे कारण हे प्रलयापूर्वीच्या सृष्टीतील त्या त्या जीवाचे पापपुण्यरूप कर्मच मानले जाते. यात वैषम्य व नैर्घृण्य हे दोष परमेश्वरावर येऊ शकत नाहीत. कृतनाश म्हणजे कर्माचा नाश व अकृताभ्यागम म्हणजे न केलेल्या कर्माचा भोग प्राप्त होत नाही.

जीव आणि त्याने केलेली कर्मे अनादी असल्याने श्रुतिवचनानुसार सृष्टीची प्रवाहसत्यता तसेच क्षेत्रज्ञ (जीव) व त्याने केलेल्या कर्माच्या अनादित्वाचे प्रतिपादन पूर्णतः युक्तिसंगत आहे. म्हणून ज्ञानमय ईश्वर तसेच अज्ञानावेष्टित जीव हे दोन्ही अनादी आहेत.

विश्वनिर्माण कार्यातील निमित्तकारण असलेले महेश्वर जर प्राण्याच्या कर्माच्या सापेक्ष कर्ते असतील तर महेश्वराची सर्वशक्तिसंपन्नता जी आहे तिची हानी होईल, अशी शंका निर्मूल आहे. कारण स्वतः केलेल्या नियमाला अनुसरून राहिल्याने प्रभुत्वाशी विसंगत होत नाही. 'न लोकाद् भिद्यते शास्त्रम्' या उक्तीप्रमाणे विचार केल्यास जसे राजाने केलेल्या नियमाला अनुसरून राजा वागत असेल तर राजाच्या सर्वशक्तिमत्तेला बाध येत नाही. तसेच ईश्वरदेखील आपणच केलेल्या नियमाप्रमाणे कर्मसापेक्ष कर्ता असेल तर त्याच्या माहैश्वर्याला (प्रभुतेला) बाधा येत नाही. यासाठी लौकिकातील अजून एक दृष्टान्त देता येईल. विद्युत्संचालित पंख्यामुळे हवा मिळते, चक्कीमुळे गहू, ज्वारी, आदी धान्यांचे पीठ होते. बल्बचे प्रकाशन होते, त्याप्रमाणे विभिन्न कार्यासाठी असाधारण कारण भिन्न भिन्न मशीन असते, पण सर्वांसाठी साधारण कार्य तर विद्युत्शक्ती असते. तसेच महेश्वर हे साधारण कारण तर प्राण्यांची कर्मे सृष्टिवैचित्र्यासाठी असाधारण कारण होत.

वरीलप्रकारे ज्याप्रमाणे शिव हे सृष्टी, स्थिती, लय, तिरोधान व अनुग्रह या पंचकृत्यांसाठी परायण मानले गेले आहे. वेदशास्त्रांच्या व्यवस्थेसाठी ईश्वर हे अभिन्ननिमित्तोपादानकारण असल्याचे स्वीकारणे आवश्यक आहे. भाष्यकार श्रीपतिपंडिताराध्य आपल्या ब्रह्मसूत्र श्रीकरभाष्यात 'शास्त्रयोनित्वात्' या सूत्रावर विवेचन करताना

सद्योजातेन ऋग्वेदं वामदेवेन याजुषम्।
अघोरेण तथा साम पुरुषेण त्वथर्वणम्।।
ईशानेन मुखेनैव कामिकाद्यागमांस्तथा।
जनयामास विश्वेशः सर्वसिद्धिप्रदायकः।। श्री.भा. १.१.३

या स्मृतिवचनाचा उल्लेख करून 'शास्त्रस्य-ऋग्वेदादेः योनिः-कारणम्' या व्युत्पत्तीसाठी षष्ठी तत्पुरुष समासाच्या आधारे ऋग्वेदादी शास्त्रांचे कारण अर्थात् रचना करणारे भगवान शिव आहेत, याचे समर्थन करतात. तसेच आपल्या ईशान मुखातून आगमशास्त्रही त्यांनीच सांगितले आहे.

वरील युक्तिवादाप्रमाणे व प्रामाणिक विवेचनाप्रमाणे स्पष्ट होते की वीरशैव दर्शनामध्ये मायाशक्तिविशिष्ट परशिव हे सगुणस्वरूप स्वीकारून महेश्वर होतात. त्यांची मायाशक्ती ही अद्वैतवेदान्ताने मानलेल्या मायेप्रमाणे मिथ्या मानली जात नाही तर सत्यस्वरूप जगताचे सत्यस्वरूप कारण मानली जाते. या मायाशक्तीने विशिष्ट असे महेश्वरही सत्य व आराध्यच मानले आहेत.

□□

चौथा परिच्छेद

# जीवस्वरूप

या जगामध्ये जनन-मरण, बंध-मोक्ष, सुख-दुःख इत्यादी व्यवहारांचा केंद्रबिंदू म्हणजे जीवात्मा होय. आपल्या देशातील दार्शनिकांत जसे ईश्वराविषयी मतैक्य होत नाही तसे जीवात्म्याविषयीसुद्धा एकमत होत नाही. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या आधारे जीवस्वरूपाचा विचारविमर्श करून शेवटी इतर दार्शनिकांनी मानलेल्या जीवस्वरूपाच्या साम्य-वैषम्याचा विचार करणार आहोत. 'श्रीसिद्धान्त-शिखामणी'मध्ये जीवस्वरूपासंबंधी म्हटले आहे:-

नेन्द्रियाणां न देहस्य न बुद्धेरात्मता भवेत्।
अहं प्रत्ययवेद्यत्वादनुभूतस्मृतेरपि।।
शरीरेन्द्रियबुद्धिभ्यो व्यतिरिक्तः सनातनः। ५.५८

अर्थात् अहं अहं असे जे ज्ञान होते त्याचा हा विषय आहे. अनुभूत विषयांचे स्मरण इंद्रियांना होत नाही. जीवाचे स्वरूप सांगताना 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे:-

एक एव शिवः साक्षाच्चिदानंदमयो विभुः।
निर्विकल्पो निराकारो निर्गुणो निष्प्रपंचकः।।
अनाद्यविद्यासंबंधात्तदंशो जीवनामकः। ५.३३-३४

अर्थात् परशिवामध्ये अकुंठित इच्छादी अनेक गुणगण राहतात. परशिवच आपल्या विमर्शशक्तीच्या अंशभूत असलेल्या अनादी अविद्येच्या संबंधाने जीव म्हणवितो. म्हणजे जीव हा परशिवाचा अंशच आहे. म्हणून शक्तीचे आविष्करण न होणे म्हणजेच अंशत्व होय. म्हणून हा जीव सर्वकर्तृत्व, सर्वज्ञत्व, परिपूर्णत्व, नित्यत्व आणि व्यापकत्व या पाच शक्तींचा संकोच करणाऱ्या पाच कंचुकांमुळे आवृत होतो. ही पंचकंचुके म्हणजे कला, विद्या, राग, काल व नियती होत. म्हणून जीवाला किंचित्कर्तृत्व, किंचिज्ज्ञत्व, अपूर्णत्व, अनित्यत्व आणि अव्यापकत्व लाभते. स्वकर्मानुसार तो या संसारात भ्रमण करीत राहतो.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

किंचित्कर्ता च किंचिज्ज्ञो बद्धोऽनादिशरीरवान्।
अविद्यामोहिता जीवा ब्रह्मैक्यज्ञानवर्जिता:।।
देवतिर्यङ्मनुष्यादिनानायोनिविभेदत:।। ५.४७-४८

म्हणजेच ज्ञानाचा अभाव नाही तर अल्पत्व आहे.

जीवत्वं दु:खसर्वस्वं तदिदं मलकल्पितम्।
निरस्यते गुरोर्बोधाद् ज्ञानशक्ति: प्रकाशते।। सि.शि. १८.१७

मलांमुळे जीवत्व हे दु:खमय आहे. हे दु:ख गुरूपदेशाने निरस्त होते, त्याची ज्ञानशक्ती प्रकाशित होते व तो सुखी होतो. 'ब्रह्मसूत्रवृत्ति'कार उमचिगी शंकरशास्त्री म्हणतात, शिवाची जी शक्ती आहे ती स्वतंत्र असल्यामुळे शक्तीचा संकोच झाला की जीवत्व येते व शक्तीचा विकास झाला की जीव शिवत्वास पावतो. जसे कासव आपले अवयव पसरवून मोठा होतो व अवयव खेचून घेतल्यास लहान होतो. साप कुंडलाकार होऊन लहान दिसतो व पसरल्यास लांबट दिसतो. सोने कधी सळईसारखे लांब दिसते तर अलंकार तयार केल्यास वेगळा आकार दिसतो.

**जीवाचे अणुरूप**

वालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च।
भागो जीव: स विज्ञेय: स चानन्त्याय कल्प्यते।। ब्र.शां. १.३.१९

या श्रुतिप्रामाण्यानुसार वीरशैवदर्शनात जीवाचे अणुपरिमाण स्वीकारले आहे. जीव एखाद्या केसाच्या शंभराव्या भागाचा शंभरावा भाग असतो. आणवमलाने आवृत झाल्याने जीव आपली परिपूर्णता विसरून अणुत्व स्वीकारतो. जीवाच्या मलावृत स्वरूपाला नीळकंठ शिवाचार्य 'शिवाद्वैतपरिभाषा' ग्रंथात म्हणतात की, जीवात्म्याचे लक्षण स्थूल, चिदचिद्रूप शक्तिविशिष्टत्व आहे. स्थूलत्व म्हणजेच मलावृत होणे. मल निवृत्त झाल्यास जीव मुक्त होतो, शिवत्व प्राप्त करतो.

यथा सुदीप्तात् पावकात् विस्फुलिंगा: सहस्रश: प्रभवन्ते स्वरूपा:।
तथाक्षराद् विविधा: सौम्य भावा: प्रजायन्ते तत्र चैवापियन्ति।। मुं.उ.२.१.१

या श्रुतिवचनानुसार जसे अग्नी आणि स्फुलिंग यांच्यात अंश-अंशी भावसंबंध असतो तसा जीव शिवात असतो असे मानले आहे.

निर्विकल्पो निराकारो निर्गुणो निष्प्रपंचक:।
अनाद्यविद्यासंबंधात्तदंशो जीवनामक:।। सि.शि. ५.३४

अर्थात् निर्विकल्प, निराकार, निर्गुण व निष्प्रपंच असलेला शिवच अनादी अविद्येमुळे जीव होतो. जीव हा शिवांशच आहे. 'शिवगीते'त म्हटले आहे की,

सत्य ज्ञानात्मकोऽनन्तो विभुरात्मा महेश्वर:।
तस्यैवांशो जीवलोके हृदये प्राणिनां स्थित:।।
विस्फुलिंगा यथा वन्हौ जायन्ते काष्ठयोगत:।
अनादिकर्मसंबद्धास्तद्वदंशा महेशितु:।।
अनादिवासनामुक्ता: क्षेत्रज्ञा इति ते स्मृता:। शिवगीता २.२७-२९

असे अगस्त्य महर्षींनी श्रीरामाला जीव हा परशिवाचा अंश असल्याचे सांगितले आहे. मायिदेवांनीही 'आत्मायं केवल: शुद्ध: शिवस्यांश: सदामल:' असे जीव हा शिवाचा अंश असल्याचे सांगितले. तसेच अंश-अंशीभावाचा स्वीकार केल्यामुळेच साधारण व असाधारण धर्मांच्या आधारावर शिव व जीव यांच्यात भेद आणि अभेद आहे असे सिद्ध होते.

### जीव-परमात्म्यामध्ये अंगांगी भाव

वीरशैवदर्शनाने जीव आणि परमात्मा यांच्यातील अंगांगी भावास औपाधिक मानले नाही तर अंगांगी भावरूपात वास्तव मानले आहे. या दर्शनात जीवाला 'अंग' तर शिवाला 'अंगी' असल्याचे मानले आहे. आचार्य मायिदेव म्हणतात:-

अनाद्यन्तमजं लिंगं तत्परं परमंप्रति।
यद्गच्छति महाभक्त्या तदंगमिति निश्चितम्।।
अं भवेत् परमं ब्रह्म तद्गतं तत्परायणम्।
अंगस्थलमिति प्राहुरंगतत्त्वविशारदा:।। अ.सू. ५.३

श्रीनीलकंठ शिवाचार्यांनी अंगपदाचे विवेचन करताना 'अंतर्यामी ब्राह्मणा'च्या आधाराने रूढिशक्तीने पृथ्वीपासून जीवात्म्यापर्यंत सकल वस्तूंना परशिवाचे शरीर मानले आहे. म्हणून जीवाला अंग म्हणण्यास काही हरकत नाही, असे प्रतिपादन केले आहे. जीवाला अंगपदाचे जीव-वाचकत्व मानले. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील

पत्रशाखादिरूपेण यथा तिष्ठति पादपः।
तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।। १०.७०

या श्लोकाप्रमाणे सदृष्टांत सांगितले की, पत्र, शाखा इत्यादींच्या रूपात जसा वृक्ष दिसतो त्याप्रमाणे भूम्यादिरूपाने शिवच विराजमान आहे. परशिवाच्या धृतिशक्तीने धरणी, करुणाशक्तीने जल, उज्ज्वलतेने तेज, परमानंदस्पंदनशक्तीने वायू, चिद्व्याप्तिशक्तीने आकाश, चितिसंकोचशक्तीने चित्त यांनी विशिष्ट असल्यामुळे जीवाची निर्मिती होते. म्हणून शिवजीवाचा अवयव-अवयवी संबंध आहे.

मायान्तु प्रकृतिं विन्द्यान्मायिनन्तु महेश्वरम्।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्।। श्वे.उ. ४.१०

या श्रुतिवचनाला प्रमाण मानून श्रीपतिपंडिताचार्यांनीही जीवाला परशिवाचा अवयव म्हटले आहे. म्हणून जीव हा जसा परमात्म्याचा अंश मानला तसा शरीरही मानले आहे. परशिव तर निरवयव आहे म्हणून त्याच्याशी जीवाचा अवयव-अवयवी संबंध कसा होईल, असा प्रश्न उपस्थित केला जातो. याचे समाधान असे आहे की, परशिवाचे प्राकृत अवयव जीवासारखे नसतात, वायुपुराणातील पुढील विधान पाहण्याजोगे आहे:-

सर्वज्ञता तृप्तिरनादिबोधः स्वतंत्रता नित्यमलुप्तशक्तिः।
अनन्तशक्तिश्च विभोर्विधिज्ञाः षडाहुरंगानि महेश्वरस्य।। वा.पु. १२.३१

न्यायमताप्रमाणे न्यायाचे लक्षण 'पंचावयववाक्यं न्यायः।' असे केले आहे. वाक्यात्मक शब्दगुण आहे, द्रव्य नाही. अवयव असण्याची शक्यता द्रव्यात असू शकते, गुणामध्ये नाही. अशा स्थितीत लक्षणातील असंभव दोष काढून टाकण्यासाठी अर्थामध्ये अवयव शब्दाचे तात्पर्य मानले आहे किंवा आरोपित अवयवामुळे दोषाचे निराकरण होते. तसेच परमात्म्याची वरील श्लोकातील सर्वज्ञता, तृप्ती, अनादिबोध, स्वतंत्रता, नित्य अलुप्तशक्ती व अनंतशक्ती ही सहा अंगे मानली आहेत. हा पक्षपातरहित मार्ग आहे. जीव हा परमेश्वराचे अंग आहे हे सिद्ध करण्यासाठी अनेक स्मृति-श्रुतिवचनांचा आधार घेतला जातो.

१. तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् (श्वेताश्वतर उपनिषद ४.१०)
२. अंशो नाना व्यपदेशात् (ब्रह्मसूत्र २.३.५)
३. ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः। (भगवद्गीता १५.७)

आता दुसरी एक शंका अशी की, जीव जर ईश्वराचा अंश असेल तर जीव अंश हा दुःखी वा सुखी होऊ शकतो, तेव्हा त्याचा अंशी असलेला परमात्माही सुखी वा दुःखी होऊ शकेल. कारण 'हस्तादी अवयवांमध्ये व्रणादींच्या द्वारा देवदत्त दुःखी होतो' या न्यायाने 'लसूण खाल्ल्यानंतर व्याधी शांत होत नाही' ही उक्ती सार्थ होईल. म्हणजे जीव दुःखी झाला तर त्याचा अंशी परमात्माही दुःखी होईल, असे होणार नाही. दुःख, मोह, आसक्ती, द्वेष इत्यादी जीवाच्या ठिकाणी असलेल्या आणवमलाचे कार्य मानले जाते. इच्छाशक्तीचा संकोच म्हणजे आणवमल. ज्ञानशक्तीचा संकोच म्हणजे मायामल व क्रियाशक्तीचा संकोच म्हणजे कार्मिकमल असे म्हणतात. आणवमल जीवात अणुता आणतो आणि मायामल जीवात परमात्म्यासंबंधी भेदबुद्धी आणतो. 'जीवत्वं दुःखसर्वस्वं तदिदं मल कल्पितम्' ही रेणुकभगवत्पादाचार्यांची उक्ती हेच दर्शविते. परमात्म्याजवळ त्रिमल नसल्यामुळे त्यास दुःख होण्याचे कारणच नाही. सुखदुःखादी होणे हे जीवाचे तटस्थ लक्षण मानले आहे. श्रीपतिपंडिताराध्य म्हणूनच म्हणतात:-

'अनादिस्वाभाविकमायापाशबद्धघोरापारनिःसारसंसारव्यापारतापत्रयानलदंदह्यमान-नानाशरीरप्रवेशनिर्गमनवर्णाश्रमाभिमानविशिष्टकामक्रोधाद्यनुस्यूतसुखदुःखाद्याश्रयत्वं जीवत्वम्।' (श्री.भा. १.१.१)

असे जीवत्वाचे लक्षण केले आहे. म्हणून हा सुखी आहे, हा दुःखी आहे असे व्यवहारात दिसते. सुखदुःखयुक्त असणे हे जीवाचे तटस्थलक्षण (सुखदुःखादिमत्व) म्हणून सांगितले आहे. जीवाला त्या त्या शरीराप्रमाणे सुख-दुःखादींचा अनुभव येतो.

द्वा सुपर्णा सयुजासखाया: समानं वृक्ष परिषस्वजाते।
तयोरण्यः पिप्पलं स्वादवत्त्यनश्नन्नन्यौऽभिचाकशीति।। श्वे.उ. ४.६

या मंत्रातील विचाराचा विस्तार श्रीपतिपंडिताराध्यांनी 'ब्रह्मसूत्र श्रीकरभाष्या'त केला आहे. श्रीविद्यारण्यस्वामींनीही सदृष्टान्त प्रतिपादन केले आहे की, कन्या ही पित्याद्वारा उत्पन्न होते पण भोगणारा पती असतो, पिता नव्हे. तसेच जगताची उत्पत्ती होते पण भोक्तृत्व मात्र जीवाकडे जाते. म्हणूनच म्हटले आहे की,

ईशकार्यं जीवभोग्यं जगद्द्वाभ्यां समन्वितम्।
पितृजन्या भर्तृभोग्या यथायोषित्तथेष्यताम्। पंचदशी ४-१८

## जीवात्म्याचे नानात्व

जीवात्म्याला विभू मानले तर प्रत्येकाच्या शरीरात जीवाची उपस्थिती असल्यामुळे 'भोगसांकर्य' ही आपत्ती येईल. म्हणून वीरशैवदर्शनात जीवाचे अणुत्व मानले आहे. अणुत्व असल्यामुळेच जीवाची नित्यता सिद्ध होईल. म्हणून जन्मांतरात भोग्यकर्म फलांबाबत उपपत्ती होऊन कृतप्रणाश (केलेल्या कर्माचा भोग न घेणे) व अकृताभ्यागम (न केलेल्या कर्माचे फल भोगणे) या दोषांची निराकृती होईल. वीरशैवदर्शनात जीवाची उपाधी अशा अविद्येचे अनंत अंश असल्यामुळे औपाधिक जीवांचेही आनंत्य उपपन्न होईल. भगवत्पाद रेणुकांनी स्पष्ट केले आहे. 'अविद्याशक्तिभेदेन जीवा बहुविधाः स्मृताः।' (सि.शि. ५.४५). अर्थात् अविद्याशक्तीचे अनेक प्रभेद होऊन जीव नाना आहेत हेच मानावे लागते. भगवत्पाद श्रीपतिपंडिताराध्यांनीही म्हटले की काही लोक दरिद्री असतात तर काही ऐश्वर्यसंपन्न असल्यामुळे जीवाची अनेकता व अणुत्व यांचा स्वीकार करावा लागेल.

परमात्म्याला जीवभाव कशासाठी आला असेल या प्रश्नाचे उत्तर केवळ त्याची लीला असेच द्यावे लागेल. म्हणून भगवत्पाद रेणुकाचार्य म्हणतातः-

अस्वतंत्राश्च किंचिज्ज्ञाः किंचित्कर्तृत्वहेतवः।
लीलाभाजनतां प्राप्तः शिवस्य परमात्मनः।। सि.शि. १८.१४

ऐश्वर्य, शौर्य, वीर्य, पराक्रम यांत अग्रणी असलेला एखादा सम्राट हा सप्तद्वीपाची परिक्रमा करीत मौजमस्ती करील, किंवा एखाद्या वेळी मौन राहून कुठल्याच क्रियेत रमणार नाही. त्याप्रमाणे परमेश्वराची लीला असते. ती कधी चिल्लीलावस्था असते तर कदाचित केवलावस्था असते. 'बृहदारण्यकोपनिषदा'त म्हटल्याप्रमाणे 'स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत्।' (बृ.उ. १.४.३).

जेव्हा परमात्म्याला रमण्याची इच्छा होते तेव्हा तो अखंड रसास्वाद घेण्याचे सोडून खंडरसाचे आस्वादन करण्यासाठी पूज्य व पूजक असे दोन भाग होऊन त्या क्रीडा करवितो. खंडरसाचे आस्वादनासाठी अज्ञान कर्मयोग (स्वातंत्र्य परिकल्पित) आणवादी मलसंबंधाने अनेक योनीतून जीव भ्रमण करतो. घृत ज्याप्रमाणे पातळ होते व पुन्हा घट्ट होते त्याप्रमाणे जीव अवस्था बदलत राहतो. रेणुक भगवत्पादाचार्य म्हणतातः-

न चास्ति देहसंबंधो निर्देहस्य स्वभावत:।
अज्ञानकर्मयोगेन देही भवति भुक्तये।। सि.शि. १८.११

येथे एक जिज्ञासा असू शकते ती अशी, जीवाला अणुपरिमाण मानल्यामुळे तो शरीराच्या एक ठिकाणी राहू शकेल. अशा स्थितीत माझ्या पायात वेदना आहेत, मस्तकात वेदना नाही, म्हणून ते सुखी आहे, असे जीवाला वाटले असते. सर्वांगीण चेतनांची उपलब्धी कशी युक्तिसंगत होईल? याचे समाधान असे की, जसा घरात एके ठिकाणी दिवा लावल्यानंतर त्याचा प्रकाश घरात सगळीकडे पडतो तसा जीव अनुभूत असला तरी संपूर्ण शरीरात सगुण ज्ञानप्रभेने व्याप्त असतो. आचार्य रेणुकही म्हणतात:-

वालाग्रशतभागेन सदृशो हृदयस्थित:।
अश्नन् कर्मफलं सर्वमात्मा स्फुरति दीपवत्।। सि.शि. १८.६

केसाच्या अग्रभागाच्या शंभराव्या भागाबरोबर असलेला आत्मा कर्माचे फल न भोगता हृदयात दीपकासारखा प्रकाशित होतो. भगवान व्यासांनीसुद्धा 'अविरोध चंदनवत्', 'गुणाद्वालोकवत्' या दोन सूत्रांनी अर्थात् चंदन एके ठिकाणी राहूनही सगळीकडे सुगंध, शीतलता पसरवतो व प्रदीपमणी एके ठिकाणी राहूनही प्रकाशतो तसा अणुवत् राहूनही जीवात्मा आपल्या ज्ञानप्रभेने सर्वशरीरात व्यापक असतो. येथे एक जिज्ञासा अशी की, गुणवंताशिवाय इतरांजवळ गुण राहात नाहीत. पटाचे रूप पांढरा, पिवळा व इतर रंग हे त्याहून भिन्न द्रव्यात राहात नाहीत. याचा खुलासा असा करता येईल की, पीतादी गुण पटाशिवाय इतरांत राहात नाहीत तसे गंध, प्रभा प्रकाशाच्या संदर्भात होत नाही. जर रसगुण जसा जिभेला कळतो तसा रूपगुण कळणार नाही, पण प्रभा, प्रकाश व गंध हे गुण वस्तूच्या बाहेर पसरतात. तसे चैतन्यगुणही शरीरभर व्याप्त असतो. म्हणून छांदोग्य उपनिषदामध्ये म्हटले आहे की, 'आलोमभ्य आनखेभ्य: प्रज्ञया शरीरं समारुह्य शरीरेण सुखदु:खे आप्नोति।'

**जीव व परमात्मा यांचा भेदाभेदसंबंध**

वरील विवेचनावरून स्पष्ट होते की, विचित्र शक्तियुक्त मायेला वश होऊन शिवच अणुत्व अवस्थेत प्रवेश करतात. म्हणून जीवाची अणुता स्वाभाविकच आहे, औपाधिक नाही. ज्याप्रमाणे अग्नीच्या ठिणग्यांचे अणुत्व स्वाभाविक आहे

तसेच नद्यांचे नदीत्व आणि नद्यांचे समुद्रापासून वेगळे राहाणे स्वाभाविक आहे, तसेच जीवाचे अणुत्वही आहे. परशिवाहून भिन्नत्व हे स्वाभाविक आहे. संसारदशेमध्ये जीवाचे परमात्म्याशी भिन्नत्व वास्तविक आहे.

येथे शंका अशी की, जीव तर मलाने आवृत आहे, परमात्मा नव्हे. त्यामुळे जीव-परमात्म्यात भेद आहे. जीव केव्हाही शिवाहून भिन्न होऊ शकतो. मग शिवाशी त्याचे अभिन्नत्व कसे, असा प्रश्न उपस्थित झाल्यास समाधान असे-जेव्हा गुरू वेध-मंत्र-क्रियारूप अशा तीन दीक्षा देतात तेव्हा अनुक्रमे आणव, माया व कार्मिक मलांची निवृत्ती होऊन शिवज्ञान दिले जाते, तेव्हा जीव शुद्ध होऊन शिवस्वरूप होतो. म्हणूनच 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

पूज्यपूजकयोर्लिंग जीवयोर्भेदवर्जने।
पूजाकर्माद्यसंपत्तेर्लिंगनिष्ठाविरोधत:।।
प्रेरकं शंकरं बुद्‌ध्वा प्रेर्यमात्मानमेव च।
भेदात् तं पूजयेन्नित्यं न चाद्वैतपरो भवेत्।।
पति: साक्षान्महादेव: पशुरेष तदाश्रय:।
अनयो: स्वामिभृत्यत्वमभेदे कथमिष्यते।। सि.शि. १०.३७,३८,३९

रेणुकभगवत्पादांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये बद्धावस्थेत शिव पूज्य व जीव पूजक, शिव पती व जीव पशुरूप, हे सिद्धान्तसंमत आहेत. जर शिव व जीव यांच्यात वास्तविक भेद मानला नाही तर जीवामध्ये लिंगनिष्ठा होणार नाही. म्हणून पतिरूप शिवाला प्रेरक मानून जीवाला प्रेर्य मानून पूज्य-पूजक असा भेद असेल तरच शिवाची पूजा शक्य होईल, अन्यथा नाही. म्हणून वरील श्लोकांतून हे मत मांडले आहे. अनुग्रहीत शिष्याला जेव्हा श्रीगुरूकडून श्रुतिबोध होतो, शिष्याला स्वानुभवबोध झाल्यानंतर परशिवब्रह्माचा महालिंगरूपाने साक्षात्कार होतो तेव्हा अद्वैतसंपत्तीमुळे प्राक्तनातील भेद निवृत्त होतो. बद्धावस्थेत भेद असतो व मुक्त झाल्यावर अभेद होतो असे भगवत्पादांनी प्रतिपादित केले आहे. म्हणूनच पुढे म्हणतात:-

जीवत्वं दु:खसर्वस्वं तदिदं मलकल्पितम्।
निरस्यते गुरोर्बोधाज्ज्ञानशक्ति: प्रकाशते।। सि.शि. १८.१७

अर्थात् संसारदशेत परस्परविरुद्ध स्वभाव असल्याने जीव व शिवामध्ये भेदानुभव तर मुक्तावस्थेत या दोघांमध्ये अभेद निर्माण होतो. पूर्वी शिव सर्वज्ञ तर जीव अल्पज्ञ, शिव सर्वकर्ता तर जीव अल्पकर्ता, शिव शक्तिसमन्वित तर जीव अविद्यामोहित आहे, ज्ञानवर्जित आहे. जीव अज्ञान तर शिव नित्यमुक्त असतो. सारांश, संसारदशेत भेद तर साक्षात्कारानंतर अभेद प्रतिपादन केला आहे. श्रीपतिपंडिताराध्यभगवत्पादाचार्य श्रीकरभाष्यात म्हणतात की,

बद्धशुद्धादिभेदेन जीवत्रयमिदं स्मृतम्।
गुरुदीक्षाविहीनश्च शिवभक्तिविवर्जितः।।
स्वकर्तृत्वाभिमानी तु बद्धः स पशुरुच्यते।
गुरुदीक्षां परां लब्ध्वा कैंकर्यत्रयसंयुतः।।
शान्त्यादि सद्गुणोपेतो मुमुक्षू रागवर्जितः।
शिवाधीनः सुधीः भक्तः शुद्धजीव इति स्मृतः।।
शिवयोगशिवज्ञान विभवानंदसंयुतः।
प्रचंडातपमध्यस्थशुद्धकर्पूरदीपवत्।। श्री.भा. १.३.२

अर्थात् वीरशैवदर्शनामध्ये परमात्म्याच्या संकुचित शक्तीने विशिष्ट असल्यामुळे जीव परमात्म्याचा अंश आहे तसेच अणुपरिमाण आहे. अणु असल्यामुळेच जीव प्रत्येक शरीरात भिन्न रूपाने राहतो व तो नित्य आहे. या दोघांमध्ये अंगांगी भावसंबंध आहे. सर्वज्ञत्व, अल्पज्ञत्वादी गुणांमुळे असलेल्या भेदाभेदामुळे या दोघांमध्येही भेदाभेदसंबंध आहे. प्रमाणशास्त्र, युक्ती व अनुभूतीच्या परस्परसामंजस्यामुळे वीरशैवागम सिद्धान्त ग्राह्य आहे.

□□

पाचवा परिच्छेद

# सृष्टिमीमांसा

भारतीय दार्शनिकांनी सृष्टीची व्यवस्था लावण्यासाठी सत्कार्यवाद आणि असत्कार्यवाद असे दोन मार्ग स्वीकारलेले आहेत. सत्कार्यवादाचे परिणामवाद व विवर्तवाद असे दोन प्रकार आहेत. पुढे परिणामवादाचे प्रकृति परिणामवाद व शक्तिविशिष्ट अविकृत परिणामवाद असे दोन प्रकार आहेत. सृष्टिप्रक्रियेच्या बाबतीत 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये अविकृत परिणामवाद मानला आहे. परिणामवादाचा अर्थ तसा 'परिणामो नाम विकृतिः' असा केला जातो, पण येथे परिणाम हा विकार नाही. या परिणामवादात अन्यथारूप होत नाही. म्हणून अविकृत परिणामवाद नाव दिले आहे. इथे परशिवाच्या शक्तीच्या विकासाने सृष्टी होते तर शक्तीच्या संकोचाने प्रलय होतो, असे मानले आहे. जसा कासव आपले सर्व अवयव पोटात घेऊन संकुचित बनतो व ते पसरवून पाण्यात वा भूमीवर विहार करतो. तसेच परशिवही प्रलयकालात अवयवांच्या संकोचाने प्रपंचाला आपल्यामध्ये ओढून घेतो. सृष्टिकालात आपल्या लीलेने जगत् निर्माण करतो. ही संकोच–विकासक्रिया करताना स्वरूपात मुळीच विकार होत नाही. म्हणून या वादाला अविकृत परिणामवाद मानले आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये रेणुकभगवत्पादाचार्य म्हणतात:–

आत्मशक्तिविकासेन शिवो विश्वात्मना स्थितः।
कुटीभावाद् यथा भाति पटः स्वस्य प्रसारणात्।। १०.६६

पट जसा विलक्षण प्रसारणाने झोपडीसारखा होतो व संकोचाने पुन्हा पटरूपात राहतो, तसेच शिवही आत्मशक्तीच्या विकासाने जगद्रूप बनतो. यात पटाच्या मूळ रूपात कोणताही विकार होत नाही. याशिवाय रेणुकभगवत्पाद 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हणतात:–

पत्रशाखादिरूपेण यथा तिष्ठति पादपः।
तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।। १०.९

वृक्ष जसा पत्र, शाखा इत्यादी रूपांत विकसित होऊन राहतो तसेच शिवही

भूमी आदी रूपांनी विकसित होऊन जगद्रूप बनतो. भाष्यकार मरितोंटदार्य म्हणतात, 'वृक्ष जसा कालशक्तीने विकाररहित राहून स्वतःहून विजातीय अशा पत्रशाखांनी युक्त होतो तसेच शिवही स्वसमवेत शक्तीच्या तादात्म्यरूपाने, भूम्यादिरूपाने प्रभूच्या धृतिशक्तीच्या योगाने धरणी, करुणाशक्तीने जल, उज्ज्वलतेने तेज, परमानंदस्पंदाने वायू, चिच्छक्तीने आकाश, चितिशक्तीच्या संकोचाने विशिष्ट जीवाची उत्पत्ती होते.' एक जिज्ञासा उद्‌भवते ती अशी की, वृक्ष सावयव असल्याने तो पत्र–शाखा इत्यादी रूपांनी विकसित होतो, पण परमात्मा निरवयव आहे. तरीही त्याचा परिणाम विश्वरूपात होतो, हे कसे? याचे समाधान असे की, वीरशैवसिद्धान्तात परशिवाच्या आश्रयात ज्या शक्ती असतात त्यांचा परिणाम विश्वरूपात होतो. म्हणूनच 'शक्तिरस्य जगत्कृत्स्नं शक्तिमाँस्तु महेश्वरः' या आगमप्रमाणाने शक्तिरूपत्वाचे प्रतिपादन केले आहे. श्वेताश्वतर उपनिषदातील

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्।। ४.१०

या वाक्यानेही सर्व तत्त्वांना शक्तीच जन्म देते असे प्रतिपादन केले आहे.

विमर्शाख्या पराशक्तिर्विश्ववैचित्र्यकारिणी।
यस्मिन् प्रतिष्ठितं ब्रह्म तदिदं विश्वभाजनम्।।
अंतःकरणरूपेण जगदंकुररूपतः।
यस्मिन् विभाति चिच्छक्तिर्ब्रह्मभूतः स उच्यते।।
यथा चन्द्रे स्थिरा ज्योत्स्ना विश्ववस्तुप्रकाशिनी।
तथा शक्तिर्विमर्शाख्या प्रकाशे ब्रह्मणि स्थिरा।। सि.शि. २०.३६–३८

हे सर्व करणारी शक्ती परशिवाशी अपृथग्‌भूत म्हणजे वेगळी करता येत नाही अशी आहे. त्यामुळे विश्वप्रपंचदेखील शिवाशी अपृथग्‌भूतच आहे. म्हणजे विश्वप्रपंचाला शिवाचा परिणामच म्हणावे लागेल.

**परशिव हे जगताचे अभिन्ननिमित्तोपादानकारण**

वर दिलेल्या प्रमाणांनी हे सिद्ध होते की, शक्ती ही शिवामध्ये अविनाभावरूपाने राहते. म्हणजे जगताचे उपादानकारण किंवा निमित्तकारण दोन्ही शिवच आहे, हा वीरशैवांचा मुख्य सिद्धान्त आहे.

एक जिज्ञासा या ठिकाणी अशी उत्पन्न होते की, जसे कुंभार घट निर्माण करतो म्हणून तो निमित्तकारण आहे, तो उपादानकारण होऊ शकत नाही. (ज्याचा कार्यात प्रवेश असतो आणि ज्याच्याशिवाय कार्य होत नाही त्याला उपादानकारण म्हणतात तर ज्याचा कार्यात प्रवेश नसतो त्याला निमित्तकारण म्हणतात.)

याप्रमाणे परशिव केवळ निमित्तकारण होऊ शकतो तो उपादानकारण होऊ शकत नाही. तो काही घटासाठी स्वतः मृत्पिंड बनत नाही. याचे समाधान असे की, 'विश्वाधिकोरुद्रो महर्षि:' इत्यादी प्रमाणांनी तो विश्वाधिक आहे यावरून परमात्म्याचे निमित्तकारणत्व समजते. तसेच 'सर्वं खल्विदं ब्रह्म', 'सर्वोवैरुद्र:' इत्यादीवरून शिवाची उपादानकारणता व विश्वरूपता स्पष्ट होते. म्हणून भगवत्पादरेणुकाचार्यांनी शिव हे निमित्तकारण व उपादानकारणही सिद्ध केले आहे. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

यस्मादेत्समुत्पन्नं महादेवाच्चराचरम्।<br>
तस्मादेतन्नभिद्येत यथाकुम्भादिकं मृद:।।<br>
यथा तंतुभिरुत्पन्न: पटस्तंतुमय: स्मृत:।<br>
तथा शिवात्समुत्पनं शिव एव चराचरम्।। १०.६३,६५

या श्लोकात जसे मृत्तिका ही घटासाठी उपादान तसेच तंतू हा पटासाठी उपादानकारण आहे. शिवही तसाच सृष्टीला उपादानकारण आहे हे सिद्ध केले आहे.

स्वत: श्रुतिभगवतीनेही 'यथोर्णनाभि: सृजते गृण्हते च' या वचनात ऊर्णनाभीचा म्हणजे कोळ्याचा दृष्टान्त देऊन हे समजावले आहे. कोळी आपल्या शरीरातील रसाने जाळे निर्माण करून पुन्हा आपल्यातच लीन करून घेतो तसे परमात्माही विश्वाचे सृजन व विसर्जन आपल्यातच करतो.

छांदोग्योपनिषदात एका विज्ञानाने सर्वविज्ञात होते असा विचार येतो. 'यथा सौम्य एकेन मृत्पिंडेन सर्वं मृण्मयं विज्ञातं स्यात्' या दृष्टान्ताच्या अनुरोधाने स्पष्ट होते की, घटादी कर्माचे ज्ञान त्याचे उपादान असलेल्या मृत्पिंडाच्या ज्ञानाने होते, कुंभाराच्या ज्ञानाने नव्हे. म्हणून ब्रह्माच्या निमित्तकारणत्वाद्वारा सकल प्रपंचाचे विज्ञान होत असल्याची संभावना केली जात नाही. यासाठी निमित्तकारण ते सोबत परशिवाची उपादानकारणतासुद्धा निर्विवादरूपाने मान्य केलेली आहे. संपूर्ण

प्रपंचशक्तीचा परिणाम आहे तर शक्ती ही शिवाशी अपृथक्सिद्ध आहे. म्हणून जगाचे उपादानकारण शिव आहे.

**सृष्टीचा विकास**

आता हे लक्षात येईल की, सूक्ष्म चिद्–अचिद् शक्तिविशिष्ट परशिव हे कारण तर स्थूल चिद्–अचिद् शक्तिविशिष्ट जगत् हे कार्य आहे. असा जगताशी परशिवाचा कार्यकारणभाव आहे. आता वीरशैवांना मान्य असलेल्या छत्तीस तत्त्वांच्या समूहाच्या विकासक्रमाचा विचार केला आहे. ती तत्त्वे अशी–

१. शिव, २. शक्ती, ३. सदाशिव, ४. ईश्वर, ५. शुद्धविद्या, ६. माया, ७. कला, ८. विद्या, ९. राग, १०. काल, ११. नियती, १२. पुरुष, १३. प्रकृती, १४. महत्, १५. अहंकार, १६. मन, १७. श्रोत्र, १८. त्वक्, १९. चक्षू, २०. जिव्हा, २१. घ्राण, २२. वाक्, २३. पाणि, २४. पाद, २५. पायू, २६. उपस्थ, २७. शब्द, २८. स्पर्श, २९. रूप, ३०. रस, ३१. गंध, ३२. आकाश, ३३. वायू, ३४. अग्नी, ३५. जल, ३६. भूमी.

या तत्त्वमालिकेतील सर्व तत्त्वांचे मूलकारण म्हणजे सूक्ष्म चिद्–अचिद् शक्तिविशिष्ट परशिव होय. म्हणूनच 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये

त्रैलोक्यसंपदालेख्यसमुल्लेखनभित्तये।
सच्चिदानंदरूपाय शिवाय ब्रह्मणे नमः।।
यस्योर्मिबुद्बुदाभासः षट्त्रिंशत्तत्त्वसंचयः।
निर्मलं शिवनामानं तं वंदे चिन्महोदधिम्।।
सदाशिवमुखाशेषतत्त्वमौक्तिकशुक्तिकाम्।
वंदे माहेश्वरीं शक्तिं महामायादिरूपिणीम्।। १.१,३,५

ग्रंथकर्ते शिवयोगी शिवाचार्य ग्रंथारंभी मंगलाचरण करताना या छत्तीस तत्त्वांचे मूळ परशिव असल्याचे लिहितात. हा परशिव प्रपंचातीत असून छत्तीस तत्त्वांत त्याची गणना केली जात नाही. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये 'अस्ति सच्चित्सुखाकारमलक्षणपदास्पदम्' इथून 'अद्वितीयमनिर्देश्यं परं ब्रह्म सनातनम्' पर्यंत परशिवाचे विश्वोत्तीर्णत्व प्रतिपादन करतात व 'तत्रलीनमभूत्पूर्वं चेतनाचेतनं जगत्' या श्लोकात प्रलयावस्थेत ही तत्त्वे परशिवात विलीन होतात आणि पुन्हा सृष्टिकालात परशिवतत्त्वातूनच क्रमाने बाहेर येतात.

### छत्तीस तत्त्वांचा विकासक्रम

परशिव हे चैतन्य असल्यामुळे परशिवाच्या ठिकाणी 'एकाकी न रमते' एकत्वात रमणे आवडत नसल्यामुळे 'मी एक आहे, अनेक व्हावे' असे स्फुरण होते. (तदैक्षत् बहुस्यां प्रजायेय) 'मी जगताची निर्मिती करीन' असा संकल्प होतो. निस्तरंग सागरात वायुसंपर्काने स्पंदन व्हावे तसे परमात्म्यामध्ये स्पंदन होते. प्राथमिक अवस्थेत किंचित् चलन होते त्याला विमर्शशक्ती असे म्हणतात. यातून दोन आकार निर्माण होतात. शिव व शक्ती. विमर्शरूपा इच्छाशक्तीच्या अंतरंगातील शक्तीला ज्ञानशक्ती म्हणतात तर बहिरंगातील शक्तीला क्रियाशक्ती म्हणतात. आता इच्छा, ज्ञान व क्रिया याप्रमाणे तीन शक्ती झाल्या.

गुणत्रयात्मिकाशक्तिर्ब्रह्मनिष्ठा सनातनी।
तद्वैष्यम्यात् समुत्पन्ना तस्मिन् वस्तुत्रयाभिधा।। सि.शि. ५.३९,४०

या रेणुकभगत्पादांच्या 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मधील उक्तीत हेच सांगितले की, परशिव तत्त्वात असलेली विमर्शशक्ती त्रिविध होते. इच्छा, ज्ञान व क्रिया अशा त्या तीन शक्ती. या शक्तीच्या दोन अवस्था मानल्या आहेत. १. अविभागपरामर्शदशा व २. विभागपरामर्शदशा. विश्वनिर्मितीपूर्वी ती अविभाग-परामर्शदशेत असते. या अवस्थेत ज्याप्रमाणे मयूरीच्या अंड्यात होणाऱ्या शावकाचे सर्व अवयव असतात पण दिसत नाहीत. तसेच विमर्शशक्तीमध्ये इच्छा, ज्ञान व क्रियाशक्ती असतात. ज्यावेळी परशिवाला 'मी अनेक व्हावे' अशी इच्छा होते त्यावेळी इच्छा, ज्ञान व क्रिया या रूपात ती परिणत होते ती विभागपरामर्शदशा होय. म्हणूनच म्हटले आहे की

अनादिनिधनाच्छान्तात् शिवात्परमकारणात्।
इच्छाशक्तिर्विनिष्क्रान्ता ततो ज्ञानं ततः क्रिया।।
तथोत्पन्नानि भूतानि भुवनानि चतुर्दश।। शि.मं., पृ. ३४

अर्थात् निर्विकार परमकारण शिवापासून इच्छाशक्ती त्यानंतर ज्ञानशक्तीनंतर क्रियाशक्ती उत्पन्न होतात. नंतर भूतमात्रे, चतुर्दशभुवने यांची निर्मिती होते.

इथे एक जिज्ञासा अशी होऊ शकते की, शिवतत्त्वापासून भूमितत्त्वापर्यंत छत्तीस तत्त्वांच्या गणनेपूर्वी इच्छा, ज्ञान व क्रियाशक्तींची गणना का केली जात

नाही? त्याचे समाधान असे की, सांख्यसिद्धान्तात प्रत्येक तत्त्वापूर्वी त्याच्या कारणाला प्रकृती म्हणतात. कार्योपादानास नाही. तसेच वीरशैवसिद्धान्तातही सामान्य परिमाणास तत्त्व म्हणत नाहीत. म्हणून इच्छा, ज्ञान व क्रिया यांना स्वतंत्र द्रव्य मानले नाही तर ते परशिवाचे स्वरूप आहे.

### शक्तींचा क्रमविचार

एखाद्या पदार्थाबाबत विचार केला तर असे लक्षात येईल की, आधी त्या पदार्थाचे ज्ञान होते, नंतर त्यासंबंधी इच्छा निर्माण होते. अनुकूल असेल तर घेण्याची, प्रतिकूल असेल तर त्यागाची. उदा.- पेढा. तो गोड आहे, आधी असे ज्ञान होते. चव चांगली आहे असे लक्षात आल्यावर घेण्याची इच्छा होते आणि तो घेण्याचा प्रयत्न होतो. किंवा एखादा साप आहे, तो विषारी आहे असे त्याचे ज्ञान होते. नंतर त्याच्यापासून दूर जाण्याची इच्छा होते आणि तसा प्रयत्न केला जातो. याप्रमाणे कुठलाही पदार्थ किंवा व्यक्ती यांच्यासंबंधी आधी ज्ञान होते मग घेण्याची किंवा त्यागाची इच्छा होते आणि तसा प्रयत्न होतो. यास 'जानाति-इच्छति-यतते' असे म्हणतात.

**शिवतत्त्व :** वीरशैवांच्या छत्तीस तत्त्वांपैकी आद्यतत्त्व म्हणजे शिवतत्त्व. इच्छाशक्तीच्या अंतरंगात ज्ञानशक्ती आहे. परशिवचैतन्य जेव्हा या ज्ञानशक्तीत प्रवेश करते तेव्हा ते शिवतत्त्व म्हणविते. हे शिवतत्त्व संपूर्ण जगताचे सर्जन करणारे आहे. हे सृष्टीचे निमित्तकारण होय. हे शिव, नीलकंठ, चंद्रशेखर तसेच त्रिलोचन इत्यादी नावांनी ओळखले जाते. सगुण साकार रूप होऊन मोक्षाची इच्छा असणाऱ्या साधकांसाठी उपास्यस्वरूप आहे. याचे वर्णन 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये येते ते असे:-

शिवाभिधं परं ब्रह्म जगन्निर्मातुमिच्छया।
स्वरूपमादधे किंचित् सुखस्फूर्तिविजृंभितम्।।
निरस्तदोषसंबंधं निरुपाधिकमव्ययम्।
दिव्यमप्राकृतं नित्यं नीलकंठं त्रिलोचनम्।।
चन्द्रार्धशेखरं शुद्धं शुद्धस्फटिकसन्निभम्।
शुद्धमुक्ताफलाभासमुपास्यं गुणमूर्तिभिः।। २.८-१०

जन्ममरणादी दोषांपासून मुक्त आपणांपासून भिन्न अविद्यादी उपाधिरहित, शाश्वत, त्रिकालाबाधित, दिव्य, त्रिगुणात्म प्रकृतीचा संबंध नसलेले आणि नित्य आहे. यालाच नीलकंठ आणि त्रिलोचन असे म्हणतात. याच्या मस्तकावर अर्धचंद्र आहे, तो शुद्ध आहे, स्फटिकासारखा निर्मल असून मोत्यासारखा तेजस्वी आहे. ब्रह्मादी देव त्याची उपासना करतात.

**शक्तितत्त्व :** इच्छाशक्तीचे बहिरंग क्रियाशक्ती आहे. परशिव चैतन्य जेव्हा या क्रियाशक्तीत प्रवेश करते तेव्हा ते शक्तितत्त्व म्हणविते. हे शक्तितत्त्व पुढील सदाशिव तत्त्वापासून भूमितत्त्वापर्यंत होणाऱ्या चोवीस तत्त्वांचे उपादानकारण असते. म्हणूनच 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

सदाशिवमुखाशेषतत्त्वमौक्तिकशुक्तिकाम्।
वन्दे माहेश्वरीं शक्तिं महामायादिरूपिणीम्।। २.२

**सदाशिवतत्त्व :** इच्छाशक्तीला अंतरंगभूत असलेल्या ज्ञानशक्तीच्या उद्रेकावस्थेत प्रवेश करून हेच शक्तितत्त्व पाण्यात भिजल्यामुळे अंकुरोन्मुख झालेल्या व फुगलेल्या हरभऱ्याप्रमाणे होते. अशा उद्रिक्त ज्ञानशक्तीस गर्भाला आवरण घालणाऱ्या चर्माच्या खोळीप्रमाणे आवरणं घालून 'अहमिदं'- 'मी हे विश्व आहे' असा जो अभिमान उत्पन्न होतो तेच सदाशिवतत्त्व होय.

**ईश्वरतत्त्व :** इच्छाशक्तीच्या बहिरंगरूप अशा क्रियाशक्तीच्या उद्रेकावस्थेत हे शक्तितत्त्व प्रवेश करून सुक्षेत्रात पेरलेल्या अंकुरित बीजाप्रमाणे 'इदं'शब्दवाच्य प्रपंचास 'अहमिदं'- 'मी प्रपंचस्वरूप आहे' असा अभिमान वाटणे हे ईश्वरतत्त्व होय.

**शुद्धविद्यातत्त्व :** हे शक्तितत्त्व सागरतरंगन्यायाने समुद्र व लाटा यांच्यातील अभेदत्वाप्रमाणे 'अहमिदं' अहं हा अहंकार व 'इदं'ने सूचित केलेला प्रपंच यांच्या असलेल्या अभेदत्वाचे शास्त्रजन्य ज्ञान गुरूपदेशाने प्राप्त करून घेतले की, ते शुद्धविद्यातत्त्व म्हणविते.

**मायातत्त्व :** लांडोरीच्या अंड्यात जसे मोराचे पाय, पंख, वर्णवैचित्र्य सूक्ष्मरूपाने असतात, त्याप्रमाणे हे शुद्धविद्यातत्त्व आपल्यात लीन असलेल्या भावी चराचर प्रपंचनिर्माणास कारणीभूत सूक्ष्म पदार्थामध्ये अन्योन्याभावरूप भेदबुद्धिप्राधान्याने

मायातत्त्व म्हणविते. परमात्म्याचा अंश असलेल्या जीवपुरुषाच्या ठिकाणी असलेल्या शक्ती शिवाशी वियोग झाल्यामुळे संकुचित होतात. जीवाला संकुचित करणाऱ्या आवरणाच्या कंचुकांच्या स्वरूपात कलादी पाच तत्त्वांचा विचार केला जातो.

**कलातत्त्व :** शिवाची जी सर्वकर्तृत्व शक्ती असते ती संकुचित होऊन जीव किंचित्कर होतो. ते कलातत्त्व होय.

**विद्यातत्त्व :** शिवाची जी सर्वज्ञता शक्ती असते ती संकुचित होऊन जीव किंचिज्ज्ञ होतो हेच विद्यातत्त्व होय.

**रागतत्त्व :** शिवाची जी पूर्णताशक्ती आहे ती संकुचित होऊन पुष्पमाळ, चंदन, वनिता यांविषयी प्रीतिरूप होते. त्यास रागतत्त्व म्हणतात.

**कालतत्त्व :** शिवाची जी नित्यताशक्ती असते ती अनित्यतेत परिणत होऊन भूत, भविष्य, वर्तमान कालव्यवहारास असाधारणकारण होणारे कालतत्त्व होय.

**नियतितत्त्व :** शिवाची जी व्यापकताशक्ती असते ती संकुचित होऊन अव्यापक बनते, ते नियतितत्त्व होय.

कला, विद्या, राग, काल व नियती या पाच तत्त्वांनी (पंचकंचुकांनी) आवृत जीवपुरुष बद्ध होतो.

**पुरुषतत्त्व :** काष्ठयोगाने जसे अग्निकण उत्पन्न होतात त्याप्रमाणे परशिवाच्या इच्छाशक्तीच्या योगाने आविर्भूत होणारा शिवांशच मायाशक्तीत प्रवेशून पुरुषतत्त्व म्हणवितो. हा आणव, माया किंवा कार्मिक मलांनी आवृत असतो.

**प्रकृतितत्त्व :** कार्योन्मुखगर्भित अशी इच्छाशक्ती स्वनिष्ठज्ञानशक्ती व क्रियाशक्तीमध्ये असलेला 'ज्ञानं क्रिया न भवति क्रिया ज्ञानं न भवति' अशा अन्योन्याभावरूप भेदबुद्धिप्रधान मायातत्त्वात प्रतिस्फुरली की, ते प्रकृतितत्त्व होते.

**महत्तत्त्व (बुद्धितत्त्व) :** प्रकृतिरूप शक्तितत्त्वच 'इदमित्थं' 'हे असेच' या निश्चयाला कारण होते तेव्हा ते महत्तत्त्व म्हणविते.

**अहंकारतत्त्व :** बुद्धितत्त्वच जेव्हा 'मी माझे' या अहंकार–ममकारास कारण होते. त्यास अहंकार म्हणतात.

**मनस्तत्त्व :** अहंकारतत्त्वरूप हे शक्तितत्त्व 'स्थाणुर्वापुरुषो वा'– हे खोड आहे

की, माणूस- अशा संकल्प-विकल्पास कारण होते ते मनस्तत्त्व होय. बुद्धी, अहंकार व मन यांना अंत:करण म्हणतात.

**पंचज्ञानेंद्रिये :** शब्दज्ञानाचे साधन ते श्रोत्र. स्पर्शज्ञानाचे साधन त्वचा. रूपज्ञानाचे साधन नेत्र. रसज्ञनाचे साधन जिव्हा. गंधज्ञानाचे साधन घ्राण होय.

**पंचकर्मेंद्रिये :** उच्चारप्रक्रियेस साधन वाक्, घेणेदेणे या क्रियेस साधन पाणि, गमनागमन क्रियेस साधन पाद, मलपरित्यागास कारण पायू, रेतमूत्र परित्यागास साधन उपस्थ. ही पंचकर्मेंद्रिये होत.

**पंचतन्मात्रा :** श्रोत्रेंद्रियाने घेतायेण्याजोगे शब्दतत्त्व, त्वगिंद्रियाने कळणारे स्पर्शतत्त्व, नेत्रेंद्रियाने कळणारे रूपतत्त्व, जिव्हेंद्रियाने कळणारे रसतत्त्व, घ्राणेंद्रियाने कळणारे गंधतत्त्व या पंचविषयांनाच पंचतन्मात्रा म्हणतात.

**पंचमहाभूते :** तामस अहंकारापासून शब्दतन्मात्रा, शब्दतन्मात्रापासून आकाश, आकाशापासून स्पर्शतन्मात्रा, त्यापासून वायू, वायूपासून रूपतन्मात्रा, त्यापासून तेज, तेजापासून रसतन्मात्रा, त्यापासून जल, जलापासून गंध व गंधापासून पृथ्वी.

याप्रमाणे वीरशैव तत्त्वज्ञानात छत्तीस तत्त्वे सांगितली आहेत.

याप्रमाणे शक्तिविशिष्ट परशिव स्वतःच शिवापासून पृथ्वीपर्यंत छत्तीस तत्त्वांमध्ये परिणत होऊन लीलाविनोद करतात. जगन्निर्मितीच्या वेळी ते स्वतःच निमित्त व उपादानकारण होतात. म्हणून हे संपूर्ण जगच शिव-शक्तीचा विलास मानलेले आहे. जगत् शिवशक्तिमय असल्याने स्वत: शिव व तदाश्रित शक्ती ही दोन्ही तत्त्वे सत्य होत. तसेच विश्वप्रपंचही सत्य मानला आहे. म्हणून रेणुक-भगवत्पादाचार्यांनी शिवाची जगन्मयता तसेच जगताची सत्यता स्वीकारली आहे. 'शिवतत्त्वात्समुत्पन्नं जगदस्मान्न भिद्यते।' (सि.शि. १०.६४), 'तथा शिवात् समुत्पन्नं शिव एव चराचरम्।' (सि.शि. १०.६५), 'तस्माच्छिवमयं सर्वं जगदेतत् चराचरम्।' (सि.शि. १०.६७), 'निरस्तभेदसद्भावे शिवे विश्वं विराजते।' (सि.शि. १०.६९) अर्थात् स्वत: शक्तिविशिष्ट शिव आपल्या शक्तीतील सत्त्व-रज-तम भेदानुसार भोक्ता, भोज्य, प्रेरयिता या तीन प्रकारांत परिणत होतो. याचे स्वरूप प्रतिपादन करताना श्रीरेणुकाचार्य म्हणतातः-

भोक्ता भोज्यं प्रेरयिता वस्तुत्रयमिदं स्मृतम्।
अखंडे ब्रह्मचैतन्ये कल्पितं गुणभेदतः।।

अत्र प्रेरयिता शम्भुः शुद्धोपाधिर्महेश्वरः।
संमिश्रोपाधयः सर्वे भोक्तारः पशवः स्मृताः।।
भोज्यमव्यक्तमित्युक्तं शुद्धतामसरूपकम्। सि.शि. ५.४२-४४

स्वतः शिवच शुद्धसत्त्वगुणप्राधान्याने प्रेरयिता, मलीन सत्त्वगुणप्राधान्याने भोक्ता तसेच तमोगुणप्राधान्याने भोज्य ठरतात. वीरशैवदर्शनात जीव, जगत् आणि जगदीश तिन्हीही तत्त्वे सत्य मानली आहेत. श्रीपतिपण्डिताराध्य म्हणतातः-

जीवः सत्यं जगत् सत्यं शिवः सत्यं स्वभावतः।
तयोर्भेदः सत्यं वा क्रिमिभ्रमरयोरिव।। श्री.भा. २.३.४०

आतापर्यंत 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये प्रतिपादित केलेले शैवदर्शनाचे सिद्धान्त सविस्तर निरूपित केले आहेत.

□□

सहावा परिच्छेद

# बंधमोक्षाचे स्वरूप

भारतीय दार्शनिकांनी धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार पुरुषार्थांमध्ये मोक्ष हा विशेष पुरुषार्थ मानला आहे. मोक्ष हा शब्द मुच् या धातूपासून बनतो. मोक्ष म्हणजे सुटका. दु:खाला कारणीभूत असलेल्या बंधनांपासून सुटका करून घेणे म्हणजे मोक्ष होय. न्याय-वैशेषिक दर्शनांत मिथ्या ज्ञानाला बंध मानले. सांख्य-योगात अविवेकख्यातीला बंध मानले. मीमांसक शरीरेंद्रियविषयांच्या संबंधाला बंध मानतात, तर अद्वैतवेदान्त अविद्येला बंध मानतो. वीरशैवसिद्धान्तात आणवादी मलत्रयांना बंध मानले.

वीरशैवदर्शनामध्ये संकोच-विकासवादानुसार बंध आणि मोक्ष यांची व्यवस्था केली आहे. याचा अर्थ इच्छा-ज्ञानादी शक्तींच्या संकोचाद्वारे तीन मल जीवाला आवृत करतात. त्यास बंध असे संबोधतात, तर पुन्हा त्याच शक्तींच्या विकासास मुक्ती असे संबोधतात. याविषयी श्रीशंकरशास्त्री असे मत मांडतात की, संकुचित तीन शक्तींनी युक्त मलत्रयांची निवृत्ती शक्तिविकासरूपशिवत्वाची प्राप्ती म्हणजेच मोक्ष होय.

**बंधस्वरूप**

भगवद्पादपूज्य श्रीरेणुकाचार्यांच्या मते,

जीवत्वं दु:खसर्वस्वं तदिदं मलकल्पितम् ।
निरस्यते गुरोर्बोधाज्ज्ञानशक्ति: प्रकाशते।। सि.शि.१८.१८

अशाप्रकारे मलाने आवृत असणे म्हणजे जीवत्व होय, असा उपदेश करून मल हेच बंधन होय, असे स्पष्ट केले आहे. परमेश्वराच्या नैसर्गिक इच्छा-ज्ञान-क्रिया या शक्तींच्या संकुचित स्वरूपास 'मल' असे म्हणतात. हा मल आणव, मायीय व कार्मिक या तीन प्रकारचा असतो. येथे परशिवशक्तीचा संकोच म्हणजे आणवमल होय. याच्या आवरणानेच जीव स्वत:चे स्वामित्व विसरून मी अपूर्ण आहे असे समजून अणुत्वाने व्यवहार करतो. याविषयी क्षेमराज आचार्य असे

म्हणतात, 'अपूर्णम्मन्यतारूपमाणवं मलम्.' जीवाने स्वत:ला अपूर्ण असे मानणे हाच आणव मल होय. (प्रत्यभिज्ञा, ९ व्याख्या)

परशिवाच्या संकुचित ज्ञानशक्तीलाच मायीय मल असे संबोधतात. परशिवाच्या संकुचित ज्ञानशक्तीमुळे जीव स्वत:ला शिवाहून भिन्न मानतो, हा मायीय मल आहे. परशिवाचे अपरिमित ज्ञान संकुचित होऊन बंधनास कारणीभूत होते. 'ज्ञानं बन्ध:' (शि.सू.१.२) या सूत्राच्या व्याख्येत

'स एव शिवाभेदाख्यात्यात्मक अज्ञानस्वभावो अपूर्णम्मन्यता आत्मकाणव-मलसत्तत्त्व संकुचितज्ञानात्मा बन्ध:' (शि.सू.वि.पृ.१२) अशाप्रकारे क्षेमराजाने संकुचित ज्ञानच बंध होय, असे मत व्यक्त केले आहे. याविषयी कृष्णद्वैपायनव्यासांनी

ज्ञानं बंध इतीदं तु द्वितीयं सूत्रमीशितु:।
ज्ञानमित्यात्मनस्तस्य किंचिज्ज्ञानक्रियात्मकम्।। शि.पु.६.१६.४६-४७

अशाप्रकारे शिवसूत्रात स्पष्ट केल्याप्रमाणे 'ज्ञानम् बंध:' याचा अर्थ किंचित ज्ञान असा करून संकुचिततत्त्वाची स्थापना केली आहे. या मायीय मलाच्या आवरणाने जीव स्वत:स परशिवापेक्षा भिन्न समजतो व शरीर इत्यादी मीच असे समजून पत्नी, पुत्र, गृह इत्यादी माझे आहेत असा व्यवहार करतो. क्षेमराज आचार्य असे म्हणतात, 'भिन्नवेद्यप्रथारूपं मायीयं मलम्'.(प्रत्यभिज्ञा.९ सूत्रव्याख्या)

परशिवाच्या संकुचित क्रियाशक्तीस कार्ममल असे म्हणतात. हेच शुभाशुभ वासनांचे रूप होय. या वासनेमुळे शुभाशुभ कर्मे होतात. जीव त्या कर्मफलांचा सुखदु:खात्मक अनुभव घेतो आणि स्वकर्मानुसार देवता-मानव इत्यादी योनींमध्ये जीव भ्रमण करीत असतो. या संदर्भात रेणुकाचार्य उपदेश करतात:-

अविद्यामोहिता जीवा ब्रह्मैक्यज्ञानवर्जिता:।।
परिभ्रमन्ति संसारे निजकर्मानुसारत:।
देवतिर्यङ्मनुष्यादिनानायोनिविभेदत:।।
चक्रनेमिक्रमेणैव भ्रमन्ति हि शरीरिण:।
जात्यायुर्भोगवैषम्यकारणं कर्म केवलम्।। सि.शि. ५.४७-४९

जगातील सर्व जीव अविद्यारूप उपाधीने आवृत झाल्यामुळे शिवजीवैक्यज्ञानशून्य होऊन आपापल्या कर्मांनुसार देव, पशू, पक्षी, मनुष्य वगैरे चौऱ्यांशी लक्ष योनींमध्ये जन्म घेऊन संसारचक्रात फिरत असतात. जन्म कुठे व्हावा, आयुष्य

किती मिळावे व भोग कोणते मिळावेत यासाठी कारणीभूत केवळ ज्याचे त्याचे कर्म होय.

म्हणूनच 'शुभाशुभवासनामयं कार्ममलम्' शुभ व अशुभ असे कार्ममल असतो, असे श्री क्षेमराज आचार्य कार्ममलाचे लक्षण सांगतात. श्रीशिवानुभव शिवाचार्यांनी सुद्धा स्वतादात्म्यापासून वेगळा भाव व अन्य संबंधाद्वारे कलादिभूम्यन्त स्थूल-चित्-अचित्रूप शक्तिविशिष्टाद्वारे जीवचैतन्याचे सर्व कर्तृत्व-सर्वज्ञत्व-पूर्णत्व-नित्यत्व-व्यापकत्व ही रूपे संकुचित असतात, असे म्हटले आहे. त्यापासून असलेली ही अप्रतिहतस्वातंत्र्यरूप इच्छाशक्ती संकुचित होऊन अपूर्ण अशी मन्यतारूपी आणवमल अशी संबोधिली जाते. ज्ञानशक्ती संकुचित होऊन सर्वज्ञत्व हे किंचितज्ज्ञत्वरूप होते. त्यालाच अंत:करण-बुद्धी-इंद्रिय यांच्या संबंधाने भेदस्वरूपी मायीय मल म्हणून संबोधिले जाते. तसेच क्रियाशक्ती संकुचित होऊन सर्वकर्तृत्वाचे किंचित्कर्तृत्व होते, तेच कर्मेंद्रियांच्या संपर्काने शुभ व अशुभ कर्माचे मलस्वरूप कार्ममल म्हणून ओळखले जाते (शि.द.,पृ.३५). अशाप्रकारे इच्छा-ज्ञान-क्रियाशक्तींच्या संकुचित स्वरूपाद्वारे आणवादी मलत्रयांचे स्वरूप विशद केले आहे.

आणवमलामुळे जीवाला अपूर्णत्व, मायामलामुळे भेद आणि कार्ममलामुळे कर्तृत्व व भोक्तृत्व भाव जीवाला प्राप्त होऊन हे मलत्रय त्याच्या बंधनाचे कारण होतात.

म्हणूनच श्री क्षेमराजांनीसुद्धा 'अपूर्ण अशी भिन्न असलेली प्रथा शुभ व अशुभ वासनेने युक्त आहे.' (शि.सू.वि. पृ.१६) असे क्रमश: आणव, मायीय व कार्ममलाचे स्वरूप सांगितले आहे. हे मलत्रय होत. जसा शिव परिपूर्ण इच्छा-ज्ञान-क्रिया या विशिष्ट शक्तींनी युक्त आहे तसाच जीव संकुचित असा आणव-मायीय-कार्ममलांनी आवृत असतो. म्हंणून जीव हा स्वभावत: परमात्म्यापासून भिन्न आहे. म्हणून जसा शिव सत्य आहे तसा जीवसुद्धा सत्य आहे, असे संसार अवस्थेतील त्यांचा भेद औपाधिक नसून वास्तविक आहे. मुक्तीमध्ये त्या दोघांमध्ये अभेदसुद्धा सत्यच आहे असे स्वीकारले आहे.

शिव: सत्यं जगत्सत्यं जीव: सत्यं स्वभावत:।
तेषामभेद: सत्यो वा क्रिमिभ्रमरयोरिव।। श्री.भा. २.३.४०

शैव-शाक्त दर्शनांमध्ये मलांचे तीन प्रकार स्वीकारले आहेत. परंतु 'आत्म्याच्या आश्रित असलेला दुष्टभाव म्हणजे मल होय', असे मलाचे लक्षण नमूद करीत असताना नकुलीश पाशुपत यांनी त्याचे १ मिथ्याज्ञान, २ अधर्म, ३ सक्तिहेतु अर्थात् विषयासक्तिहेतुविषयसन्निधानादी, ४ च्युति- सदाचारापासून भ्रष्ट आणि ५ पशुवमूल अर्थात् जीवत्वप्रापक अनादी संस्कार असे विविध पाच प्रकार स्वीकारले आहेत. तसेच म्हटले आहे:-

मिथ्याज्ञानमधर्मश्च सक्तिहेतुश्च्युतिस्तथा ।
पशुत्वमूलं पंचैते तन्त्रे हेया विविक्तिता:।। स.द.सं., पृ.३००

याप्रमाणे पूर्वोक्त तीन मलांमध्ये भेद आहेत. या तीन मलांनाच पाश शब्दाने निर्देशित केले जाते. शिवपुराणामध्ये उल्लेखित 'मलत्रयमयं पाशं भोगभोग्यत्वलक्षणम्'( शि.पु. ७.२.१७,२७) मलत्रयस्वरूपी पाशभोग भोग्यत्वाच्यो लक्षणाने युक्त असतो. या मलत्रयरूपी पाशाने बद्ध असलेला जीव पशू म्हणून संबोधिला जातो. पाशमुक्त झालेला पशू पतिसह समरस होतो.

### मोक्षोपायामध्ये शक्तिपात व दीक्षा

वीरशैवदर्शनामध्ये साधनेला प्राधान्य आहे येथे दीक्षेशिवाय साधनेत प्रवेश करता येणे शक्य नाही. म्हणून येथे दीक्षा अनिवार्य आहे. दीक्षेमुळे जीवाच्या आणवादी मलत्रयांची निवृत्ती होते. परब्रह्मपरशिव अशा महालिंगाद्वारे स्वआत्म्याशी अभिन्न असे शिवज्ञान शीघ्र प्राप्त करा, असा उपदेश भगवत्पादपूज्य श्रीरेणुकाचार्य करतात:-

दीयते च शिवज्ञानं क्षीयते पाशबन्धनम्।
यस्मादत: समाख्याता दीक्षेतीयं विचक्षणै:।। सि.शि.६.११-१२

अशाप्रकारे दीक्षाशब्दातील अक्षरांचा अर्थ आचार्यांनी प्रतिपादन केला आहे. श्रीकृष्णद्वैपायनव्यासांनी सुद्धा असे म्हटले आहे:-

संस्कारं परमं पुण्यं शिवेन परिभाषितम्।।
दीयते येन विज्ञानं क्षीयते पाशबन्धनम्।
तस्मात् संस्कारं एवाऽयं दीक्षेत्यपि च कथ्यते।। शि.पु. ७.२.१५.५

अशाप्रकारे उपरोक्त अर्थ येथे सांगितला आहे. श्रीजयरथाने सुद्धा

दीयते ज्ञानसद्भाव: क्षीयन्ते पशुवासना:।
दानक्षपणसंयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता।। तं.नि. १.४३

असे वचन उद्धृत करून तोच आशय अभिव्यक्त केला आहे. ही दीक्षा सर्वांकरिता सुलभ नाही. कारण 'शक्तिपातं समालोक्य दीक्षया योजयेदमुम्' (सि.शि.६.१०) अर्थात् शक्तिपात झालेला आहे का, हे पाहून दीक्षासंस्कार करावा' असे भगवत्पादपूज्य श्रीरेणुकाचार्यांनी म्हटले आहे.

ईश्वराच्या अनुग्रहासच 'शक्तिपात' असे संबोधतात. हा ईश्वर अनुग्रह अनेक जन्मांतील नित्य–नैमित्तिक–प्रायश्चित्त कर्मांच्या अनुष्ठानाने व पूर्वार्जित पापांचा क्षय झाल्यानेच प्राप्त होत असतो. अशा प्रकारच्या शक्तिपातास पात्र साधकाच्या तप्त शरीरास पक्कमल असे संबोधतात. याविरुद्ध असलेल्या अतप्त शरीरास अपक्कमल असे संबोधतात. असे म्हटले आहे:–

तपस्तप्ता तनुर्यस्य स तप्ततनुरुच्यते।
परिपक्को विमोक्षाय सोऽश्नुते लि'धारणम्।।
न करोति तप: पूर्वं सोऽतप्ततनुरुच्यते।
अपक्कोऽयं विमोक्षाय नाश्नुते लि'धारणम्।। वी.आ.चं.,पृ.७८

तसेच रेणुकाचार्यांनी सुद्धा

अतप्ततनुरज्ञो वै आम: संस्कारवर्जित:।
दीक्षया रहित: साक्षान्नाप्नुयाल्लि'मुत्तमम्।। सि.शि.६.३९

अशाप्रकारे अपक्कमल अर्थात् ईश्वरानुग्रहरहित जीव. अशा अनधिकारी व्यक्तीस वीरशैवसंप्रदायामधील क्रियादीक्षेद्वारे प्राप्त इष्टलिंगधारणेचा अधिकार नसतो, असे सुचविले आहे.

या ठिकाणी हे जाणून घेणे आवश्यक आहे की, पूर्वोक्त तीन प्रकारचे मल आम व पक्क या दोन प्रकारचे आहेत. कृष्णद्वैपायन व्यासांनी सुद्धा 'मलोऽप्यामश्च पक्कश्च भवेत् संसारकारणम्' असे म्हटले आहे. येथे तपाने प्रक्षालित केलेला पक्क व यापेक्षा विरुद्ध आम होय. पक्ककर्मा मुमुक्षूच ईश्वराच्या अनुग्रहाने शक्तिपातास पात्र होतो. म्हणूनच जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतात:–

स्वकर्मपरिपाकेन प्रक्षीणमलवासन:।
शिवप्रसादाज्जीवोऽयं जायते शुद्धमानस:।।

शुद्धान्त:करणे जीवे शुद्धकर्मविपाकत:।
जायते शिवकारुण्यात् प्रस्फुटा भक्तिरैश्वरी।। सि.शि.५.५२-५३

अशाप्रकारे जीव अनेक जन्मांमध्ये प्राप्त केलेल्या कर्मांद्वारे मल, वासना नष्ट करून नित्य शिवपूजा, शिवाचार व शिवप्रसाद यांच्या प्रभावामुळे जेव्हा शुद्धान्त:करणाचा होतो, तेव्हा त्या जीवाच्या किंचिज्ज्ञत्व, किंचित्कर्तृत्व आदी शक्ती भक्तीमध्ये परिणत होतात. तेव्हा जीवास अंग असे संबोधतात. या शुद्ध जीवाचे पिंड असेही नाव आहे. म्हणून श्रीरेणुकाचार्य उपदेश करीत असताना

बहुजन्मकृतै: पुण्यै: प्रक्षीणे पापपंजरे।
शुद्धान्त:करणो देही पिण्डशब्देन गीयते।।
शिवशक्तिसमुत्पन्ने प्रपंचेऽस्मिन् विशिष्यते।
पुण्याधिक: क्षीणपाप: शुद्धात्मा पिण्डनामक:।। सि.शि.५.३१-३३

अशाप्रकारे शुद्धान्त:करणी साधकामध्ये आत्मानात्मविवेक उत्पन्न होतो. या विवेकाद्वारे तो शरीर, इंद्रिये, मन व बुद्धी यांपेक्षा भिन्न असलेल्या आत्म्यास जाणून ईश्वर व स्वपासून भिन्न स्वच्या प्रेरकास जाणतो. अशाप्रकारे क्षेत्र-क्षेत्रज्ञ विवेकसंपन्नास पिंडज्ञानी असे संबोधतात. याविषयी आचार्य म्हणतात:-

शरीरेन्द्रियबुद्धिभ्यो व्यतिरिक्त:सनातन:।
आत्मस्थितिविवेकी य: पिण्डज्ञानी स कथ्यते।।
शरीरात् पृथगात्मानमात्मभ्य: पृथगीश्वरम्।
प्रेरकं यो विजानाति पिण्डज्ञानीति कथ्यते।। सि.शि.५.४,६

या आत्मानात्मविवेकामुळे व सत्संस्कारामुळे बलपूर्वक ऐहिक फल व भोगांमध्ये विरक्ती निर्माण होते. विरक्तीमुळे राग-द्वेषादी अन्तरिन्द्रियांच्या विषयांच्या व शब्द आदी बहिरिन्द्रियांच्या विषयांच्या विषयी विमुखता निर्माण होऊन शमदमादी षट्संपत्ती प्राप्त होते व त्यामुळे मुमुक्षुत्व येते. यानंतर संसारदु:खनिवृत्तीचा उपाय असलेल्या महालिंगाविषयी जिज्ञासा भक्तिस्वरूपात उदयास येते.

'तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणि: श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्' (मुं.उ. १.२.१२) या श्रुतिवचनानुसार पूर्वोक्त पिण्ड-पिण्डविज्ञान-संसारहेयस्थलसंपन्न जिज्ञासू जीवात्म्याने हातात उपहार घेऊन शिवसिद्धान्ततत्त्वज्ञ, शिष्यांच्या संदेहांचे निराकरण करण्यास समर्थ, सर्वतन्त्रांमध्ये पारंगत, आचार्यकुलोत्पन्न, लिंगांग-

सामरस्यरहस्यबोधक असलेल्या श्रीगुरूंच्या समीप जाऊन

भो! कल्याण महाभाग शिवज्ञानमहोदधे।
आचार्यवर्य सम्प्राप्तं रक्ष मां भवरोगिणम्।। सि.शि. ६.९

अशी प्रार्थना करावी. तेव्हा श्रीगुरूंनी शक्तिपात पाहून दीक्षाविधी संपन्न करावा. श्रीरेणुकाचार्यांच्या मते

लक्षणं शक्तिपातस्य प्रबोधानन्दसम्भवः।
सा यस्मात् परमा शक्तिः प्रबोधानन्दरूपिणी।।
आनन्दबोधयोर्लि"मन्तःकरणविक्रियाः।
यथा स्यात् कम्परोमांचस्वरनेत्रा"विक्रियाः।। क्रि.सा., भा.२, पृ.१९५

याप्रमाणे शक्तिपाताची चिन्हे पाहून त्यानंतर दीक्षा द्यावी.

## त्रिविध दीक्षा

योगांग-भोगांग-त्यागांग अर्थात् कारण-सूक्ष्म-स्थूल इत्यादींमध्ये विद्यमान असलेल्या आणव, मायीय व कार्म मलत्रयांच्या निवारणार्थ शैव-शाक्त दर्शनांमध्ये प्रतिपादन केलेली तीन प्रकारची दीक्षा वीरशैवदर्शनाने सुद्धा अंगीकारली आहे. म्हणून अगस्त्यांना उपदेश करताना श्रीरेणुकाचार्य म्हणतातः-

सा दीक्षा त्रिविधा प्रोक्ता शिवागमविशारदैः।
वेधारूपा क्रियारूपा मन्त्ररूपा च तापस।। सि.शि.६.१२

मायिदेवांनी सुद्धा

तनुत्रयगतानादिमलत्रयमसौ गुरुः।
दीक्षात्रयेण निर्दग्धा लिंगत्रयमुपादिशत्।
यथा पुरत्रयं दग्धं युगपत् पुरवैरिणा।।
तथा मलत्रयं दग्धं युगपद् देशिकात्मना।
वेधा-मनु-क्रियाकारा दीक्षा शैवी शिखा मता।। अ.सू. ५.५२-५४

अशाप्रकारे त्रिविध दीक्षेद्वारे तीन मलांपासून निवृत्ती प्रतिपादन केली आहे.

## वेधादीक्षा

गुरोरालोकमात्रेण हस्तमस्तकयोगतः।
यः शिवत्वसमावेशो वेधा दीक्षेति सा मता।। सि.शि. ६.१३

या आचार्योक्तीनुसार, श्रीगुरू स्वत:च्या दिव्यदृष्टिपाताने व स्वहस्ताने शिष्याच्या मस्तकास स्पर्श करतात व त्यास चिद्रूपाचे दर्शन करवून देतात. अर्थात् श्रीगुरूंच्या अवलोकनाने व हस्तमस्तकसंयोगाने शिष्यास स्वचित्स्वरूपाचा बोध होतो, हीच वेधादीक्षा होय. या दीक्षेमुळे शिष्याचा आणवमल नाहीसा होतो व त्यामध्ये 'शिवोऽहम्' भावना उदयास येते. ही 'शिवोऽहम्' भावनाच भावलिंग होय. अशाप्रकारे वेधादीक्षेच्या माध्यमातून आणवमलापासून निवृत्ती प्राप्त होते. शिवोऽहम् भावनेमुळे शिवजीवैक्य सामरस्ययोगाची प्राप्ती होते. वेधादीक्षेच्या माध्यमातून प्राप्त शिवोऽहम्भावनामयी भावलिंगधारण करणारा हा जीव सिद्धान्तानुसार 'योगांग' असे संबोधिला जातो. म्हणूनच

संयुयोज त्रिधाभूतं परादीक्षाबलेन तु।
योगांगे भावलिंगं तु वेधादीक्षाबलेन वै।। अ.सू. ५.५७

अशाप्रकारे मायिदेवांनी सुद्धा वेधादीक्षेद्वारे योगांगाद्वारेच भावलिंगधारणा उपदेशिली आहे.

**मान्त्री दीक्षा**

'मान्त्री दीक्षेति या प्रोक्ता मन्त्रमात्रोपदेशिनी' (सि.शि.६.१४) या आचार्यांच्या उपदेशानुसार शिष्याच्या उजव्या कानामध्ये गूढ अशा पंचाक्षरीमंत्राचा उपदेश करावा. या दीक्षेस मान्त्री दीक्षा असे म्हणतात. शिव हा पंचाक्षरमंत्रस्वरूपी आहे. म्हणून शिवमंत्राचा श्रीगुरूंच्या आदेशानुसार प्राणायामपूर्वक पुन:पुन्हा अनेक आवृत्ती केल्यावर साधकाच्या सूक्ष्मशरीरामध्ये विद्यमान असलेला मोहमयी मायीय मल नष्ट होतो. तसेच या दीक्षेद्वारे शिष्यास 'चिद्रूपोऽहम्' या अवस्थेचा बोध होतो. ही 'चिदहन्ता'च 'प्राणलिंग' असे संबोधिली जाते.

अशाप्रकारे शिष्याचा मायीयमल निवारण करणारी प्राणलिंगाचा बोध करवून देणाऱ्या दीक्षेला मान्त्री दीक्षा असे संबोधतात. दीक्षासंपन्न असा हा साधक सर्व भोगवस्तू परशिवास निवेदन करतो, यास 'भोगांग' असे संबोधतात. 'मन्त्रदीक्षाबलेन भोगांगे प्राणलिंगकम्' (अ.सू. ५.५८) अशाप्रकारे शिवयोगी मायिदेवांनी भोगांगरूपी सूक्ष्मशरीरामध्ये मान्त्रीदीक्षेद्वारे प्राणलिंगधारणा उपदेशिली आहे.

**क्रियादीक्षा**

'कुण्डमण्डलिकोपेता क्रियादीक्षा क्रियोत्तरा' (सि.शि. ६.१५) या आचार्य

आज्ञेनुसार मण्डप–देवता यांची प्रतिष्ठापना करून दिल्या जाणाऱ्या क्रियाप्रधान दीक्षेला क्रियादीक्षा असे संबोधतात. वीरशैवसिद्धान्तामध्ये या संप्रदायाचे प्रवर्तक रेणुकादी पंचाचार्यांच्या संप्रदायातील पट्टाभिषिक्त परंपरागत मठाधिकारी श्रीगुरूंनी हा दीक्षाविधी संपन्न करावा. या समादरणीय मठाधिपतींनी एका शुभमुहूर्तावर मठ–मंदिर इत्यादी पवित्र क्षेत्रांमध्ये मंडप निर्माण करून त्यामध्ये रेणुक–दारुक–घण्टाकर्ण–धेनुकर्ण–विश्वकर्ण या त्रिभुवनप्रसिद्ध पंचाचार्यांचे प्रतीक अशा पंचकलशांची स्थापना करावी, त्यानंतर आचार्यांना आवाहन करावे. त्यांच्या साक्षीने कलशजलाने शिष्याचा तीन वेळा अभिषेक करावा. शिष्याच्या मांसपिंडाचे मंत्रपिंडात परिवर्तित करण्यासाठी उजव्या कानामध्ये पंचाक्षरीमंत्राचा उपदेश करावा. त्या शिष्यास पंचाक्षरी मंत्राचे स्वरूप, त्याचा छंद, ऋषी, देवता, अधिदेवता, करन्यास, अंगन्यास यांचे निरूपण करावे. श्रीरेणुकाचार्यांच्या मते

पंचब्रह्ममयैस्तत्र स्थापितैः कलशोदकैः।
आचार्यः सममृत्विग्भिस्त्रिः शिष्यमभिषिंचयेत्।।
अभिषिच्य गुरुः शिष्यमासीनं परितः शुचिम्।
ततः पंचाक्षरीं शैवीं संसारभयतारिणीम्।।
तस्य दक्षिणकर्णे तु निगूढमपि कीर्तयेत्।
छन्दोरूपमृषिं चास्य देवतान्यासपद्धतिम्।। सि.शि. ६.१९–२१

अशाप्रकारे मंत्रोपदेशाने शिष्याचा देह परिमार्जित केल्यानंतर पंचसूत्रप्रक्रियेने युक्त अंगुष्ठप्रमाण शैलज अथवा नर्मदाबाण प्रकारचे शिवलिंग जल–धान्य–पंचगव्य, पंचामृताने अभिषिक्त करून मूलपंचाक्षरीमंत्राद्वारे संस्कारित करून त्या शिवलिंगामध्ये शिवकला व प्राणप्रतिष्ठा करून ते लिंग शिष्याच्या हातात देऊन उपदेश आचार्य करावा.

प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिंगमिदं तव।
कदाचित् कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः।।
यदि प्रमादात् पतिते लिंगे देहान्महीतले।
प्राणान् विमुंच सहसा प्राप्तये मोक्षसम्पदः।। सि.शि. ६.२६–२७

अशाप्रकारे क्रियादीक्षेद्वारे प्राप्त शिवलिंगास 'इष्टलिंग' असे संबोधतात. इष्टलिंगधारणा हा क्रियादीक्षेचा मुख्य उद्देश होय. या दीक्षेद्वारे कार्ममलापासून

अर्थात् शुभाशुभ वासनांपासून निवृत्ती प्राप्त केली जाते.

म्हणूनच वीरशैवसिद्धान्तामध्ये मुक्तिप्रदायक दीक्षेला प्राधान्य आहे. आतापर्यंत वर्णन केलेल्या दीक्षांनी संस्कारहीन जीव दीक्षासंपन्न होऊन शुद्ध जीव होतो. श्रीगुरूंच्या आदेशानुसार जो शिवस्वरूप प्राप्त करतो तो मुक्तजीव होय, असे शैवागमांमध्ये प्रतिपादन केले आहे. यासंदर्भात भाष्यकार श्रीपतिपंडिताराध्य म्हणतात:-

बद्धशुद्धादिभेदेन जीवत्रयमिदं स्मृतम्।
गुरुदीक्षाविहीनश्च शिवभक्तिविवर्जित:।।
स्वकर्तृत्वाभिमानी तु बद्ध: स पशुरुच्यते।
गुरुदीक्षां परां लब्ध्वा कैङ्कर्यत्रयसंयुत:।।
शक्त्यादिसद्गुणोपेतो मुमुक्षू रागवर्जित:।
शिवाधीन: सुधीर्भक्त: शुद्धजीव इति स्मृत:।।
शिवयोगशिवज्ञानविभवानन्दसंयुत:।
प्रचण्डातपमध्यस्थशुद्धकर्पूरदीपवत्।।
शिवाकारे पराकाशे कोटिसूर्यप्रकाशके।
विलीनचित्तवृत्तिस्तु मुक्तजीव इति स्मृत:।। श्री.भा .२.३.४६

अशाप्रकारे वर्णन केलेला दीक्षासंपन्न शुद्धजीवच मुमुक्षू असे संबोधिला जातो.

## ज्ञान व कर्म यांचा समुच्चय

वीरशैवसिद्धान्तामध्ये पूर्वमीमांसकांप्रमाणे केवल कर्म किंवा सांख्य-न्याय-वैशेषिक-अद्वैतवेदान्तांप्रमाणे केवल ज्ञान यांचाच मोक्षहेतू म्हणून अंगीकार केला नाही, तर 'भावकर्मसमायुक्तं ज्ञानमेव विमुक्तिदम्' (सि.शि.१६.२) या आचार्य वचनानुसार भाव-कर्म यांच्या समन्वयाने युक्त ज्ञानास मोक्षाचा हेतू स्वीकारले आहे. येथे भावना ही उभयात्मिका आहे अर्थात् कर्माच्या आचरणामध्ये व ज्ञानप्राप्तीमध्ये दोहोंमध्ये भावनेची नितांत आवश्यकता आहे. येथे कर्ममयी भावना भक्ती तर ज्ञानमयी भावना निदिध्यासन संबोधिली जाते. म्हणून श्रीरेणुकाचार्य असे म्हणतात:-

अर्थहीना यथा वाणी पतिहीना यथा सती।
श्रुतिहीना यथा बुद्धिर्भावहीना तथा क्रिया।। सि.शि. १६.१९

अर्थ नसलेले बोलणे जसे योग्य नव्हे, पतिविना स्त्री जशी शोभत नाही किंवा वेदांचे ज्ञान नसणारी बुद्धी जशी अयोग्य त्याप्रमाणे भावहीन क्रिया व्यर्थ होय. अशाप्रकारे भावनारहित कर्माचा त्याग किंवा निंदा केली आहे.

भावनाविहितं कर्म पावनादपि पावनम्।
तस्माद् भावनया युक्तं परधर्मं समाचरेत्।। सि.शि. १६.६८

भावपूर्वक केलेल्या शिवपूजादी धर्मपूजादी धर्मक्रिया अत्यंत पावन असतात. म्हणून कोणतेही धर्मकृत्य भावपूर्ण अंत:करणाने करावे.

भावेन हि मन:शुद्धिर्भावशुद्धिश्च कर्मणा।
इति संचिन्त्य मनसा योगी भावं न संत्यजेत्।। सि.शि. १६.६९

शिवपूजादी धर्मकृत्यांनी भावनेची शुद्धी होते व भावशुद्धीने मनाची शुद्धी होते असा विचार करून शिवयोग्याने सद्भाव सोडू नये. भावपूर्वक केलेल्या कर्मानेच फलप्राप्ती होते. म्हणून कधीही भाव सोडू नये.

शिवभावनया सर्वं नित्यनैमित्तिकादिकम्।
कुर्वन्नपि महायोगी गुणदोषैर्न बाध्यते।। सि.शि. १६.७०

शिवयोग्याने नित्य आणि नैमित्तिक कर्मे, शिवच त्यांचा कर्ता आणि करविता आहे अशा शिवभावनेने व निष्काम बुद्धीने केल्यामुळे त्या कर्मांच्या गुणदोषांची बाधा शिवयोग्यांना होत नाही. अशाप्रकारे भावनायुक्त कर्माची प्रशंसा सांगितली आहे. तसेच

चक्षुर्हीनो यथा रूपं न किचिद्वीक्षितुं क्षम:।
भावहीनस्तथा योगी न शिवं द्रष्टुमीश्वर:।। सि.शि.१६.२०

नेत्रहीन अंधाला जसे थोडेही रूप दिसू शकत नाही तसे भाव नसणारा योगी शंकराचे यथार्थ दर्शन घेऊ शकत नाही. याप्रमाणे निषेधविधीद्वारे भावनाविशिष्ट ज्ञानाची प्रशंसा या सिद्धान्तात केली आहे. म्हणून भाव व कर्म समन्वयात्मक ज्ञान हेच मोक्षाचे कारण होय, असे निश्चयाने येथे सिद्ध केले आहे.

वास्तविक जर ज्ञान-कर्म-भावना ही तीन मोक्षाची साधने असतील तर 'तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्य: पन्था विद्यतेऽयनाय' (श्वे.उ. ३.८) या श्रुतिवचनानुसार ज्ञानाशिवाय अन्य मोक्षाचे साधनच नाही, मग कर्म आणि भावना यांचे निरसन केले आहे का? तर असे नाही. ज्ञान व कर्माच्या समन्वयाने, ज्ञान व कर्म-

अंगअंगीभाव यांच्या समन्वयाने समाधान शक्य आहे.

अन्धपंगुवदन्योन्यसापेक्षे ज्ञानकर्मणी।
फलोत्पत्तौ विरक्तस्तु तस्मात् तद्द्वयमाचरेत्।। सि.शि. १६.११

आंधळा आणि पांगळा हे जसे परस्परांवर अवलंबून असतात तसेच ज्ञान आणि कर्म परस्परसापेक्ष आहेत. म्हणून ज्ञानी शिवयोग्याने त्यांपैकी कशाच्याही फळाची आसक्ती न ठेवता दोहोंचे आचरण करावे. ज्ञान आणि कर्म यांच्या संयुक्त आचरणानेच त्याला मुक्ती मिळते.

ज्ञाने सिद्धेऽपि विदुषां कर्मापि विनियुज्यते।
फलाभिसन्धिरहितं तस्मात् कर्म न संत्यजेत्।। सि.शि. १६.१२

ज्ञानसिद्धी झाली तरी विद्वानाने कर्म केलेच पाहिजे. वेदान्तशास्त्रात अग्निहोत्रादि कर्मे फळाची अपेक्षा न बाळगता करावीत असे विधान आहे. त्या त्या आश्रमविहित कर्माच्या त्यागाने मनुष्य पतित होतो. ज्ञानप्रधान असले तरी ते कर्मविरहित नसावे आणि कर्माचे प्राधान्य असले तरी ते ज्ञानशून्य नसावे. पक्ष्याला उडण्यासाठी जशी दोन पंखांची गरज असते तशा प्रकारे मुक्ती मिळविण्यासाठी ज्ञान आणि कर्म यांची आवश्यकता असते.

आचार एव सर्वेषामलङ्काराय कल्प्यते।
आचारहीनः पुरुषो लोके भवति निन्दितः।।
ज्ञानेनाचारयुक्तेन प्रसीदति महेश्वरः।
तस्मादाचारवान् ज्ञानी भवेदादेहपातनम्।। सि.शि.१६.१३-१४

आचार हा सगळ्यांसाठी अलंकारांसारखा महत्त्वाचा आहे. आचारहीन पुरुषाची लोक निंदा करतात. ज्ञानासह आचार असेल तर भगवान शिव प्रसन्न होतो. म्हणून आयुष्यभर आचारसंपन्न असावे.

ज्ञानहीनं सदा कर्म पुंसां संसारकारणम्।
तदेव ज्ञानयोगेन संसारविनिवर्तकम्।। सि.शि.१६.२७

ज्ञानविरहित कर्मे करीत राहिल्याने मनुष्याचा संसारताप वाढतो. उलट तीच कर्मे ज्ञान असून केली तर संसारदुःखातून सोडविण्यास कारण होतात.

या स्थलांमध्ये भगवत्पादपूज्यश्री रेणुकाचार्य महर्षी अगस्त्यांना ज्ञानकर्म-समन्वयात्मक हा सिद्धान्त प्रतिपादन करतात. या ठिकाणी एक रहस्य आहे.

कर्माचे दोन प्रकार होतात– पतिकर्म व पशुकर्म. अग्निष्टोम, अश्वमेध इत्यादी यज्ञे स्वर्गाची साधने सांगितली आहेत. त्याद्वारे निःश्रेयसप्राप्ती होते, परंतु ही कर्मे पाशयुक्त आहेत म्हणून यांना पशुकर्म असे संबोधले आहे. तर इष्टलिंगधारणा–लिंगार्चना–प्रसाद–लिंगानुसंधान–गुरुजंगमपूजन–पादोदकसेवन–लिंगांग–सामरस्यबोधक पंचाक्षरीजप–भस्मरुद्राक्षधारणा–पंचाचार इत्यादी वीरशैवधर्मीयांचे पाशमुक्ती करणारे पतिकर्म होय. भगवत्पाद पूज्य श्रीनीलकण्ठ शिवाचार्यांनी 'अथाऽतो ब्रह्मजिज्ञासा'(ब्र.सू.१.१.१) या सूत्राची व्याख्या करीत असताना अथ शब्दाचा धर्मानन्तर्यार्थ विशद केला आहे:–

धर्मानन्तर्यमेवातो वाच्यं धर्मो द्विधा मतः।
पशुधर्मः प्राथमिकः पतिधर्मो द्वितीयकः।।
पशुधर्म इति प्राहुर्यस्तु काम्यफलप्रदः।
निष्कामेन स्वपापस्य विच्छित्त्यै समनुष्ठितः।।
यो धर्मस्तं तु शास्त्रेषु पतिधर्मं प्रचक्षते। क्रि.सा.भा.१, पृ. १६–१७

अशाप्रकारे धर्माचे दोन भेद प्रतिपादन करीत असताना

भस्मधारणमुख्यं हि कालाग्न्युपनिषन्मुखैः।
बृहज्जाबालमुख्यैश्च विहितं तत् पदे पदे।।
रुद्राक्षधारणं चैव दहरोपासनादिकम्।
कालयोः शिवपूजा च त्रिषु कालेषु वा सदा।।
विद्यासु श्रुतिरुत्कृष्टा रुद्रैकादशिनी श्रुतौ।
तत्र पंचाक्षरो मन्त्रः शिवः इत्यक्षरद्वयम्।।
इति श्रुतिशिरोरत्नशिरोरत्नमनोर्जपः।
आचार्यदेव इत्युक्तमन्त्रदेशिकपूजनम्।।
प्रसादग्रहणं तस्येत्याद्याः पाशविमोचकाः।
पतिधर्मा इमे ज्ञेयास्तदानन्तर्यमत्र च।। क्रि.सा., भा.१, पृ.१७

अशाप्रकारे पतिधर्माचे स्वरूप विशद केले आहे.

अनुतिष्ठन् पशोधर्मान् पतिधर्मान् स चार्हति।
यथा पिपीलिका वृक्षमूलमाघ्राय तत्फलम्।।
आरुह्य लभते तद्वत् पतिधर्मैकतत्परः।

यथा विहंग पक्षाभ्यां फलितं वृक्षमागतः।।
पश्यन् फलमवाप्नोति तद्वच्छीघ्रं तदर्हति। क्रि.सा., भा.१, पृ.१७

इत्यादी उद्धरणांद्वारे निष्कामवृत्ती असलेल्या व्यक्तीने स्वपापांच्या छेदाकरिता पशुधर्माचे अनुकरण करणे म्हणजे पिंपळाच्या वृक्षासमान आहे तर पतिधर्माचे अनुकरण हेच विहंग अर्थात् मुक्त पक्ष्याप्रमाणे आहे. म्हणून पशुधर्माचे निष्कामबुद्धीने आचरण करण्यापेक्षा पतिधर्माचे अनुकरण मुक्तीकरिता श्रेष्ठ आहे, असे परंपरा स्वीकारते. पतिधर्माचे अनुकरण हेच मुक्तीचे साधन होय. तसेच पशुकर्मे यज्ञ इत्यादी करीत असताना ज्ञान समुच्चयामध्ये विरोध दिसून येतो परंतु पतिकर्मामध्ये इष्टलिंगपूजादिद्वारे ज्ञानसमुच्चयामध्ये कोणताही विरोध पाहावयास मिळत नाही. याशिवाय

विद्यां चाऽविद्यां च यस्तद्वेदोभयं सह।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते।। ई.उ. ११

या ठिकाणी श्रुतीद्वारे ज्ञान व कर्म यांचा समन्वय प्रतिपादन केला आहे. या श्रुतीच्या व्याख्येत पं.उमचिगिशंकरशास्त्रीमहोदयांनी वीरशैवदर्शनाचे वैशिष्ट्य विशद केले आहे. तसेच 'विद्या म्हणजे ब्रह्मात्म्यैक्य ज्ञान होय तर अविद्या म्हणजे विद्येशिवाय असलेली क्रिया होय, जसे शिवलिंगाचे यजन-भजन इत्यादी. या दोन्ही एकत्र येऊन समानाधिकरण प्राप्त करतात, जो परमपुरुषार्थसाक्षात् साधनाद्वारे वेद जाणून घेतो, तर अविद्येद्वारे शिवलिंगार्पित पतिकर्माद्वारे मरणजननादी प्रवाहांचे मूल मलत्रयाचे अतिक्रमण करतो, विद्येद्वारे स्वस्वरूपशिवज्ञानाद्वारे अमृत अर्थात् शक्तिविकासरूपी अमृतत्व प्राप्त करतो. (ई.उ. ११ शा.)

येथे एक जिज्ञासा अशी की, कर्मफल चार प्रकारचे असते. उत्पत्ती, प्राप्ती, विकृती आणि संस्कृती. त्याहून विपरीत विद्येचे फल अविद्यानिवृत्ती असते. अशा स्थितीत विद्या व कर्म यांमध्ये एकाधिकरण कसे शक्य होईल, ही जिज्ञासा आहे. शिंपल्याला नीट पाहिल्यावर चांदी असल्याचा भास लगेच निघून जातो. त्याला आचमन स्नानादी क्रिया करण्याची गरज नाही. तसेच ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावर अविद्या निवृत्त होते. श्रुतीदेखील म्हणते, 'तमेव विदित्वाति मृत्युमेति नान्यः पंथाः विद्यतेऽयनाय।'

स्मृतीदेखील श्रुतीचे अनुगमन करते व म्हणते, 'ज्ञानादेव तु कैवल्यं प्राप्यते

येन मुच्यते। तस्मात् कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिनः' याचे समाधान असे की वरील वचनाचे तात्पर्य निराकरणामध्ये आहे. स्थूल कर्माला कैवल्याचे साधन मानले जाऊ शकत नाही. ज्ञान व कर्म समुच्चय यातून कैवल्यसाधनता अनुपपन्न नाही. नसता 'अन्धतमः प्रविश्यन्ति' या श्रुतीने प्रत्येकाच्या कारणतेत दोष दाखवून 'विद्यां चाऽविद्यां च' या श्रुतीप्रमाणे मोक्षाचे कारणसमुच्चय मानावा लागेल.

परंतु श्रुतिस्मृतीमध्ये ज्ञानकर्मांमध्ये समन्वय प्रतिपादन केलेला आहे. जसे- 'तेनैति ब्रह्मवित् पुण्यकृत् तैजसश्च' (बृ.उ. ४.४.९), 'सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा। सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्' (मु.उ. ३.५), तत्प्राप्तिहेतुर्ज्ञानं च कर्म चोक्तं महामुने'(भ.सं.उ. १.३२), 'यथान्नं मधुसंयुक्तं मधु चाऽन्नेन संयुतम्। एवं तपश्च विद्या च संयुक्तं भेषजं महत्।।' तसेच कर्मनिंदा करणाऱ्या वाक्यांमध्ये केवळ ज्योतिष्टोमादी स्थूलकर्मांचे विषय सांगितले आहेत. यामध्ये ज्ञानयुक्तलिंगधारणादी पतिकर्मांपासून प्राप्त मोक्षाचे वर्णन नाही. तेथे भवन-दोहन-अभिषव-प्रोक्षण-पिण्डपय-सोम-व्रीही इत्यादींचे उत्पत्ती-कार्य-संस्कार सांगितले आहेत. उत्पत्ती-विकृति-संस्कृती यांचे ज्ञान हेच केलेले पशुकर्माची फले होत. तर ज्ञानयुक्तलिंगधारणादी पतिकर्माद्वारे पुनरावृत्तिरहित सर्वज्ञत्व षडंगशिवप्राप्ती हेच फल सांगितले आहे.

डॉ. टी.जि.सिद्धप्पाराध्य महोदयांनी आपले मत मांडले आहे, ते असे, पुरुषार्थाच्या आधाराने प्रतिपादित तत्त्वांच्या आधारानेच कर्माचे ज्ञानांगत्व भाष्यामध्ये स्पष्ट केले आहे. तरी सुद्धा ज्ञान व कर्म यांचे अनुकरण सर्व आश्रमांतील व्यक्तींनी करावे याकरिता भाष्यात ज्ञानकर्मसमुच्चय हा शब्द नमूद केला आहे. पूर्वीच सांगितल्याप्रमाणे कर्माचे व ज्ञानाचे अंगत्व स्पष्टपणे विशद करीत असताना समुच्चय सांगितला आहे, समानसमुच्चय किंवा अंगीभावसमुच्चय सुद्धा नाही. कर्मज्ञानामध्ये अंगी-अंगसंबधाने जे फल अंगीचे असते तेच अंगाचे सुद्धा असते या न्यायाने कर्मसुद्धा मोक्षाचे साधन आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये 'अन्धपंगुवदन्योन्यसापेक्षे ज्ञानकर्मणी' (सि.शि.१६.११) या उक्तीनुसार सुद्धा हाच सिद्धान्त मांडला आहे. उपसंहारामध्ये 'ज्ञानेनाचारयुक्तेन प्रसीदति महेश्वरः' (सि.शि.१६.१४) असे आचारयुक्त ज्ञानाने असा निर्देश करीत असताना ज्ञानाचे प्राधान्य प्रतिपादित केले आहे. ज्ञानाच्या प्राधान्यामध्ये कर्माचे अंगत्व स्वतः सिद्ध

होते. म्हणून 'अन्धपंगुवत्' इत्यादी श्लोकामध्ये ज्ञान व कर्म ही दोन्ही मोक्षाची साधने आहेत, असे आग्रहाने सांगितले आहे. तरी

शिवोऽहमिति भावो हि शिवतापत्तिकारणम्।
न ज्ञानमात्रं नाचारो भावयुक्तः शिवो भवेत्।। सि.शि. १६.१६

अशाप्रकारे भावसुद्धा मोक्षाचे साधन आहे हे स्वीकारत असताना ज्ञान, कर्म व भाव यांचा समुच्चय सांगितला आहे. म्हणून ज्ञानच मोक्षाचे साधन आहे. भाव व कर्म त्याची अंगे होत. 'अंगिफलमंगस्यापि' या न्यायाने कर्म व ज्ञानसुद्धा मोक्षाची साधने होत, असे स्पष्ट केले आहे. म्हणून कर्म ज्ञान यामध्ये अंग-अंगीभावाचा समुच्चय आढळतो, म्हणून सम समुच्चय असे म्हणावयाची आवश्यकता नाही. तसेच कर्माच्या अप्राधान्याने स्वातंत्र्याने त्याचे मोक्षसाधनाच्या अभावाने 'नान्यः पन्था विद्यतेऽयनाय' अशी ज्ञानाशिवाय मोक्षप्राप्तीचा निषेध किंवा विरोध न करता येथे श्रुतिसूत्र व आगमांचे सामरस्य दिसते.

नान्यः पन्थेति वाक्येन मार्गान्तरनिषेधतः।
तेषां विद्याङ्गता प्रोक्ता नान्यथेति विनिश्चयः।। श.वि.द. १२८-[illegible]

अशाप्रकारे क्रियासारामध्ये सुद्धा कर्मांना विद्येचे अंग असे स्वीकारले आहे.

### शिवाचा अनुग्रह मोक्षाचे कारण

वास्तविक वीरशैवदर्शनामध्ये

शम्भोः शिवप्रसादेन संसारच्छेदकारिणा।
मोहग्रन्थिं विनिर्भिद्य मुक्तिं यान्ति विवेकिनः।।
विनाप्रसादमीशस्य संसारो न निवर्तते।
विनासूर्योदयं लोके कुतः स्यात् तमसो लयः।।
सर्वानुग्राहकः शम्भुः केवलं कृपया प्रभुः।
मोचयेत् सकलान् जन्तून् किंचिदिह कारणम्।। सि.शि.१८.५१-६२

या आचार्योक्तीनुसार परशिवाचा अनुग्रहच मोक्ष होय, असे स्वीकारले आहे. हा अनुग्रह म्हणजे केवळ परशिवाचे ज्ञानच असा अर्थ नाही तर त्या शिवाची अर्चना हे कर्म येथे अपेक्षित आहे. म्हणून तर रेणुकाचार्य उपदेश करीत असताना 'शिवार्चा कर्म विज्ञेयं बाह्यं यागादी नोच्यते' असे हे कर्मस्वरूप विशद करतात.

शिवात्मकमिदं सर्वं शिवादन्यन्न विद्यते।
शिवोऽहमिति या बुद्धिस्तदेव ज्ञानमुत्तमम्। सि.शि. १६.३१
ज्ञानस्याविषये तत्त्वे शिवाख्ये चित्सुखात्मनि।
आत्मैकत्वानुसन्धानं ज्ञानमित्युच्यते बुधैः।। सि.शि. १९.९३

इत्यादी श्लोकांद्वारे ज्ञानाचे लक्षण सांगितले आहे. अशाप्रकारे शिवज्ञानसंपन्न व्यक्ती शिवार्चनेने शिवानुग्रह प्राप्त करून मुक्त होते. म्हणून शिवानुग्रहाकरिता अपेक्षित ज्ञान कर्म हेच मोक्षाचे हेतू स्वीकारून ज्ञानकर्माचा समसमुच्चय प्रतिपादन केला आहे.

परंतु, वीरशैवदर्शनामध्ये शिवोऽहम् असा शिवात्म ऐक्यभाव ज्ञानसंपन्न जर स्वैराचाराने वर्तन करेल तर सामान्य व्यक्तीसुद्धा त्यांचे अनुकरण करीत स्वैराचारी होईल, यामुळे समाजव्यवस्था दूषित होईल. हे दोष निर्माण होऊ नयेत म्हणून रेणुकाचार्यांनी ज्ञानामृताने तृप्त झालेल्या शिवयोग्याने सुद्धा संपूर्ण आयुष्य नित्य-विहित कर्मांचे अनुष्ठान करावे, असा आदेश दिला आहे.

अधर्मं न स्पृशेत्किंचिद्विहितं धर्ममाचरेत्।
तं च कामविनिर्मुक्तं तमपि ज्ञानपूर्वकम्।।
धर्म एव समस्तानां यतः संसिद्धिकारणम्।
निःस्पृहोऽपि महायोगी धर्ममार्गं च न त्यजेत्।।
ज्ञानामृतेन तृप्तोऽपि योगी धर्मं न सन्त्यजेत्।
आचारं महतां दृष्ट्वा प्रवर्तन्ते हि लौकिकाः।।
सदाचारप्रियः शम्भुः सदाचारेण पूज्यते।
सदाचारं विना तस्य प्रसादो नैव जायते।। सि.शि. १६.६१,६४-६६

म्हणून लोकसंग्रहासाठी ज्ञानवंतांनी अनुष्ठान अवश्य करावे म्हणून ज्ञान-कर्म यांचा समन्वय आवश्यकच आहे.

जर तत्त्वज्ञानसंपन्न असूनही लोकसंग्रहाकरिता जर कर्म करीत असतो तरी त्याचे फल भोगावे लागत नाही, कारण ज्ञानी अहंकारशून्य अवस्थेत कर्म करतो, म्हणून त्याला कर्मफल भोगावे लागत नाही. म्हणून श्रीरेणुकाचार्य म्हणतातः-

ज्ञानिनो यानि कर्माणि तानि नो जन्महेतवः।
अग्निदग्धानि बीजानि तथा नाङ्कुरकारणम्।।
कर्मणा किं कृतेनापि ज्ञानिनो निरहङ्कृतेः।

विक्रिया प्रतिबिम्बस्था किं करोति हिमद्युतेः।।
ज्ञानी कर्मनिरूढोऽपि लिप्यते न क्रियाफलैः।
घृतादिना यथा जिव्हा भोक्त्री चापि न लिप्यते।। सि.शि.११.३०,३१,३३

म्हणूनच वीरशैवदर्शनामध्ये ज्ञानवंतांनी सुद्धा लोकसंग्रहाकरिता विहित कर्म करणे आवश्यक आहे.

**षट्स्थल उपासनाक्रम**

ज्ञान व कर्म यांचा समन्वय साधणारा वीरशैव उपासक षट्स्थलसोपान मार्गाने प्रवास करीत मुक्ती प्राप्त करतो. ते सहा सोपान 'षट्स्थल' शब्दाने संबोधिले जातात. ती स्थले भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण, ऐक्य या नावांनी प्रसिद्ध आहेत. येथे उपासना व ज्ञान यांचे तारतम्य असणारा साधक प्रथम भक्त होतो. तोच उपासनाबलाने माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण होतो. तोच शरण क्रमपूर्वक ऐक्यावस्थेला प्राप्त करतो.

वीरशैवास्तु षड्भेदाः स्थलधर्मविभेदतः।
भक्तादिव्यवहारेण प्रोच्यन्ते शास्त्रपारगैः।।
आदौ भक्तस्थलं प्रोक्तं ततो माहेश्वरस्थलम्।
प्रसादिस्थलमन्यत्तुप्राणलिंगिस्थलं ततः।।
शरणस्थलमाख्यातं षष्ठमैक्यस्थलं मतम्। सि.शि.५.२२,२४,२५

**१. भक्त**

शैवी भक्तिः समुत्पन्ना यस्यासौ भक्त उच्यते।
तस्यानुष्ठेयधर्माणामुक्तिर्भक्तस्थलं मतम्।। सि.शि.५.२६-२७

या आचार्योक्तीनुसार भक्तस्थलामध्ये प्रतिपादन केलेल्या आचरणाचे पालन करीत जे शिवाराधना करतात त्या साधकास भक्त असे संबोधतात. जो अनेक जन्मातील निष्काम कर्मांमुळे शुद्धान्तःकरणाचा झाला आहे, जो संसारास असार मानून श्रीगुरूंना शरण जातो, त्रिविध दीक्षांद्वारे इष्ट-प्राण-भावलिंगाची प्राप्ती करतो, यथाविधी भस्मरुद्राक्ष आदी धारण करून शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करतो, सोपाधि-निरुपाधिक-सहज असे त्रिविध दान करतो, गुरु-लिंग-जंगम यांच्याविषयी श्रद्धा बाळगतो, जो नित्य शिवपंचयज्ञात रत असतो, तोच भक्त

होय. येथे तप, कर्म, जप, ध्यान व ज्ञान या पाच प्रकारचा शिवयज्ञ असतो. तप अर्थात् शिवपूजेकरिता शरीर झिजवणे होय, कृच्छ्रचांद्रायणादी मोठी मोठी व्रते नव्हेत. मोठ्या व्रतांमध्ये सहभागी होऊन शरीरास अत्यंत त्रस्त करणे वीरशैवांना मान्य नाही. कर्म म्हणजे यज्ञ इत्यादींचे आयोजन नाही तर नित्य शिवलिंगपूजा करणे होय. येथे वीरशैवांनी ज्योतिष्टोमादींचा निषेध नोंदविला आहे. जप अर्थात् पंचाक्षरी महामंत्र, प्रणव किंवा श्रीरुद्राध्याय यांची पुनरावृत्ती होय. या ठिकाणी वेदाध्ययनास जप असे संबोधिले नाही. ध्यानाचा अर्थ वीरशैवपरंपरेत शिवचिंतन असा अभिप्रेत आहे, आत्मचिंतन नव्हे. तसेच सांख्यादी शास्त्रज्ञानास ज्ञान असे न संबोधता आचार्य शिवागमार्थविज्ञानास ज्ञान असे संबोधतात. अशाप्रकारे भक्तस्थलामध्ये प्रतिपादन केलेला शिवपंचयज्ञरत साधक भक्त असा संबोधिला जातो. म्हणून रेणुकाचार्य म्हणतात:-

पंचधा कथ्यते सद्भिस्तदेव भजनं पुन:।
तप: कर्म जपो ध्यानं ज्ञानं चेत्यनुपूर्वकम्।।
शिवार्थे देहसंशोषस्तप: कृच्छ्रादि नो मतम्।
शिवार्चा कर्म विज्ञेयं बाह्यं यागादि नोच्यते।
जप: पंचाक्षराभ्यास: प्रणवाभ्यास एव वा।
रुद्राध्यायादिकाभ्यासो न वेदाध्ययनादिकम्।।
ध्यानं शिवस्य रूपादी चिन्ता नात्मादिचिन्तनम्।
शिवागमार्थविज्ञानं ज्ञानं नान्यार्थवेदनम्।
इति पंचप्रकारोऽयं शिवयज्ञ: प्रकीर्तित:।
अनेन पंचयज्ञेन य: पूजयति शंकरम्।।
भक्त्या परमया युक्त: स वै भक्त इतीरित:। सि.शि.९.२२-२६

उपरोक्त लक्षणांनी युक्त साधक भक्त म्हणून संबोधिला जातो.

### २. माहेश्वर

माहेश्वरस्थल हे षट्स्थलोपासनेतील दुसरे स्थल आहे. भक्तस्थलातील साधक इष्टलिंग इत्यादी करिता असलेल्या श्रद्धेमुळे तो साधक सागरजलातील शिंपल्यातील मोत्याप्रमाणे माहेश्वर या संज्ञेस प्राप्त होतो. हाच साधक दृढवैराग्य धारण करीत

महेश्वराप्रती दृढ श्रद्धा असल्यामुळे माहेश्वर म्हणून प्रसिद्ध होतो. [illegible] ब्रह्मादी सर्व देवतांपेक्षा श्रेष्ठ समजतो. तोच मोक्षाधिकारी व [illegible] माहेश्वराचे लक्षण सांगताना रेणुकाचार्य म्हणतात:-

भक्तेर्यदा समुत्कर्षो भवेद् वैराग्यगौरवात्।
तदा माहेश्वरः प्रोक्तो भक्तः स्थिरविवेकवान्।।
विश्वस्मादधिको रुद्रो विश्वानुग्रहकारकः।
इति यस्य स्थिरा बुद्धिः स वै माहेश्वरः स्मृतः।।
ईश्वरः सर्वभूतानां ब्रह्मादीनां महामुने।
बुद्धियोगात् तदासक्तो भक्तो माहेश्वरः स्मृतः।।
अनादिमुक्तो भगवानेक एव महेश्वरः।
मुक्तिदश्चेति यो वेद स वै माहेश्वरः स्मृतः।। सि.शि. १०.३/८-१०.१२

याप्रमाणे अंतःकरणाची शुद्धी झाल्यामुळे साधकास नित्य व अनित्य वस्तूंचा विवेक प्राप्त होतो. यामुळे फलभोगामध्ये साधकाची विरक्ती निर्माण होते.

आदातृदातृदेयानां शिवभावं विचिन्त्य हि।
आत्मनोऽकर्तृभावं च यद्दत्तं सहजं तु तत्।। सि.शि. ९.८३

माहेश्वर हा सहजदानामध्ये विश्वस्त असावा. म्हणून रेणुकाचार्य म्हणतात:-

केवले सहजे दाने निष्णातः शिवतत्परः।
ब्रह्मादिस्थानविमुखो भक्तो माहेश्वरः स्मृतः।। सि.शि. १०.२
पतिः साक्षान्महादेवः पशुरेष तदाश्रयः।
अनयोः स्वामिभृत्यत्वमभेदे कथमिष्यते।। सि.शि. १०.४०

या आचार्योक्तीनुसार माहेश्वर हा परमात्म्यास पती तर स्वतःस पशू अर्थात् सेवक असे समजून स्वामि-सेवकभावनेने परमात्म्याची उपासना करतो. म्हणून या माहेश्वरावस्थेत जीव व परमात्मा यांच्यात अत्यंतभेद प्रकट करतो. माहेश्वरावस्थेत क्रियेला प्राधान्य आहे व भेदाशिवाय पूजनादी कर्म करणे शक्य नाही म्हणून भेदावस्थेची आवश्यकता आहे. म्हणून म्हणतात:-

भेदस्य कर्महेतुत्वाद् व्यवहारः प्रवर्तते।
लिंगपूजादिकर्मस्थो न चाद्वैतं समाचरेत्।। सि.शि. १०.४२

अशाप्रकारे भेदबुद्धियुक्त हा माहेश्वर म्हणत असतो:-

अपगच्छतु सर्वस्वं शिरच्छेदनमस्तु वा ।
माहेश्वरो न मुंचेत लिंगपूजामहाव्रतम्।। सि.शि.१०.२

माहेश्वर हा केवळ स्वेष्टलिंगपूजेप्रती निष्ठावान असतो. हा इष्टलिंगास अर्पण केलेले अन्नच प्रसाद सेवन करतो आणि आपली देहवृत्ती संपन्न करतो. त्यास महामाहेश्वर असे म्हणतात. जर कुठे शिवाप्रती अपकर्ष जाणवला तर स्वप्राणाचा त्याग करतो त्यास वीरमाहेश्वर असे म्हणतात.

जर शिव सर्वत्र व्याप्त असेल तर केवल इष्टलिंगामध्येच शिवभावना का करावी? कारण शिव तर सर्वत्र व्याप्त आहेच. जसे शमीगर्भात अग्नी निवास करतो तसे शिवसुद्धा इष्टलिंगामध्येच विशेषप्रकारे निवास करतो म्हणून माहेश्वर इष्टलिंगात शिवभावना करतो. म्हणून रेणुकाचार्य म्हणतात:-

शिव: सर्वगतश्चापि स्वाधारे व्यज्यते भृशम्।
शमीगर्भे यथा वह्निर्विशेषेण विभाव्यते।।
नित्यं भासि तदीयस्त्वं या ते रुद्र शिवा तनू:।
अघोराऽपापकाशीति श्रुतिराह सनातनी।।
तस्मात् सर्वप्रयत्नेन सर्वस्थानपराङ्मुख:।
स्वेष्टलिंगे महादेवं पूजयेत् पूजकोत्तम:।। सि.शि.१०.३,५,६

अशाप्रकारे इष्टलिंगात महादेवाची आराधना करीत माहेश्वर शिवाच्या सर्वगत्वामुळे परिपक्व अन्त:करणाचा होतो व माहेश्वरस्थलातील परमोच्च अवस्था प्राप्त करतो. शिव सर्वगत असला तरी परिपक्व अंत:करणाचा माहेश्वर इष्टलिंगालाच परमोच्च समजतो.

### ३. प्रसादी

प्रसादिस्थल हे षट्स्थल उपासनेतील तिसरे स्थल होय. 'मनसो निर्मलत्वचिन्हं प्रसाद:, तादृश: प्रसादोऽस्यास्तीति प्रसादी' या उक्तीनुसार पूर्वी वर्णन केलेला माहेश्वर जेव्हा प्रसादगुणाने युक्त होतो, तेव्हा त्यास प्रसादी असे संबोधतात.

लिंगनिष्ठादिभावेन ध्वस्तपापनिबन्धन:।
मन:प्रसादयोगेन प्रसादीत्येष कथ्यते।। सि.शि.११.२

'अन्नमय: हि सौम्य मन:' (छां.उ.६.५.४) या उक्तीनुसार अन्नाचे अणुरूप मन

होय. म्हणून जसे अन्न तसे मन असते. म्हणून मन:शुद्धीकरिता अन्नशुद्धी आवश्यक आहे. शिवार्पित अन्न स्वीकार केल्याने मन:शुद्धी होते. म्हणून श्रीरेणुकाचार्य उपदेश करतात:-

अन्नशुद्ध्या हि सर्वेषां सत्त्वशुद्धिरुदाहृता।
विशुद्धमानजातं हि यच्छिवाय समर्पितम्।।
तदेवं सर्वकालं तु भुंजानो लिंगतत्पर:।
मन:प्रसादमतुलं लभते ज्ञानकारणम्।।
आत्मभोगाय नियतं यद्दद् द्रव्यं समाहितम्।
तत्तत्समर्प्य देवाय भुंजीतात्मविशुद्धये।। सि.शि.११.९-११
यथा शिवप्रसादान्नं स्वीकार्यं लिंगतत्परै:।
तथा गुरो: प्रसादान्नं तथैव शिवयोगिनाम्।। सि.शि.११.१८

या आचार्योक्तीनुसार हा साधक लिंगार्पित प्रसादच गुरुजंगम यांचा प्रसाद आहे असे मानून अवधान भक्तीने स्वीकारतो. अशाप्रकारे दररोज गुरु-लिंग-जंगम यांचा प्रसाद सेवन केल्यामुळे तो साधक सर्व विश्वास शिवमय दृष्टीने पाहतो. म्हणून म्हटले आहे:-

प्रसादे शाम्भवे सिद्धे परमानन्दकारणे।
सर्वं शिवमयं विश्वं दृश्यते नात्र संशय:।। सि.शि.११.७४

माहेश्वरस्थलामध्ये साधक इष्टलिंगामध्ये शिवत्वबुद्धी धारण करतो. तोच प्रसादिस्थलामध्ये प्रवेश केल्यानंतर शिवप्रसादामुळे समस्त विश्व शिवमय आहे, असे समजून अहंकारशून्य होऊन ज्याप्रमाणे कमलपत्र पाण्यात असूनही निर्लिप्त राहते त्याप्रमाणे साधक संसारात राहून निर्लिप्त होऊन राहतो.

### ४. प्राणलिंगी

प्राणलिंगाच्या उपासकास प्राणलिंगी असे संबोधतात. मूलाधारामध्ये स्थित असलेल्या अपान वायूद्वारे गुरूंच्या उपदेशानुसार प्राणवायू जेव्हा स्थिर केला जातो तेव्हा तेथे एक दिव्य ज्योती निर्माण होते. मूलाधारापासून उत्पन्न ज्योती सुषुम्नामार्गाने कुण्डलिनी ऊर्ध्वमुखी होऊन हृदयस्थानातील अनाहतचक्रामध्ये अर्थात् द्वादशदल कमलामध्ये स्थिर होते. ही ज्योती लाल रंगाची व अंगठ्याच्या

आकाराची असते, असे शिवयोगी वर्णन करतात. जसे सूर्योदयसमयी अंध:कार नाहीसा होतो तसा या ज्योतीमुळे प्राणवायूचा लय होतो. प्राणशक्तिमय ज्योतीस वीरशैवाचार्य प्राणलिंग असे संबोधतात.

प्राणापानसमाघातात् कन्दमध्याद्यदुत्थितम्।
प्राणलिंगं तदाख्यातं प्राणापाननिरोधिभि:।।
प्राणो यत्र लयं याति भास्करे तुहिनं यथा।
तत्प्राणलिंगमुद्दिष्टं तद्धारी स्यात् तदाकृति:।। सि.शि. १२.६-७

मरितोंटदार्यांनी सुद्धा कुंभक शब्दाद्वारे प्राणवायूचा निरोध करून मणक्यातील २१ ग्रंथींचे भेदन करून कुंडलिनी ऊर्ध्वमुखी करून हृदयस्थित अनाहतचक्रातील आठ दलातील अंगठ्याच्या आकाराच्या प्राणशक्तीस प्राणलिंग म्हणतात. असे प्राणलिंगाचे स्वरूप वर्णन केले आहे.

प्राणलिंगिस्थल ही साधकाची चौथी भूमिका आहे. भक्त-माहेश्वर-प्रसादी या तीन भूमिका क्रियाप्रधान आहेत. चौथी भूमिका मात्र ज्ञानप्रधान होय. या अवस्थेमध्ये साधकास चिद्रूप अर्थात् प्राणलिंगाचे ज्ञान होते. अशाप्रकारचा प्राणलिंगज्ञानवंतच प्राणलिंगी संबोधला जातो.

भक्तो माहेश्वरश्चैष प्रसादीति च कीर्तित:।
कर्मप्राधान्ययोगेन ज्ञानयोगोऽस्य कथ्यते।।
लिंगं चिदात्मकं ब्रह्म तच्छक्ति: प्राणरूपिणी।
तद्रूपलिंगविज्ञानी प्राणलिंगीति कथ्यते।। सि.शि. १२.२-३

हा प्राणलिंगी भ्रमरकीटन्यायाने सदैव स्वान्त:स्थित असलेल्या लिंगाचे भावमय पदार्थांनी पूजन करतो. यात क्षमा हे अभिषेकासाठी जल असते, नित्य व अनित्याचा विवेक हे वस्त्र, सत्यभाषण हे आभूषणे होत, वैराग्य हेच फुलांची माळा होय, श्रद्धा ही धूप असते, मौन म्हणजे घण्टानाद होय, बुद्धीतील लिंगस्वरूपच नमस्कारक्रिया असते. अशाप्रकारे प्राणलिंगार्चनेतील पदार्थ सांगितले आहेत.

क्षमाऽभिषेकसलिलं विवेको वस्त्रमुच्यते।
सत्यमाभरणं प्रोक्तं वैराग्यं पुष्पमालिका।।
गन्ध: समाधिसम्पत्तिरक्षता निरहङ्कृति:।
श्रद्धा धूपो महाज्ञानं जगद्भासि प्रदीपिका।।

भ्रान्तिमूलप्रपंचस्य निवेद्यं तन्निवेदनम्।
मौनं घण्टापरिस्पन्दस्ताम्बूलं विषयार्पणम्।।
विषयभ्रान्तिराहित्यं तत्प्रदक्षिणकल्पना।
बुद्धेस्तदात्मिकासक्तिर्नमस्कारक्रिया मता।
एवंविधैर्भावशुद्धैरुपचारैरदूषितैः।
प्रत्यङ्मुखमना भूत्वा पूजयेल्लिंगमान्तरम्।। सि.शि. १२.१६-२०

हा साधक अनुभव भक्तियुक्त असतो, अर्थात् प्राणलिंगी अवस्थेमध्ये या साधकाच्या स्वहृदयकमलामध्ये प्रथमतः चिद्रूपाने शिवानुभव झालेला असतो. प्राणलिंगी अवस्था ज्ञानासह योगप्रधानसुद्धा आहे.

**५. शरण**

शिवास अनन्यभावनेने शरण गेलेल्या साधकास 'शरण' असे संबोधतात. शरणावस्था ही षट्स्थलोपासनेतील पाचवी अवस्था आहे. प्राणलिंगिस्थलामध्ये साधक चिद्रूपज्ञानसंपन्न होतो तर शरणस्थलामध्ये त्यास शिवानंदाचा अनुभव आलेला असतो. म्हणून चिद्रूपज्ञानसंपन्न हाच प्राणलिंगी जेव्हा शिवानन्द अनुभवतो तेव्हा त्यास 'शरण' असे संबोधतात.

सतीपतिन्यायानुसार हा साधक स्वतःस सती व शिवास पती असे समजून जसे सत्शील व प्रिय स्त्री स्वतःच्या पुरुषाशिवाय इतर कोणासही जाणत नसते, इतर कोणासही ओळखत नाही, (बृ.उ. ४.३.२१) या श्रुतीनुसार लौकिक आनंद अनुभवास येतो. म्हणून तर

अंगलिंगी ज्ञानरूपः सती ज्ञेयः शिवः पतिः।
यत्सौख्यं तत्समावेशे तद्वान् शरणनामवान्।।
सतीव रमणे यस्तु शिवे शक्तिं विभावयन्।
तदन्यविमुखः सोऽयं ज्ञातः शरणनामवान्।। सि.शि. १३.२,५

म्हणून सर्वप्रयत्नांनी मन, वाणी, शरीर व कर्माद्वारे शिवास जो शरण जातो तो शरण नावाचा साधक अन्तरंग सुखाचा आनन्द प्राप्त करतो व सर्व चिंतांपासून मुक्त होतो. या अवस्थेत साधकास शिवासह सायुज्यता प्राप्त होते जी भेदाभेदरूपी अवस्था असते.

६. ऐक्य

प्राणलिंगादियोगेन सुखातिशयमेयिवान्।
शरणाख्य: शिवेनैक्यभावनादैक्यवान् भवेत्।। सि.शि.१४.२

या आचार्योक्तीनुसार, 'एकस्य भाव ऐक्यम्' या उत्पत्तीनुसार परशिवासह एकत्वप्राप्ती हेच ऐक्यस्थल होय. शरणामध्ये विद्यमान असलेली 'शिवोऽहम् भावना' जेव्हा अत्यधिक दृढ होते तेव्हा शिवासह ऐक्य पावतो. या प्रकारच्या अवस्थेस लिंगांगसामरस्य अवस्था असे संबोधतात. ही अंतिम सहावी अवस्था आहे. ही साधकाची अवस्था अग्नियुक्त कापराप्रमाणे शिवस्वरूपमय असते.

जले जलमिव न्यस्तं वन्हौ वन्हिरिवार्पितम्।
परे ब्रह्मणि लीनात्मा विभागेन न दृश्यते।। सि.शि. २०.२

अशाप्रकारे रेणुकाचार्यांनी शिवैक्य अवस्था असे सामरस्याचे वर्णन केलेले आहे. याप्रमाणे ऐक्यभाव प्राप्त झाल्यास पूर्वीचा पशुपतिभाव, सतीपतिभाव विलीन होतो. तेव्हाच पूर्णत: अद्वैतस्थितीची अवस्था वर्णिली आहे. म्हणून आचार्य म्हणतात:-

पशुत्वं च पतित्वं च मायामोहविकल्पितम्।
तस्मिन् प्रलयमापन्ने क: पशु: को नु वा पति:।।
भेदबुद्धिसमुत्पन्नमहासंसारसागरम्।
अद्वैतबुद्धिपोतेन समुत्तरति देशिक:।।
अद्वैतभावनाजातं क्षणमात्रेऽपि यत्सुखम्।
तत्सुखं कोटिवर्षेण प्राप्यते नैव भोगिभि:।।
चित्तवृत्तिसमालीनजगत: शिवयोगिन:।
शिवानन्दपरिस्फूर्तिर्मुक्तिरित्यभिधीयते।। सि.शि. १४.९,११

याप्रमाणे वीरशैवसिद्धान्तात साधक भक्तस्थलापासून प्रारंभ केलेला प्रवास ऐक्यस्थलापर्यंत क्रमश: विकास करून ऐक्यस्थलास प्राप्त करतो व लिंगांगसामरस्य प्राप्त करतो. ऐक्यावस्थेमध्ये संसारास कारणीभूत प्राकृत अहंकारपासून निवृत्त होतो, शिवोऽहम् ही भावना दृढ झाल्यामुळे तो शरीरादीमध्ये लिप्त होत नाही. म्हणून या अवस्थेस निर्देही असे संबोधतात. म्हणून रेणुकाचार्य म्हणतात:-

देहिनोऽपि परात्मत्वभाविनो निरहङ्कृतेः।
निरस्तदेहधर्मस्य निर्देहागम उच्यते।।
गलिते ममताहन्ते संसारभ्रमकारणे।
पराहन्तां प्रविष्टस्य कुतो देहः कुतो रतिः।।
अखण्डसंविदाकारमद्वितीयं सुखात्मकम्।
परमाकाशमात्मानं मन्वानः कुत्र मुह्यति।। सि.शि. १८.१,२,५

**मुक्तीचे आनंदस्वरूप**

मुक्तिरेव परा तृप्तिः सच्चिदानन्दलक्षणा।
नित्यतृप्तस्य मुक्तस्य किमन्यैर्भोगसाधनैः।। सि.शि.१८.६

अशाप्रकारे रेणुकाचार्यांनी उपदेश केला आहे की वीरशैवसिद्धान्तामध्ये द्वैत वेदान्ताप्रमाणे मुक्तीचे आनंदस्वरूप स्वीकारले आहे. हे मुक्तीचे सुख ब्रह्मादीलोकाप्रमाणे सातिशय स्वरूपाचे नसून सर्वोत्कृष्ट असे निरतिशय स्वरूपाचे वर्णिले आहे.

कुतो ब्रह्मा कुतो विष्णुः कुतो रुद्रः कुतो रविः।
साक्षात्कृतपरानन्दज्योतिषः साम्यकल्पना।।
अपरोक्षपरानन्दविलासस्य महात्मनः।
ब्रह्मविष्णवादयो देवा विशेषाः सुखबिन्दवः।।
यन्मात्रासहितं लोके वांच्छन्ति विषयं नराः।
तदप्रमेयमानन्दं परमं को न वांच्छति।। सि.शि. १९.८-१०

**जीवन्मुक्ती**

स्वस्वरूपं चिदाकारं ज्योतिः साक्षाद्विचिन्तयन्।
देहवानपि निर्देहो जीवन्मुक्तो हि साधकः।। सि.शि. १६.६
शुद्धाचारः शुद्धभावो विवेकी ज्योतिः पश्यति सर्वतः शैवमेकम्।
ज्ञानध्वस्तप्राकृतात्मप्रपंचो जीवन्मुक्तश्चेष्टते दिव्ययोगी।। सि.शि.१६.९

अशाप्रकारे अनेक ठिकाणी रेणुकाचार्यांनी जीवनमुक्तीचे स्वरूप वर्णन केले आहे. जसे अन्य दर्शनांमध्ये प्रारब्धभोग ज्ञानी व्यक्तीस क्षयापर्यंत भोगावाच लागतो. त्यानंतर जीवन्मुक्ती अवस्था प्राप्त होते. तद्वत् वीरशैवदर्शनामध्ये सुद्धा

शिवज्ञानसंपन्न व्यक्तीचा जोपर्यंत देहपात होत नाही तोपर्यंत जीवन्मुक्तावस्था असते, असे निश्चयपूर्वक उपदेशिले आहे. जीवन्मुक्तीच्या अभावामध्ये गुरू, शास्त्र इत्यादी परंपरांचा विच्छेद करून दार्शनिक समाजात जीवन्मुक्तीची परमावश्यकता विशद केली आहे.

खरोखर जीवन्मुक्तामध्ये सुद्धा लौकिक प्रवृत्ती दिसून येते तोसुद्धा त्यापासून निर्माण होणाऱ्या दोषाचा भागीदार होतो.

शिवस्य पररूपस्य सर्वानुग्राहिणोऽर्चने।
त्यागो देहाभिमानस्य कायार्पितमुदाहृतम्।।
यदा योगी निजं देहं शिवाय विनिवेदयेत्।
तदा भवति तद्रूपं शिवरूपं न संशयः।। सि.शि. १७.१-२
यद्यत्करणमालम्ब्य भुङ्क्ते विषयजं सुखम्।
तत्तच्छिवे समर्प्येष करणार्पक उच्यते।। सि.शि. १७.२
शिवे निश्चलभावेन भावानां यत्समर्पणम्।
भावार्पितमिदं प्रोक्तं शिवसद्भाववेदिभिः।।
भाव एव हि जन्तुनां कारणं बन्धमोक्षयोः।
भावशुद्धौ भवेन्मुक्तिर्विपरीते तु संसृतिः।। सि.शि. १७.१,३

इत्यादी रेणुकाचार्यांच्या जीवन्मुक्तीच्या संदर्भातील उक्तीनुसार शिवार्पितच काय-करण-भाव यांच्याद्वारा व्यवहार करीत असताना देखील त्रिकरणजन्य दोषांचा भागीदार होत नाही. परंतु

घ्राणस्य घ्राणमाचारलिंगस्य मुखमुच्यते।
जिह्वायाश्च तथा जिह्वा गुरुलिंगमुखं भवेत्।।
चक्षुषश्च तथा चक्षुः शिवलिंगमुखं भवेत्।
त्वचस्त्वक् चररूपस्य लिंगस्य मुखमुच्यते।।
मुखं प्रसादलिंगस्य श्रोत्रं श्रोत्रस्य कथ्यते।
हृदयं हृदयस्यैव महालिंगमुखं भवेत्।।
एवं लिंगमुखं ज्ञेयं तत्तदंगे प्रतिष्ठितम्। शि.द., पृ. ४७-४८

या शैवागमाच्या उक्तीनुसार वीरशैवसिद्धान्तामध्ये सहा इंद्रियांमध्ये सहा प्रकारच्या लिंगांची भावना केली व त्यांचे विषय त्या त्या लिंगाप्रती अर्पण करून

गंध इत्यादींचा प्रसादरूपाने स्वीकार केला आहे. त्यानुसार जीवन्मुक्ताच्या घ्राणेन्द्रियात आचारलिंगाची भावना केली व त्याप्रती घ्रेय पदार्थांचे समर्पण तेथे केले जाते त्यास गंधप्रसाद असे संबोधले आहे. रसनेन्द्रियात गुरुलिंगाची भावना करून तेथे रस्य पदार्थांचे रसत्व अर्पण करण्यास रसप्रसाद म्हणतात. चक्षूमध्ये शिवलिंगाची भावना करून त्यास रूप अर्पण करण्यास रूपप्रसाद असे म्हणतात. त्वक् अर्थात् त्वचेमध्ये चरलिंगांची भावना करून स्पर्शत्व अर्पण करण्यास स्पर्शप्रसाद असे संबोधतात. श्रोत्रांमध्ये प्रसादलिंगाची भावना करून शब्द अर्पण करण्यास शब्दप्रसाद असे म्हणतात. मनामध्ये महालिंगाची भावना करून त्यास तृप्ती अर्पण करण्यास प्रसाद असे संबोधतात. अशाप्रकारे हातपाय इत्यादी इंद्रियामध्ये सुद्धा लिंगाची भावना केली आहे. अर्थात् पायूमध्ये आचारलिंग, उपस्थामध्ये गुरुलिंग, पायात शिवलिंग, हातात चरलिंग, वाणीमध्ये प्रसादलिंग यांची भावना करीत त्यांचे विषय पूर्वीप्रमाणे समर्पित करीत त्यांचा प्रसाद स्वीकारतो त्यास लिंगभोगोपभोगी असे म्हणतात. याशिवाय रेणुकाचार्य म्हणतात:-

दर्शनात् स्पर्शनाद् भुक्तेः श्रवणाद् घ्राणनादपि।
विषयेभ्यो यदुत्पन्नं शिवे तत्सुखमर्पयेत्।। सि.शि. १७.४
इन्द्रियैरेव जायन्ते पापानि सुकृतानि च।
तेषां समर्पणादीशे कुतः कर्मनिबन्धनम्।।
इन्द्रियाणि समस्तानि शरीरं भोगसाधनम्।
शिवपूजांगभावेन भावयन् मुक्तिमाप्नुयात्।। सि.शि. १७.७

अशाप्रकारे सर्व इंद्रियांद्वारे सांसारिक दोषांपासून मुक्त राहून शिवप्रसाद समजून सर्वांचा उपभोग घ्यावा कारण जीवनमुक्त सर्वव्यवहार करीत असताना सुद्धा त्याच्याकडून दोष होण्याची संभावना असते.

या शिवभावसंपन्न ज्ञानीयाचे आगमोक्तभावांमध्ये सुद्धा संचित कर्माची गती कोणती? या जिज्ञासेविषयी 'ज्ञानी लोकांची जी कर्मे असतात ती जन्महेतुकरिता नसतात. जसे अग्निद्वारे संस्कारित बीजापासून अंकुर उत्पन्न होत नाही.' (सि.शि. १९.२). अशाप्रकारे भाजलेल्या बीजाप्रमाणे शिवोऽहम् या परमज्ञानाने संचित कर्मे दग्ध केलेला शिवयोगी दुसऱ्या जन्मास प्राप्त होत नाही, असा उपदेश श्रीरेणुकाचार्यांनी अगस्त्यांना दिला आहे.

शिवोऽहम् अर्थात् शिवासह स्वात्मैक्य भावना दृढ झालेला शिवयोगी त्या प्रकारच्या वृत्तिज्ञानाचा सुद्धा विलय करीत तो शिवयोगी शिवच होतो. या अवस्थेला ज्ञानशून्य अवस्था असे संबोधतात. येथे ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय या त्रिपुटीचा अभाव असतो. जीवन्मुक्ताची ही ज्ञानशून्य अवस्था जीवन्मुक्तीची परमोच्च अवस्था असते. म्हणून म्हणतात:-

सर्वात्मनि परे तत्त्वे भेदशंकाविवर्जिते।
ज्ञात्रादिव्यवहारोत्थं कुतो ज्ञानं विभाव्यते।।
ज्योतिर्लिंगे चिदाकारे स्वप्रकाशे निरुत्तरे।
एकीभावमुपेतस्य कथं ज्ञानस्य सम्भव:।।
यस्य कार्यदशा नास्ति कारणत्वमथापि वा।
शेषत्वं नैव शेषित्वं स मुक्त: पर उच्यते।। सि.शि. २०.३,१०-११

अशाप्रकारे वीरशैवदर्शनामध्ये वास्तविक परमात्म्याहून भिन्न असलेल्या जीवाचे मुक्त अवस्थेत परशिवासह एकत्व प्रतिपादन केले आहे. त्यामुळे भेद आणि अभेद या ठिकाणी सत्य प्रतीत होतो. म्हणून या दर्शनास भेदाभेदवादी या नावाने ओळखले जाते. तो सर्वसमावेशक आहे.

□□

सातवा परिच्छेद

# दार्शनिक सिद्धान्तांची समीक्षा

आतापर्यंत ईश्वर–जीव–जगत्–बंध–मोक्ष या दार्शनिक सिद्धान्तांचे न्याय–वैशेषिक–सांख्य–योग–पूर्वमीमांसा या दर्शनांनुसार तसेच 'श्रीसिद्धान्त–शिखामणी'मध्ये वर्णित वीरशैवदर्शनाचे यथोचित विस्तारपूर्वक समालोचन करण्यात आले आहे. आता न्यायादी दर्शनांतील सिद्धान्त व 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये वर्णित वीरशैवसिद्धान्ताच्या दार्शनिक सिद्धान्ताचे समीक्षण या प्रकरणात करण्यात येणार आहे.

**ईश्वरस्वरूप समीक्षा**

तत्त्वज्ञानाचे चिंतन करण्याकरिता आस्तिक व नास्तिक दर्शनशास्त्रे प्रवृत्त झाली आहेत. प्रात:स्मरणीय तत्त्वज्ञानी महर्षी व विद्वानांनी ईश्वरास केंद्रीभूत मानून त्याची सिद्धी व निरसन यांचे प्रतिपादन केलेले आहे. हे तर सर्वांना माहीत आहे की, चार्वाक, जैन व बौद्ध दार्शनिकांनी तसेच सांख्य व मीमांसकांनी ईश्वरास खंडनीय समजून त्याचे विवेचन केले आहे.

आस्तिकांमध्ये न्याय–वैशेषिक–योग–अद्वैतवेदान्त–वीरशैवदर्शनांमध्ये ईश्वर–प्राप्तीचे दोन समान हेतू पाहावयास मिळतात. त्यांपैकी एक सृष्टीच्या प्रलयादीचे समर्थन तर दुसरे वेदागमप्रामाण्य हे होत. सांख्य व मीमांसकांनी ईश्वराचे सृष्टी इत्यादीचे कर्तृत्व स्वीकारले नाही. त्याच्या प्रयोजनसिद्धीत ईश्वराच्या नित्यतृप्तत्वाची हानी आहे आणि असिद्धीमुळे त्याच्या मंदप्रवृत्तीचा प्रसंग समोर येतो. अशाप्रकारे दोन्हींमध्ये पाशरज्जू स्थिती होते. म्हणून येथे वैदिक दर्शनांमध्ये ईश्वरविषयक केलेल्या विचारांतील परस्परवैशिष्ट्ये काय आहेत, तसेच वीरशैवदर्शनांमध्ये षड्दर्शनांपेक्षा वेगळे वैशिष्ट्य काय आहे, याची समीक्षा करणे आवश्यक आहे.

**ईश्वराच्या सगुणत्व आणि निर्गुणत्वाची समीक्षा**

न्याय–वैशेषिक या दर्शनांमध्ये ईश्वराचा अभिमत नवद्रव्यान्तर्गत आत्मद्रव्यातील

अन्तर्भाव, 'ज्ञानाधिकरणमात्मा। स द्विविध: जीवात्मा परमात्मा चेति।' (त.सं. पृ.१९-२०) ईश्वर सगुण आहे, निर्गुण नाही. द्रव्यसामान्याद्वारा गुणक्रिया स्वीकारली आहे. म्हणून येथे ईश्वर सर्वज्ञत्वादी नित्य गुणांचा आश्रय आहे. योगदर्शनामध्ये पुरुषविशेष ईश्वर स्वीकारला असून त्याचे वैशिष्ट्य म्हणजे तो अविद्यादी पंचक्लेशरहित आहे व सर्वज्ञत्वादी गुणांनी युक्त आहे, तोसुद्धा सगुण आहे. (यो.सू.भा.१.२४) अद्वैतवेदान्तात मात्र मायाशबलित ब्रह्म सगुण आणि शुद्धब्रह्म हे निर्गुण आहे, असे स्वीकारले आहे. वीरशैवदर्शनामध्ये सुद्धा परशिव अविभाग परामर्शदशेतील चित्शक्तियुक्त निर्गुण तर विभाग परामर्शदशेतील सत्त्वादी त्रिगुणात्मक मायाशक्तीने विशिष्ट असलेला सगुण असे स्वीकारले आहे. (त.प्र., ५.३९) येथे ईश्वराच्या सगुणत्वाविषयी परस्परमतभिन्नता दिसून येते. तरीसुद्धा द्रव्यत्वाधारे त्याच्या सगुणत्वाच्या प्रतिपादनापेक्षा विलक्षण अशा शक्ति-वैशिष्ट्यामुळे त्याचे सगुणत्व प्रतिपादन करणे योग्य आहे. याविषयी न्याय-वैशेषिक दर्शनांपेक्षा योग-अद्वैतवेदान्त-वीरशैवदर्शन ही दर्शने उत्कृष्ट आहेत. योगदर्शनातील ईश्वर हा सर्वज्ञत्व आदी गुणांनी युक्त आहे, तेथे कोणतीही उपाधी प्रतिपादन केलेली नाही. म्हणून तो स्वभावत: सगुण आहे.

अद्वैतवेदान्त व वीरशैवदर्शनामध्ये मायासंबंधाने ईश्वराचे सगुणत्व प्रतिपादन केले आहे. येथे अद्वैतवाद्यांच्या मते- 'या मा (नास्ति) सा माया' या व्युत्पत्तीनुसार मायेचे अनिर्वचनीयत्व प्रतिपादन केले आहे. म्हणूनच त्याचे मिथ्यात्व स्वीकारून तसेच ब्रह्मचैतन्याद्वारे नजीकचा आध्यात्मिक संबंध प्रतिपादन करून त्याचे सगुण रूपसुद्धा पारमार्थिक नाही, परंतु निर्गुण ब्रह्मचैतन्य पारमार्थिक आहे. वीरशैवदर्शनामध्ये तर

मं शिवं परमं ब्रह्म प्राप्नोतीति स्वभावत:।
मायेति प्रोच्यते लोके ब्रह्मनिष्ठा सनातनी।। श.वि.सि. पृ. ३

या 'सिद्धान्तागमा'च्या प्रमाणानुसार 'मं- शिवम्, अयति- स्वाभाविक प्राप्त झालेली माया' या व्युत्पत्तीनुसार मायेचे नित्यत्व आणि नित्यसंबंध प्रतिपादन करून परशिवाचे सगुण रूप आणि सत्यतासुद्धा स्वीकारली आहे. जर निर्गुणच सत्य आणि सगुण मिथ्या असेल तर मग 'तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति' (छां.उ. ६.२.३), 'स ईक्षां चक्रे' (प्रश्नो. ६.३) इत्यादी ईश्वराचे सगुणत्व स्वीकारणाऱ्या

शेकडो श्रुतिवाक्यांविषयी आक्षेप उत्पन्न होईल. दुसरे असे की, उपासकांवर अनुग्रह करण्याकरिता भगवान परशिवाने सगुण रूप स्वीकारले आहे असे श्री रेणुकाचार्य वर्णन करतात:-

चन्द्रार्धशेखरं शुद्धं शुद्धस्फटिकसन्निभम्।
शुद्धमुक्ताफलाभासमुपास्यं गुणमूर्तिभि:।। सि.शि.२.१०

ते मिथ्या ठरेल आणि उपास्य जर मिथ्या असेल तर उपासकांच्या श्रद्धेला व भक्तिसिद्धान्ताला बाध येईल. म्हणून सगुणरूपाचे सत्यत्वच स्वीकारावे लागेल. यामुळे ईश्वराच्या सगुणस्वरूपाविषयी वीरशैवपक्षच भक्त आणि मुमुक्षू यांनी स्वीकारला आहे.

परब्रह्माचे निर्गुण रूप अद्वैतवेदान्तामध्ये व वीरशैवदर्शनामध्ये स्वीकारले आहे. निगुर्णत्वाविषयी दोहोंमध्ये एकरूपता नाही. अद्वैतवादी निर्गुणास ब्रह्माचे निर्विशेष म्हणून प्रतिपादन करतात तर वीरशैवदर्शनात निर्गुणच परशिव होय, तो निर्विशेष नाही तर सविशेषच आहे, असे मानले आहे. याचा अभिप्राय असा की 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' (तै.उ.२.१), 'विज्ञानमानन्दं ब्रह्म' इत्यादी श्रुतिप्रमाणानुसार ब्रह्माचे सच्चिदानंदरूप स्वरूपलक्षण अद्वैतवाद्यांनी प्रतिपादन केले आहे. येथे सच्चिदानंदरूपाला गुण किंवा स्वरूप मानले तर द्वैतापत्ती होईल. असत्पासून भिन्न असलेले सत्, जडापासून भिन्न असलेले चित्, दु:खापासून भिन्न असलेले आनंद, असे ब्रह्माचे सच्चिदानंदत्व वर्णन करतात. वास्तविक तेथे कोणत्याही विधानाचा अभाव आहे असे अद्वैतवाद्यांनी स्वीकारले आहे. वीरशैवदर्शनामध्ये तर 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' (तै.उ.२.१) या श्रुतीनुसार सच्चिदानंद परशिवाचा अनुभव, अभाव व स्वप्रकाशसुद्धा त्याच्या स्फटिकादींप्रमाणे जडत्वामुळे आक्षेपार्ह होईल, मी परशिव आहे, मी प्रकाश आहे, मी आनंद आहे अशी बोधरूपी विमर्शशक्ती स्वीकारली आहे. म्हणून सत्वादी गुणांच्या अभावाने निर्गुणसुद्धा परशिव बोधरूपी विमर्शशक्तीच्या वैशिष्ट्याने सविशेष होतो.

### ईश्वराच्या नित्यमुक्तत्वाची समीक्षा

न्यायदर्शनामध्ये शरीर इत्यादी एकवीस दु:खांच्या आत्यंतिक निवृत्तीस मुक्ती असे संबोधतात. (न्या.सू.भा.१.१.२२) यात दु:खादी कारणास मिथ्याज्ञान असे

प्रतिपादन करतात. त्यानुसार ईश्वरामध्ये मिथ्या ज्ञानाच्या अभावामुळे त्यापासून उत्पन्न रागद्वेषादींच्या अभावापासून उत्पन्न अशा धर्म व अधर्माचा अभाव, धर्म व अधर्म यांच्या अभावाने शरीरादींचा सुद्धा अभाव असे न्यायदर्शनामध्ये ईश्वराचे स्वरूप नित्यमुक्तच आहे. जीवात्म्यात जे विशेष गुण आहेत ते ईश्वरामध्ये असणार नाहीत म्हणून तो नित्यमुक्त आहे.

योगदर्शनामध्ये मुक्तपुरुष, प्रकृतिलीनपुरुष, पुरुषविशेष यांचा अंगीकार करून मुक्तीच्या पूर्वी असलेली बंधने होती. प्रकृतिलीनांच्या उत्तरकाळामध्ये बंधने येतील अशी व्यवस्था करून ईश्वराकरिता पूर्वी अनेक बंधने नव्हती आणि उत्तरकाळी अनेक बंधने नसतील असे नित्यमुक्तत्व प्रतिपादन केले आहे. (यो.सू.भा.१.२४)

अद्वैतवेदान्तामध्ये ईश्वर अभिभूत मायेचे शुद्धसत्त्वगुणप्राधान्याने तेथे आवरण शक्तीच्या अभावाने ईश्वरनित्यमुक्तच आहे. तसेच वीरशैवदर्शनामध्ये सुद्धा

उपाधिः पुनराख्यातः शुद्धाऽशुद्धविभेदतः।
शुद्धोपाधिः परा माया स्वाश्रयाऽमोहकारिणी।।
मायाशक्तिवशादीशो नाममूर्तिधरः प्रभुः।
सर्वज्ञः सर्वकर्ता च नित्यमुक्तो महेश्वरः।। सि.शि. ५.४४,४६

या श्रीरेणुकाचार्यांच्या उक्तीनुसार महेश्वराच्या शुद्धोपाधी या वैशिष्ट्यामुळे तो मुक्त आहे, हे सिद्ध होते. म्हणून ईश्वराच्या नित्यमुक्तत्वाविषयी सहा वैदिक दर्शनांमध्ये आणि वीरशैवदर्शनामध्ये परस्परविरोध पाहावयास मिळत नाही.

### ईश्वराच्या सृष्टिकारणत्वाची समीक्षा

दार्शनिकांच्या मते प्रपंचोत्पत्तीचे निमित्त व उपादानभेदाने दोन कारणे झालेली आहेत. नैयायिक व वैशेषिकांच्या मते, जगताच्या उत्पत्तीचे ईश्वर हे निमित्तकारण आहे, तर परमाणू हे उपादानकारण आहे. सांख्यदर्शनामध्ये 'ईश्वरासिद्धेः' (सां.सू.१.९२), 'प्रमाणाभावान्न तत्सिद्धिः'(सां.सू.५.१०) इत्यादी सूत्रांमध्ये ईश्वराचा निषेध प्रतीत होतो. तरीसुद्धा प्रवचनभाष्यकार विज्ञानभिक्षू यांनी 'नैयायिकांना स्वीकार्य असलेला सर्वज्ञत्वादी नित्यगुणयुक्त ईश्वर नाही, असे महर्षी कपिल यांचे तात्पर्य आहे, असे म्हटले आहे. या मतानुसार औपाधिक

सर्वज्ञत्वादी गुणांनी युक्त अशा ईश्वराचे अस्तित्व मान्य केले आहे. त्याच्या संकल्पाने सृष्टीची उत्पत्ती होते असे स्वीकारल्याने येथे प्रयोजन सांगावे लागते. प्रयोजन स्वीकारल्यामुळे ईश्वराच्या नित्यतृप्तीची हानी होते. म्हणून मणिवत् संकल्पाशिवाय प्रकृतीच्या सन्निधानरूपी निमित्तकारणामुळे सृष्टी होते, असे मानले आहे.

योगदर्शनामध्ये महर्षी पतंजलींनी 'ईश्वरप्रणिधानाद्वा' (यो.सू. २.४५), समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात्' (यो.सू.वा. १.२४) या सूत्रांद्वारे स्पष्ट केले आहे की योग्यांच्या शीघ्र समाधीप्राप्तीकरिता ईश्वर अनुग्रह करीत असतो. वार्तिककार विज्ञानभिक्षू व वृत्तिकार भोजदेव यांनीसुद्धा ईश्वराच्या इच्छेशिवाय उदासीन पुरुष व जड प्रकृतीचा संयोग आणि वियोग शक्य नसल्यामुळे याच्या नियामकरूपामध्ये ईश्वराचा संकल्प कारणीभूत होतो, म्हणून ईश्वरास निमित्तकारण मानले आहे.

याप्रमाणे न्याय-वैशेषिक, सेश्वरसांख्य तसेच योगदर्शनांमध्ये सृष्टीचे निमित्तकारण ईश्वरच समजले जाते, हे येथे साम्य आहे.

अद्वैतवेदान्त व वीरशैवदर्शनामध्ये 'यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च' या श्रुतीनुसार ईश्वराचे अभिन्ननिमित्तोपादान कारणत्वाचे समर्थन केले आहे. अशाप्रकारे ईश्वराचे अभिन्ननिमित्तोपादान कारणत्वाबद्दल दोन्हींमध्ये साम्य आहे. तरीसुद्धा अद्वैत-वेदान्तामध्ये मायोपहित ईश्वराचे अपारमार्थिकत्व व त्यापासून उत्पन्न जगताचे मिथ्यात्व प्रतिपादन केले आहे, तर वीरशैवदर्शनामध्ये महेश्वराच्या परशिव सगुणरूपाचे व जगताच्या सत्यत्वाचे वर्णन केले आहे:-

पत्रशाखादिरूपेण यथा तिष्ठति पादपः।
तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।। सि.शि. १०.७०

अशाप्रकारे श्रीरेणुकाचार्यांनी शिवरूपाचे सत्यत्व अंगीकारले आहे, हे याचे वेगळेपण आहे.

## सृष्ट्यादींच्या ईश्वरलीलांचे समीक्षण

सृष्ट्यादींच्या व्यवहारनिर्वाहार्थ अस्मदादीविलक्षण चेतन पुरुष अशा ईश्वराच्या अंगीकारात जगन्निर्मितीचे काही प्रयोजन सांगितले आहे. प्रयोजनात त्याच्या नित्यतृप्तीची हानी होईल अशा ईश्वराच्या अंगीकारास सांख्यादींनी आक्षेप घेतला

आहे. 'न प्रयोजनत्वात्' या आक्षेपाचा भाव असा आहे- चेतन ईश्वर हा जगद्‌बिंबाची रचना करू शकत नाही, हे कसे शक्य आहे? की प्रयोजनाची प्रवृत्ती आहे? श्री. कुमारिल भट्टांनी म्हटले आहे- 'प्रयोजनमुद्दिश्य न मन्दोऽपि प्रवर्तते' (श्लो.वा. पृ. ४६३). लोकप्रसिद्ध असलेल्या पुढील श्रुतीत सुद्धा 'न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवति, आत्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति, न वा अरे जायायै कामाय जाया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति, न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय सर्व प्रियं भवति' (बृ.उ. २.४.५) असे चेतनपुरुषाच्या प्रवृत्तीचे प्रयोजन सांगितले आहे. परंतु चेतन असूनसुद्धा पुरुषबुद्धीच्या अपराधाने प्रयोजनाशिवाय असतो. तसेच ईश्वर प्रवृत्तीचेही असते. जसे 'यः सर्वज्ञः सर्ववित्' या श्रुतीमध्ये प्रतिपादन केलेल्या सर्वज्ञत्वास बाधा येते.

अद्वैतवेदान्तामध्ये व वीरशैवदर्शनामध्ये 'लोकवत्तु लीलाकैवल्यम्' या बादरायणसूत्रानुसार जगत्सृष्टीच्या प्रयोजनाभावीसुद्धा लीलामय प्रवृत्ती प्रस्तुत केलेली आहे.

याशिवाय असे म्हणतात, लीलेशिवाय ज्या प्रवृत्ती आहेत त्यांच्या प्रयोजनाची आवश्यकता आहे. त्या लीलांमध्ये प्रयोजन अपेक्षित नाही. जसे लोकामध्ये राजा अमात्य इत्यादींना कार्य करण्याकरिता प्रवृत्त करतो एवढेच त्याचे प्रयोजन असते, तसेच ईश्वराचे सुद्धा आहे.

खरोखर महान अशा विश्वनिर्मितीला लीला असे कसे संबोधता येईल? हे सत्य आहे की, अल्पज्ञान व अल्पशक्ती असलेल्या आम्हाकरिता ही विश्वरचना एक महान कृती होय. असे असले तरी सर्वज्ञ, सर्वशक्तिसंपन्न ईश्वराकरिता तर ही एक लीलाच होय. लीला म्हणजे काय तर जी अल्पावधीत असाध्य साध्य ते करते, विधेयनिष्पत्तीचे फल प्राप्त करून देते. लीलाकर्त्याचा उद्देश असाध्य ते साध्य करणे म्हणजे लीला होय. विश्वरचनेद्वारे कमी प्रयत्नात साध्य करणे.

निःश्वसितमस्य वेदा वीक्षितमेतस्य पंचभूतानि।
स्मितमेतस्य चराचरमस्य च सुप्तं महाप्रलयः।। ब्र.सू.भा. मंगलश्लो.२

असे 'भामती'कार श्रीमान वाचस्पतिमिश्रांनी प्रतिपादन केले आहे.

स्वेच्छाविग्रहयुक्ताय स्वेच्छावर्तनवर्तिने।
स्वेच्छाकृतत्रिलोकाय नमः साम्बाय शम्भवे।। सि.शि. १.६

अशाप्रकारे श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी सुद्धा ईश्वराचे प्रयोजनविशेष सिद्धीच्या अभावाने वीरशैवदर्शनामध्ये सृष्टी, स्थिती, संहार इत्यादी क्रियांना ईश्वराच्या लीला असे संबोधले आहे. जरी लौकिक लीलांचे काहीतरी प्रयोजन सांगणे शक्य असते, परंतु ईश्वरी लीलेचे तसे नसते. 'आप्तकामस्य का स्पृहा' असे त्याच्या नित्यतृप्तत्वाचे प्रयोजन सांगितले आहे. परंतु हीच सत्यप्रवृत्ती नाही, 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते' (तै.उ. ३.१) या श्रुतींद्वारे विश्वरचनेतील ईश्वराची प्रवृत्ती ऐकली आहे. ही उन्मत्तप्रवृत्ती नाही. 'यः सर्वज्ञः सर्ववित्' (मुंउ..१.१.९) याद्वारे त्याची सर्वज्ञता प्रतिपादन करण्यात आली आहे. अशाप्रकारे विश्वरचना ही लीलामात्रच आहे असे दिसून येते. अशाप्रकारे ईश्वराच्या लीलेसंबंधी वीरशैवाचार्य व अद्वैताचार्य यामध्ये तर्कसाम्यता दिसून येते.

**वैषम्य व नैर्घृण्यदोषपरिहार समीक्षा**

प्रपंचोत्पत्तीच्या संदर्भात ईश्वराच्या निमित्तकारणत्वामध्ये किंवा अभिन्न-निमित्तोपादानकारणत्वामध्ये प्रायः आलोचक विश्वाची विचित्रता पाहून ईश्वरामध्ये वैषम्यनैर्घृण्यदोष समजतात. त्याचे निराकरण करण्यासाठी परमेश्वर प्राण्यांच्या अदृष्टाप्रमाणे सुखदुःखादींचे फल आहे त्याप्रमाणे सृष्टिरचना करतो. या प्राण्याच्या कर्मसापेक्षत्वावरून ही रचना होत असल्याने ईश्वराच्या रचनेचा आधार पूर्वकर्म मानल्यामुळे ईश्वरत्वाची हानी होते असा आक्षेप घेतला आहे. हा दोष दूर करण्याकरिता 'सृज्यप्राणिकृतदुष्कृतसुकृतपरिपाकविशेषाद् वैषम्योपपत्तेः न च स्वातन्त्र्यभंगः शंकनीयः, स्वांगं स्वव्याघातकं न भवतीति न्यायेन प्रत्युत तन्निर्वाहात्' (स.द.सं., पृ. ५१०), असे नैयायिक व वैशेषिक म्हणतात. तर योगदर्शनाचे भाष्यकार श्रीवाचस्पतिमिश्र महोदयांनी 'पुण्यापुण्यसहायः सुख-दुःखे भावयन्नपि नाकारुणिकः' (यो.सू.तत्त्ववै.१.२५) असे मत व्यक्त केले आहे. 'अतः सृज्यमानप्राणिधर्माधर्मापेक्षया विषमा सृष्टिरिति नायमीश्वरस्यापराधः, ईश्वरस्तु पर्जन्यवद् द्रष्टव्यः' (ब्र.सू.शा.भा.२.१.३४) असे श्रीमत् शंकराचार्य म्हणतात तर 'भामती'कार वाचस्पतिमिश्र महोदयांच्या मते 'न च कर्मापेक्षायाम् ईश्वरस्यैश्वर्यव्याघातः, न हि सेवादिकर्मभेदापेक्षः फलप्रदः प्रभुरप्रभुर्भवति' (श्री.भा.२.१.३४)

चक्रनेमिक्रमेणैव भ्रमन्ति हि शरीरिणः।
जात्यायुर्भोगवैषम्यकारणं कर्म केवलम्।।
एतेषां देहिनां साक्षी प्रेरकः परमेश्वरः।
एतेषां भ्रमतां नित्यं कर्मयन्त्रनियन्त्रणैः।। सि.शि. ५.४९-५०

असे श्रीरेणुकाचार्य प्रतिपादन करतात. अशाप्रकारे न्याय-वैशेषिक-योग-अद्वैतवेदान्त-वीरशैवदर्शन यांमध्ये वैषम्य-नैर्घृण्यदोषपरिहारासंबंधी साम्यदृष्टी पाहावयास मिळते.

निरीश्वरसांख्य व मीमांसकांनी जगदुत्पादक ईश्वराचा अंगीकार करणाऱ्यांनी आस्तिकांपुढे अनेक प्रश्न निर्माण केले आहेत. १) ईश्वर सशरीर आहे की अशरीर? २) तो वैषम्यादी दोषयुक्त आहे की नाही? ३) तो स्वप्रयोजनाने परप्रवृत्त होतो की अनुकंपार्थ? जर स्वप्रयोजनाने प्रवृत्त होत असेल तर त्याचे कृतार्थतायुक्त ऐश्वर्य खंडित होईल. अनुकंपेने तो प्रवृत्त होत असेल तर सुखमय सृष्टी निर्माण करील, दुःखमय नाही. इतकेच नाही तर निर्माणकार्य अनुकंपामूलक मानले तर ईश्वराच्या संहारकार्याला काय म्हणावे? निर्माण आणि संहारास अनुकंपा हे कारण कसे होईल? इत्यादी अनेक आक्षेपांची शक्यता असल्यामुळे ईश्वर नाही ही संभावना मानली तर मुळावर कुठाराघात केल्यासारखे होईल. तरी हे युक्तिसंगत दिसत नाही. व्यवहारामध्ये जसे हरीण पीक खातात म्हणून पिकांची पेरणी न करणे अयोग्य होईल. भिकारी येऊन भिक्षा मागतील या भीतीने स्वयंपाक करायचा नाही हेही अयोग्य आहे. तसेच ईश्वराचा स्वीकार करणे आवश्यक आहे. आता जिज्ञासा अशी उदित होते की, वैषम्यप्रभृती निराकरणासाठी ज्या दार्शनिकांनी अदृष्ट या कारणाला अनन्यशरण मानले आहे तर सर्व व्यवस्थेच्या उपपत्तीविषयी अदृष्टाने कर्तव्यपूर्ती होत असेल तर ईश्वराचा अंगीकार करणे आवश्यक नाही. या शंकेचे समाधान असे की, अदृश्य जड आहे, जडामध्ये प्रेरणा देण्याची क्षमता नाही. म्हणून अदृष्टाप्रमाणे फल देणारे भ. सर्वज्ञ परमेश्वर अनिवार्य रूपाने स्वीकार्य आहेत. अदृष्ट स्वीकारल्याने ईश्वरामध्ये वैषम्यादी दोष राहाणार नाहीत. स्वकृत नियमांचे प्रतिपालन केल्याने ईश्वराचे प्रभुत्व विघातक होणार नाही.

**वेदागमप्रामाण्यसमीक्षा**

दर्शनशास्त्राचे अभ्यासक वेदागमांचे प्रामाण्य दोन प्रकारे प्रतिपादन करतात. वेदांना पौरुषेय मानणाऱ्यांच्या दृष्टीने व वेदांना अपौरुषेय मानणाऱ्यांच्या दृष्टीने. प्रमाणान्तराने अर्थ प्राप्त करून रचना केली गेली त्यास पौरुषेयत्व मानतात तर तद्विपरीत अपौरुषेयत्व मानतात. (वेद हे एखाद्या पुरुषविशेषाकडून निर्माण झाले असे मानणे वेदाला पौरुषेय म्हणणे होय. वेद हे कुणाही पुरुषविशेषाकडून निर्माण केले गेले नाही असे मानणे म्हणजे वेदांना अपौरुषेय मानणे होय.)

नैयायिक व वैशेषिक वेदाला पौरुषेय मानतात. महर्षी कणादांचे 'तद्वचनादाम्नायस्य प्रामाण्यम्' या सूत्रावरील व्याख्येत श्रीशंकरमिश्रांनी 'तद्वचनात्तेनेश्वरेण वचनात् प्रणयनादाम्नायस्य वेदस्य प्रामाण्यम्. तथा हि वेदास्तावत् पौरुषेया वाक्यत्वादिति साधितम्. न चास्मदादयस्तेषां सहस्रशाखावच्छिन्नानां वक्तारः सम्भाव्यन्ते, अतीन्द्रियार्थत्वात्. न चातीन्द्रियार्थदर्शिनो स्मदादयः.... किंच, प्रमाया गुणजन्यत्वेन वैदिकप्रमाया अपि गुणजन्यत्वमावश्यकम्. तत्र च गुणो वक्तृयथार्थवाक्यार्थज्ञानमेव वाच्यः, तथा च तादृश एव वेदे वक्ता, यः स्वर्गापूर्वादिविषयसाक्षात्कारवान्. तादृशश्च नेश्वरादन्य इति सुष्ठ' (वै.सू.) त्यावर भाष्य करताना आचार्य शंकर मिश्रा यांनी म्हटले की 'तत्प्रणेता चास्मदादिभिरण्य ईश्वर एव तस्य चोत्कृष्ट गुणवत्वात् तदुच्चरितत्त्वेन वेदानां प्रामाण्यम्' असे प्रामाण्य दर्शवून व्यवस्था केली आहे. तसेच 'मन्त्रायुर्वेदप्रामाण्यवच्च तत्प्रामाण्यमाप्तप्रामाण्यात्' या गौतमीसूत्राच्या भाष्यात भगवान वात्सायनाने 'य एवात्मा वेदार्थानां द्रष्ट्रारः प्रवक्तारश्च, त एवायुर्वेदप्रभृतीनामित्यायुर्वेदप्रामाण्यवद् वेदप्रामाण्यमनुमातव्यम्'- (न्या.सू.भा.२.१.६९) अशा वेदांच्या पौरुषेयत्वास प्रामाण्य मानून तो उत्कृष्ट गुणांनी युक्त ईश्वरच प्रवक्ता आहे, असे स्वीकारले आहे.

योगदर्शनामध्ये 'योऽसौ प्रकृष्टसत्त्वोपादानादीश्वरस्य शाश्वतिक उत्कर्षः, स किं सनिमित्त आहोस्विन्निर्निमित्त इति। तस्य शास्त्रं निमित्तम्। शास्त्रं पुनः किन्निमित्तम्। प्रकृष्टसत्त्वनिमित्तम्। एतयोः शास्त्रोत्कर्षयोरीश्वरसत्त्वे वर्तमानयोरनादिः सम्बन्धः'- (यो.सू.भा. १.२४) असे भगवान भाष्यकार ईश्वराच्या उत्कृष्टत्वामुळे वेद प्रमाण आहेत. वेदांच्या उत्कृष्टतेमुळे ईश्वराचे श्रेष्ठत्व प्रमाण आहे, असे म्हणतात. यावरून वेद ईश्वरप्रणीत आहेत अर्थात् वेदांचे पौरुषेयत्व सिद्ध होते.

वीरशैवदर्शनामध्ये

सद्योजातेन ऋग्वेदं वामदेवेन याजुषम्।
अघोरेण तथा साम पुरुषेण त्वथर्वणम्।।
ईशानेन मुखेनैव कामिकाद्यागमांस्तथा।
जनयामास विश्वेशः सर्वसिद्धिप्रदायकः।। श्री.भा. १.१.३

या वचनाच्या प्रमाणाने भगवत्पाद श्रीपतिपंडिताराध्य वेदागम हे ईश्वराच्या मुखातून झाल्यामुळे प्रमाण सिद्ध होतात. याबाबतीत न्याय, योग, वैशेषिक तसेच वीरशैव यांच्यात विचारसाम्य आढळते.

ईश्वराचा अंगीकार न करणाऱ्या सांख्य तसेच मीमांसक यांनी वेदांना अपौरुषेय मानल्याने तसे ते वेदांचे प्रामाण्य प्रतिपादन करतात. भ. कपिल 'पौरुषेयं तत्कर्तुः पुरुषस्याऽभावात्' या सूत्राने ईश्वराचा अभाव असल्याने त्याच्या कर्तृत्वाचा अभावही स्वाभाविक आहे म्हणून ते वेदांचे अपौरुषेयत्व मानतात.

जैमिनी महर्षी 'कर्मैके तत्रदर्शनात्' इत्यादी सूत्रांद्वारा वेदांच्या नित्यतेचे प्रतिपादन करून त्यांचे अपौरुषेयत्व सूचित करतात. ईश्वराचा अंगीकार करणारे अद्वैत दार्शनिक जसे व्यवहारात भाट्ट सिद्धान्ताचा अंगीकार करतात तसे वेदांचे अपौरुषेयत्व स्वीकारतात. या ठिकाणी एक मुद्दा लक्षात घ्यावा लागेल की अद्वैतवेदान्तात अनाप्तप्रणीतत्वाला अपौरुषेयत्व म्हटले आहे, परंतु अनाप्तप्रणीतत्वाच्या अन्यथा उपपत्तीने आप्तप्रणीतत्वाची सिद्धी झाल्यावर वेदांचे अपौरुषेयत्व कसे शक्य होईल, या जिज्ञासेचे समाधान असे देता येईल की

यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै।
तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये।। श्वे.उ. ६.१८

या श्रुतीप्रमाणे सर्गाच्या आरंभी ईश्वराद्वारा श्रुतीचा जन्म होतो आणि वरील आक्षेपाचे समाधान होते. म्हणून पुरुषोच्चरितत्व पौरुषेयत्व म्हणता येणार नाही तर अन्य प्रमाणामुळे अर्थ प्राप्त होऊन विरचित झाल्यामुळे पौरुषेयत्व मानले जाते. म्हणून

श्रुतीनामीश्वराज्जन्म केवलं श्रुतिषु श्रुतम्।
मानान्तरोपलब्धेऽर्थे रचना तु न मीयते।। तत्त्व.प्र. पृ.२७३

म्हणून आमच्याकडून उच्चारण झालेल्या वेदवाक्यावरून आमचे कर्तृत्व नाही

तसेच सर्गादीमध्ये ईश्वर आनुपूर्वी–व्यत्ययाशिवाय वेदवाक्यांचा उच्चार करतो म्हणून ईश्वरामध्ये वेदांचे कर्तृत्व सिद्ध होत नाही व ईश्वरातही हे सामर्थ्य नाही की वेदांच्या आनुपूर्वीचा व्यत्यास करील.

मीमांसादर्शनात महाप्रलय अमान्य आहे. म्हणून वेदांच्या आनुपूर्वीचा विच्छेद शक्य नाही म्हणून ईश्वराची अपेक्षाच नसते. अद्वैतवेदान्तात महाप्रलयाचा अंगीकार केला असल्यामुळे महाप्रलयात शास्त्रसंप्रदायाच्या उच्छेदाची शक्यता असते. त्यामुळे सृष्टीसमयी ईश्वराकडून पुन्हा संप्रदायाचा प्रारंभ होतो असे प्रतिपादन केले आहे. हे पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा यात अंतर आहे. तसेच न्याय, वैशेषिक, व वीरशैव या दर्शनांत वेद ईश्वरोच्चरित असल्यामुळे वेदांचे पौरुषेयत्व मान्य आहे. सांख्य तसेच मीमांसा दर्शनांत ईश्वराचे अस्तित्व मानले नसल्याने वेदांचा उच्चार ईश्वराने केला नसल्याचे मानले नाही. म्हणजे अपौरुषेयत्व मान्य आहे. अद्वैतवेदान्तात मानले आहे की सृष्टीमध्ये प्रलयातील उच्छिन्न आनुपूर्वीचा उपदेशक व प्रवर्तक ईश्वर आहे, परंतु अन्य प्रमाणांनी अर्थ प्राप्त करून वेदांची रचना करीत नाही. म्हणून वेदांचे अपौरुषेयत्व स्वीकार्य आहे. वरील विवेचनावरून दर्शनशास्त्रात पौरुषेयत्व तसेच अपौरुषेयत्व यांतील अंतराचा बोध होतो. या विवेचनात मतभेद असूनही वेदांच्या प्रामाण्यात वरील दार्शनिकांचे एकमत झाल्यामुळे सर्व दर्शनांना आस्तिक किंवा वैदिक दर्शन म्हटले जाते.

**ईश्वरानुग्रहाने मोक्षप्राप्ती समीक्षा**

न्यायदर्शनात महर्षी गौतमांनी प्रतिपादित केले आहे की मोक्षप्राप्तीमध्ये श्रवणमननादींसोबत अष्टांगयोग आवश्यक आहे. न्यायाचार्य श्रीमान् भासर्वज्ञ यांनी श्रुतिप्रमाणाचे उपस्थापन करून मोक्षप्राप्तीसाठी एका कारणमालेचे प्रतिपादन केले आहे. महर्षिप्रोक्त अष्टांगयोगाच्या अनुष्ठानाने अनभिरतिसंज्ञक परवैराग्याचा उदय होतो. त्यानंतर महेश्वराविषयी पराभक्ती उदित होते. त्या भक्तीने शिवाचा साक्षात्कार होतो व नंतर शिवाच्या अनुग्रहकृत्याने मोक्ष प्राप्त होतो. असे म्हटले आहे की,

यदा चर्मवदाकाशं वेष्टयिष्यन्ति मानवाः।
तदा शिवमविज्ञाय दुःखस्यान्तो भविष्यति।। श्वे.उ. ६.२०

वैशेषिक दर्शनात महर्षी कणादांनी 'यतोऽभ्युदयनि:श्रेयससिद्धिः स धर्मः, (वै.सू.१.१.२), 'धर्मविशेषप्रसूताद्... तत्त्वज्ञानान्नि:श्रेयसम्' (वै.सू.१.१.४) या सूत्रद्वयातून स्वाभिप्रायाचे प्रकाशन केले आहे. निवृत्तिलक्षण धर्माने पदार्थाच्या साधर्म्यवैधर्म्यपुरस्सर तत्त्वज्ञानाचा उदय होतो. नंतर मोक्षप्राप्ती होते. पश्चाद्वर्ती आचार्य प्रशस्तपादांनी भाष्यात ईश्वरी प्रेरणेने अभिव्यक्त धर्माला मोक्षप्रयोजक म्हटले आहे. तसेच श्रीधर भट्टांनी वरील पंक्तीची व्याख्या करत भाष्यसंमत सिद्धान्ताचे पोषण केले आहे. 'धर्मोऽपि तावन्न नि:श्रेयसं करोति यावदीश्वरेच्छया नाऽनुगृह्यते' (न्या.क.पृ.१९) अर्थात् ईश्वरेच्छेने कार्यारंभाभिमुख धर्मापासून तत्त्वज्ञान व त्यापासून नि:श्रेयस् अर्थात् मोक्षप्राप्ती असा क्रम सुचविला आहे. म्हणून वैशेषिक दर्शनात देखील मोक्षप्राप्ती ईश्वरानुग्रहानेच होते.

योगदर्शनात सुस्पष्ट रूपाने प्रतिपादन केले आहे की, समाधिफल कैवल्यप्राप्ती ईश्वरानुग्रहानेच होते. म्हणूनच म्हटले आहे की 'समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात्' यावरून मीमांसादर्शनातही प्राचीन आचार्यांनी ईश्वराचे अस्तित्व अमान्य केले असले तरी अर्वाचीन आचार्य आपदेव व लौगाक्षिभास्कर यांनी यज्ञपतीच्या रूपाने ईश्वरास मान्य केले आहे. दर्शपूर्णमासादी यागांमध्ये ईश्वरार्पणबुद्धीने अनुष्ठान केल्याने तदनुग्रह बलाने नि:श्रेयसाची प्राप्ती होते असा परवर्ती मीमांसकांचा सिद्धान्त आहे.

वीरशैवसिद्धान्तात जगद्गुरू रेणुकाचार्यांनी मोक्षप्राप्तीत ईश्वरानुग्रहाला कारण मानले आहे ते असे–

शम्भोः शिवप्रसादेन संसारच्छेदकारिणा।
मोहग्रन्थिं विनिर्भिद्य मुक्तिं यान्ति विवेकिनः।।
विना प्रसादमीशस्य संसारो न निवर्तते।
विना सूर्योदयं लोके कुतः स्यात्तमसो लयः।।
सर्वाऽनुग्राहकः शम्भुः केवलं कृपया प्रभुः।
मोचयेत् सकलान् जन्तुन्न किंचिदिह कारणम्।। सि.शि.१८.४-६

याप्रमाणे न्याय, वैशेषिक, योग, मीमांसा शास्त्रांचे अर्वाचीन आचार्य यांनी आणि वीरशैवाचार्यांनी या बाबतीत मांडलेल्या विचारांत समता दिसून येते.

उपर्युक्त पर्यालोचनावरून निष्कर्ष प्राप्त होतो की, न्याय व वैशेषिक दर्शनांतील

ईश्वर हा जगत्सृष्टीमध्ये केवळ निमित्तकारण आहे. ईश्वराची तुलना कुंभकारासोबत केली जाते. इथे स्वीकारलेला ईश्वरवाद अपूर्ण आहे. सृष्टीमध्ये जसे सृष्टीतील स्वशिवाय असलेले परमाणू सापेक्ष असतात म्हणून ईश्वर सर्वशक्त नाही, जगताच्या रचयित्याच्या रूपाने स्वीकृत ईश्वर परमाणू व जीवांची सृष्टी करत नाही. कारण परमाणू नित्य मानले गेले आहेत. म्हणून न्याय-वैशेषिक दर्शनांमध्ये ईश्वर सर्वनियामक आहे, सर्वस्रष्टा नाही. या आचार्यांनी अत्यंत आग्रहाने ईश्वराची सिद्धी केली आहे. मानवांच्या ईश्वराप्रती भक्तीचे संवर्धन केले आहे. त्याचबरोबर आदर्शप्राय धार्मिक जीवनाचा सफल प्रयास करतात. जीवाचा ईश्वराशी तादात्म्यसंबंध स्थापित करताना त्याचे योगदान नसते तरीही हे श्रेय या आचार्यांना अवश्य दिले जाते की भारतीय मानवांच्या धार्मिक जीवनात आचार्यांनी ईश्वरविषयक विचारांचा योग्य प्रवाह निर्माण केल्याचे दिसते. एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की न्याय व वैशेषिक दर्शनांत उपास्य रूपात शिवच आहेत. म्हणून उदयनाचार्य किंवा श्री. शंकर मिश्र आपल्या प्रबंधग्रंथांत शिवाची स्तुती करतात. समान रूपाने शिवोपासक असूनही नैयायिकांना शैव म्हणतात व वैशेषिकांना पाशुपत म्हणतात. या मताचे समालोचन आचार्य व्रजवल्लभ द्विवेदी यांनी आपल्या तंत्रयात्रा ग्रंथात केले आहे.

सांख्यदर्शन टीकाकार विज्ञानभिक्षू आदींनी ईश्वराचा अंगीकार केला आहे. परंतु ईश्वरास ससंकल्पबलाने जगताची रचना करण्यासाठी सामर्थ्ययुक्त मानले नाही. त्यांनी सन्निधानमात्र प्रकृतीमध्ये ईश्वराला चुंबकाप्रमाणे प्रवर्तक मानले आहे. हा देखील पूर्णेश्वरवादात्मक नाही, या ईश्वरवादाचा प्रचारही अधिक नाही. योगदर्शनसंमत ईश्वर योगिजनांच्या मोक्षोदयात उपस्थित विघ्नांना दूर करतो, म्हणून सहाय्यकरूपाने मान्य आहे. तो स्वयमेव मोक्षदाता मानला जात नाही. म्हणून ईश्वरविषयक एकदेशमाहात्म्यमंडित विचार समाधानकारक नाही. डॉ. राधाकृष्णन महोदय आपला अभिप्राय प्रकट करतात की, 'योगसाधना पद्धतीच्या प्रचारकांनी मानवाच्या सहज आस्तिक भावनेचे समाधान न करता आपल्या साधनपद्धतीच्या प्रचाराला असमर्थ मानले आणि म्हणून ईश्वराला स्वीकार्य मानले.' अर्वाचीन मीमांसकांनी स्वीकृत केलेला ईश्वरही सृष्ट्यादींची रचना करण्यास समर्थ नाही, धर्मानुरूप केवळ अनुग्रहकर्ता आहे (भा.द.भा. २)

अद्वैतवेदान्तसंमत ईश्वर यद्यपि सृष्ट्यादी कार्यात समर्थ मानला तरी प्राण्यांच्या अदृष्टानुरूप शुभाशुभ कर्मांचे फल देतो. पूर्णेश्वरासारखा प्रतीतीला येतो, परंतु पारमार्थिक नाही. तो मायेसारखा मायाशबलित ईश्वराची मिथ्यारूपता स्वीकारत नाही.

वीरशैवसिद्धान्तात ईश्वर जगताच्या उत्पत्तीविषयी अभिन्ननिमित्तोपादानकारण आहे. तो प्राण्यांच्या हृदयात निवास करतो. प्राण्यांच्या कर्मानुसार त्यांना शुभाशुभ प्रेरणा देतो. मायाविशिष्ट होऊनही तो मिथ्या मानला जात नाही, सत्यच आहे. मुमुक्षुजनांचा तो उपास्यरूप आहे. मुक्तांचा तो प्राप्य आहे.

परशिव सगुणरूप असून जगताच्या अंतर्यामी असणारा व सर्वसंचालक आहे. निर्गुणरूपाने तो विश्वोत्तीर्ण आहे. वीरशैवांचा ईश्वरवाद पूर्ण सार्थक असा आहे, म्हणून स्तुत्य आहे. वरील प्रतिपादनाद्वारा श्रद्धास्पद भ. शिवाविषयी विविध दार्शनिकांनी मान्य केलेल्या विभिन्न मतांची मी (ग्रंथकार ज.डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी) आलोचना केली आहे. वास्तविकरूपाने पाहिल्यास ईश्वर भावग्राह्य आहे, एक आहे.

ज्याप्रमाणे कुटुंबातील एकच पुरुष आईचा पुत्र असतो, पत्नीचा पती असतो, आजोबांचा नातू असतो अशा अनेक संबोधनांनी त्याला बोलावतात. तसेच देवही उपासकांच्या भेदाप्रमाणे वेगवेगळ्या नावांनी ओळखला जातो.

'हनुमन्नाटक'कारांनी यावर विस्तृत व्याख्या केली आहे –

यं शैवा: समुपासते शिव इति ब्रह्मेति वेदान्तिनो
बौद्धा बुद्ध इति प्रमाणपटव: कर्तेति नैयायिका:।
अर्हन्नित्यथ जैनशासनरता: कर्मेति मीमासंका
सोऽयं वो विदधातु वाछितफलं त्रैलोक्यनाथो हरि:।।

ह.ना.१, अंक ३, श्लोक

म्हणून अनन्तमहिमासंपन्न ईश्वराबद्दल अधिक काही सांगणे शक्य नाही. भगवत्पादांच्या पंक्तींना मनामध्ये पुन्हा पुन्हा स्मरण करीत या प्रसंगास विराम देतो.

न मन्त्रं नो यन्त्रं तदपि च न जाने स्तुतिमहो
न चाह्वानं ध्यानं तदपि च न जाने स्तुतिकथा:।

न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपनं
परं जाने मातस्त्वदनुसरणं क्लेशहरणम्।। दे.क्ष.स्तो. १

**जीवस्वरूपाची समीक्षा**

न्याय, वैशेषिक तसेच प्राभाकरप्रस्थान या दर्शनांमध्ये आत्म्याचे विभुपरिमाण स्वीकारले आहे. त्याची संख्या अनन्त आहे, तो नित्य आणि प्रत्येक शरीरात भिन्न भिन्न आहे. या सर्व बाबी सांख्यदर्शनामध्ये सुद्धा नमूद केल्या आहेत. सांख्याचार्यांनी सुद्धा पुरुषातील विभुत्वादींचा स्वीकार केला आहे. फरक एवढाच आहे की सांख्यांनी पुरुषास चिद्रूप समजले आहे, तर नैयायिक, वैशेषिक व प्राभाकर यांनी आत्म्यास स्वरूपत: जड मानले आहे. याच कारणामुळे दर्शनांमध्ये आत्ममन:संयोग होऊनसुद्धा ज्ञानादींची उत्पत्ती मान्य केली आहे. म्हणून न्याय व वैशेषिक आचार्यांनी आत्म्यामध्ये ज्ञानापासून संस्कारापर्यंत १४ गुणांची स्थिती स्वीकारली आहे. सांख्याचार्यांनी पुरुषास निर्गुण मानले आहे.

न्याय आणि वैशेषिक दर्शनांत शरीर, इन्द्रिये या अनात्म वस्तूंपासून आत्म्याला व्यावृत्त करून आत्म्यामध्ये जिज्ञासूंच्या बुद्धीला स्थिर करतात. येथे आत्म्यात बुद्धी, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म तसेच संस्काराशिवाय कर्तृत्व, भोक्तृत्व आदी धर्मांचा सुद्धा स्वीकार केला जातो. या दोन्ही दर्शनांमध्ये उपर्युक्त धर्मांशिवाय नित्य शुद्ध बुद्ध व विभुस्वरूप आत्म्याचा उपदेश केला नाही; परंतु सांख्यदर्शनामध्ये सुखादिधर्मवर्जित निर्लेप चिद्रूप पुरुषास स्वीकारले आहे, म्हणून न्याय व वैशेषिकांशिवाय सांख्यदर्शनाची उपयुक्तता विशेषतेसह श्रेष्ठ आहे. म्हणून याविषयी डॉ. राधाकृष्णन महोदयानुसार, जसे दोन दगड एकमेकांसह संघर्षित झाले असता प्रकाश उत्पन्न होतो, त्यानुसार दोन अचेतन – आत्मा व मन यांच्या संयोगाने आत्म्यामध्ये ज्ञानगुणाची उत्पत्ती होते, ही कल्पना नैयायिकांना भौतिकवादासारखी भासते. एवढेच नाही तर आत्मा विभू आहे तसेच मन अणू आहे आणि दोन्ही निरवयव आहेत. अशा परिस्थितीत दोहोंच्यामध्ये संयोगसंबंधाची कल्पना करता येत नाही. जसे आत्मा विभू आहे तसे त्याचा मनासह होणारा संयोग सदैव विद्यमान असूनसुद्धा मन इन्द्रियांसह संयुक्त होते तसेच ज्ञानगुणांची उत्पत्ती होते, असे नैयायिकांचे मत आहे. येथे अणू मनाचा एकाच वेळी आत्म्यासह

तसेच इन्द्रियांसह संयोग कसा होऊ शकतो, या जिज्ञासेचे उत्तर देण्यास असमर्थ होऊन नैयायिक लोक ईश्वराच्या शक्तीचा नियामक समजून समाधानाचा प्रयत्न करतात.

उपर्युक्त पर्यालोचनाने आत्म्यामध्ये चैतन्य मानण्यापेक्षा आत्माच चेतनरूपी मानणे श्रेष्ठ होय. म्हणून आत्म्यास चित्स्वरूप समजणारा सांख्यदार्शनिक नैयायिकापेक्षा अधिक विचारवान तसेच अंतर्मुख वाटतो.

येथे त्याचे विवेचन असे– नैयायिक व वैशेषिकांसह सांख्यदर्शनाने आत्म्यामधील ज्ञान, इच्छा तसेच प्रयत्नप्रभृती गुणांमध्ये साक्षात् संबंध स्वीकारला नाही. सांख्यमतामध्ये पुरुष शुद्ध स्फटिकासारखा स्वच्छ व निर्गुण आहे. ज्ञानादी गुणांना अंतःकरणाचे धर्म मानतात. जास्वंदी फुलामुळे स्फटिक लाल दिसतो त्याप्रमाणे पुरुषाच्या ठिकाणी ज्ञानादी गुण प्रतीत होतात. म्हणून तो अवास्तविक आहे. या स्वीकृतीमुळे सांख्यसंमत पुरुष न्याय, वैशेषिक व प्राभाकर यांनी मानलेल्या आत्म्यापेक्षा श्रेष्ठ आहे.

भाट्टमीमांसक आत्म्यास न जड मानतात न चेतन. परंतु काजव्याप्रमाणे उभयात्मक मानतात. आत्म्याचा अचेतनांश सुखादी आकारात परिणत होतो तसेच चेतनांश ज्ञानक्रियेने युक्त होतो, असे संबोधणारा अर्धपक्ष होय. म्हणून 'हिन्दुदर्शनसार' ग्रंथामध्ये श्रीनिवासाचार्यांनी (पृ.१६९) याविषयी असे म्हटले आहे की, भाट्टमीमांसकांनी जडात्मक द्रव्यस्वरूप आत्म्यामध्ये चिदंशास सुद्धा स्वीकारूने बौद्धांचा विज्ञानात्मवाद व नैयायिकांचा जडद्रव्यात्मवाद यांचा समन्वय करून मध्यमार्गाचे अवलंबन केले आहे, हे सर्वज्ञात आहे.

या संदर्भात डॉ. राधाकृष्णन महोदयांनी (भा.द.,भा.२ पृ.४०८, हिंदीसंस्करण) मध्ये आपली संमती व्यक्त केली आहे. भाट्टसंमत आम्त्यामध्ये जो अचिदंश सांगितला आहे, तो संभवतः अंतःकरण आहे. त्यानुसार आत्मा सुखाकार व ज्ञानाकार रूपामध्ये परिणत होतो. म्हणूनच एकाच वस्तूमध्ये विषयविषयीभावाच्या समर्थनासाठी परस्परविरुद्ध चिद्रूप तसेच अचिद्रूप दोन कल्पना उपयुक्त नाहीत. परंतु असे दिसते की समालोचकांची ही उक्ती वेदान्तमार्गाचे अनुसरण करते. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग तसेच मीमांसक दर्शनांमध्ये शरीरपरिमाणतुल्य आत्मपरिमाण मान्य नाही. तुल्यपरिमाण स्वीकारल्यानंतर शरीराच्या

ऱ्हासवृद्धीसारखी ऱ्हास-वृद्धी आत्म्यासही होईल, तसेच शरीराप्रमाणे आत्म्याची अनित्यता सिद्ध होईल. म्हणून जैनमतातील आत्म्याची शरीरपरिमाणता आस्तिक दर्शनांना अमान्य आहे. जर आत्मा अणुपरिमाण मानला तर चंदन तसेच कंटक यांच्या संयोगाने शरीरातील विभिन्न भागांमध्ये उत्पन्न होणारी सुखप्रतीती आणि दुःखप्रतीती यांची उपपत्ती होऊ शकत नाही. म्हणून आत्मा हा आकाशासारखा विभू आहे, हे स्वीकारले जाते. विभू असल्यामुळे आत्म्याचे नित्यत्वसुद्धा आपोआप सिद्ध होते. समीक्षक ग्रंथकार आचार्य आपल्या निदर्शनास आणून देतात की, न्यायादी दार्शनिक आचार्यांनी याबाबतीत सूक्ष्म चिंतन केलेले नाही. अनंतसंख्यक जीव व्यापक असल्यामुळे तसेच आपापसात काही भेद नाही म्हणून तत्त्वतः परस्परभिन्न कसे होतील?

याशिवाय विचारणीय बाब अशी की, व्यापक असल्यामुळे सर्व आत्म्यांचा देश समान आहे. तसेच मन, लिंगशरीर व स्थूलशरीर जे एकाचे आहे ते त्याच्याशिवाय अन्य कोणाचे होत नाही. जिच्या साह्याने वेगवेगळी शरीरे वेगवेगळ्या आत्म्याशी कर्मसंबंध संपादित करतील, ती कोणती रीत आहे? ज्याच्या आधारावर विभिन्न आत्मे स्वकृत कर्मफलांचा उपभोग करतात, असा कोणता प्रकार आहे? याप्रकारचे अन्य अनेक प्रश्न आहेत. त्यांची न्यायादी दार्शनिकांनी पुढीलप्रमाणे उत्तरे दिलेली आहेत. मनस्, लिंगशरीर यांचा आत्म्यासह समानरूपाने संयोग झाल्यावर त्याचा विलक्षण संबंध निजात्म्याशी होतो. त्याच्याच प्रभावाने नियमित रूपाने निजात्म्यास फलोपभोग घेण्यासाठी मनादी सहकार्य करतात. अन्य आत्मे देखील त्याप्रमाणेच विभिन्न देशांमध्ये असलेल्या लिंगशरीरांद्वारे फलांचा उपभोग घेतात.

याशिवाय शरीरप्रदेशाशिवाय अन्यत्र विद्यमान आत्मा सुखदुःखादींसह कोणत्याही प्रकारचा संबंध नसल्याकारणाने वर्तमान आत्म्याचे अन्यथा सिद्ध होण्याच्याकारणाने अनंत आत्मव्यक्तींचे विभुत्व युक्तिसंगत ठरत नाही.

दुसरा एक विचार समोर येतो की, जीवात्मा विभू असूनही सदैव, सर्वत्र त्याचे अस्तित्व असल्यामुळे त्याची उत्क्रांती, गती व आगतीच्या प्रतिपादक श्रुतिवाक्यांची निरर्थकता अनुभवाला येते. तसेच 'तेन प्रद्योतेनैष आत्मा निष्क्रामति चक्षुषो वा मूर्ध्नो वाऽन्येभ्योऽपि वा शरीरदेशेभ्यः' (बृ.उ. ४.४.२) या श्रुतिवाक्यानुसार जीवाची उत्क्रांती दिसून येते. 'ये वैके चास्माल्लोकात् प्रयन्ति चन्द्रमसमेव ते सर्वे

गच्छन्ति' (कौषी.१.२) या श्रुतिवाक्याद्वारे जीवाची गती लक्षात येते. त्याप्रमाणेच 'तस्माल्लोकात् पुनरेत्यस्मै लोकाय कर्मणे' (बृ.उ. ४.४.६) या श्रुतिवाक्याद्वारे जीवाची आगति- आगमन दिसून येते. जर जीव विभू असेल तर त्याचा शरीरासह वियोग कसा होऊ शकेल? जर लिंगशरीराच्या गमन आणि आगमनाने आत्म्यामध्ये त्याचा औपचारिक प्रयोग मानला तर खालील श्रुती युक्तिसंगत होणार नाही. 'तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति' (बृ.उ. ४.४.२) या श्रुतीने स्पष्टपणे प्रथम आत्म्याचे गमन सांगितले आहे त्यानंतर प्राणोपलक्षित लिंगशरीराचे गमन सांगितले आहे. पाराशरस्मृतीमध्ये सुद्धा आत्मा सूर्यमंडलभेदक आहे असे सांगितले आहे:-

द्वाविमौ पुरुषो लोके सूर्यमण्डलभेदिनौ।
परिव्राड् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः।। पा.स्मृ.२.३२

अर्थात् श्रुतिसंमत अणुत्वाद्वारे जीवात्म्याचा स्वीकार करणे युक्तिसंगत आहे. तसेच 'एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यः।' (मुं.उ. ३.१.९) व 'अंगुष्ठमात्रः पुरुषोन्तरात्मा (क.उ. २.६.१७). ज्या श्रुतींमध्ये आत्म्याचे श्रेष्ठत्व सांगितले आहे त्यांचे परमात्मविषयक तात्पर्य समजावे लागेल. तसेच 'स वा एष महानज आत्मा।' (बृ.उ. ४.४.२२), 'आकाशवत् सर्वगतं सुसूक्ष्मम्।' (शां.उ. २.१.३) इत्यादी श्रुती समजून घ्याव्या लागतील.

अशाप्रकारे जीवात्म्याचे अणुत्व समजून श्रुतीनुसार त्याचे नित्यत्व व प्रतिशरीरभिन्नत्व सुद्धा सिद्ध होते. म्हणून वीरशैवदर्शनामध्ये जीवाचे अणुत्व समजून शरीरात व्याप्त ज्ञानप्रभेद्वारे सुख व दुःखाच्या साक्षात्काराची व्यवस्था सांगितली आहे. म्हणून उपर्युक्त भोगसांकर्याच्या निराकरणासाठी तसेच जगत्-वैचित्र्याच्या व्यवस्थेचा हेतू आणि श्रुतीने सांगितलेल्या उत्क्रांती-गती तसेच आगतीच्या योग्य व्यवस्थेकरिता आत्म्याच्या अणुत्वाचा पोषक असे वीरशैवदर्शनच तत्त्वचिंतकांद्वारा सम्मानयोग्य आहे, यात कोणतेही दुमत नाही.

षड्दर्शनांच्या न्याय, वैशेषिक, सांख्य, योग तसेच पूर्वमीमांसा दर्शनामध्ये प्रत्येक शरीरात आत्मभेद स्वीकारला आहे. म्हणून यास द्वैतदर्शन असे म्हणतात. उत्तरमीमांसा दर्शनामध्ये सर्व शरीरांत एकच आत्मा स्वीकारला आहे. म्हणून ते अद्वैतदर्शन आहे, ते प्रसिद्ध आहे. यातील न्याय-वैशेषिक दर्शनामध्ये खालील सूत्रांद्वारा विवेचनासह प्रत्येक शरीरातील आत्मभेदाची व्यवस्था वर्णिली आहे. ती

अशी आहे–

स च देहेन्द्रियादिव्यतिरिक्तः प्रतिशरीरं भिन्नो नित्यो विभुश्च। (त.भा. पृ.१४५)

नानात्मानो व्यवस्थातः।' (वै.सू.३.२.२०), शास्त्रसामर्थ्याच्च। (वै.सू. ३.२.२१) इत्यादी. तसेच मीमांसादर्शनात आत्म्याचे प्रतिशरीरभिन्नत्व, नित्यता, श्रेष्ठता तसेच त्याचा कर्ता व भोक्ता याचे प्रतिपादन केले आहे. सांख्य व योग दर्शनांमध्ये पुरुषाचे असंगत्व, निर्गुणत्व यांचे प्रतिपादन केलेले आहे. त्यात वास्तविक कर्तृत्वाचा आणि भोक्तृत्वाचा अभाव आहे. येथे पुरुषभेद औपाधिक नाही तर वास्तविक आहे. तो प्रतिशरीरात नित्य आणि श्रेष्ठ पुरुष आहे. म्हणून श्रीमधुसूदनसरस्वतीजी म्हणतात, आत्मा हा नित्य व श्रेष्ठ आहे याबद्दल सांख्य–वेदान्तामध्ये कोणत्याही प्रकारचा विवाद नाही, परंतु सांख्याचार्य, वेदान्त्यासारखे प्रतिदेह आत्म्याचे एकत्व स्वीकारत नाहीत. तसेच वैशेषिकांची मान्यता आहे की बुद्धी, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म तसेच भावनात्मक संस्कार या नऊ विशेष गुणांनी युक्त आत्मे प्रतिदेह वेगवेगळे आहेत, नित्य आहेत, तसेच श्रेष्ठ आहेत. तार्किक व मीमांसकसुद्धा या मताचे समर्थन करतात. परंतु सांख्य दार्शनिक, आत्म्याच्या उक्त गुणांनी युक्त असल्यामुळे आपली असहमती प्रकट करतो. परंतु प्रतिशरीर आत्मभेद मानल्याने तो सर्वथा सहमत आहे नसता सुखदुःखांची कर्माधारित जीवभेदपुरःसर व्यवस्था अनुपपन्न होईल. (भ.गी.म.,२.१४)

द्वैतदर्शनामध्ये न्याय व वैशेषिक यांच्या अभेदप्रतिपादक श्रुतींची गौणार्थकाची व्याख्या प्रस्तुत केली आहे. तसेच 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म।' (त्रि.म.ना. ३.३)च्या अद्वितीयतेचे तात्पर्य एकत्वसमनियत विजातीयवैलक्षण्य अर्थाने प्रतिपादन केले आहे. तसेच 'सर्वं खल्विदं ब्रह्म' (छां.उ. ३.१४.१) या वाक्याने सर्व जगतास ब्रह्माने व्याप्त केल्याचे वर्णन करून संबंध प्रतिपादन केला आहे. किंवा जीवासारखे घटादींमध्ये सुद्धा ब्रह्मत्वाचे अपादान असल्यामुळे ब्रह्माची अनित्यता व जडता व्यक्त केली आहे. तसेच 'तत्त्वमसि।' (छां.उ. ६.८.७), 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति।' (मुं.उ. ३.२.९) इत्यादी वाक्यांमध्ये स्थलविशेषामध्ये कैवल्यपरता, अन्यत्र ब्रह्मसाम्यरता तसेच इतरत्र नियामक–परमात्मैकत्वपरतेस गौणार्थ रूपाने व्यवस्थापित केले आहे. (सि.चं., पृ. ४०–४१) मध्ये आचार्य श्रीधरभट्टांनी

स्पष्ट म्हटले आहे की, 'अभेदश्रुतयस्तु गौणार्था इतिदिक्।' (न्या.कं. पृ.२१३)

सांख्य-योगदर्शनांमध्ये अद्वैतश्रुतींचे तात्पर्य विजातीय-द्वैत-निषेधामध्ये प्रतिपादन केले आहे. जसे 'नाद्वैतश्रुतिविरोधो जातिपरत्वात्।' (सां.सू. १.१५४) अद्वैत वाक्यांचे 'निरंजनः परमं साम्यमुपैति।' (मुं.उ. ३.१.३) इत्यादी श्रुतीसह समन्वित अर्थ- चिदेकरूपता आहे, त्याचे अवैधर्म्यलक्षण, अभेदरूपतेमध्ये तात्पर्य आहे, अखण्डार्थपरतेमध्ये नाही. विज्ञानभिक्षूंनी अत्यंत विस्तारपूर्वक याचे वर्णन केले आहे. (सां.सू. १.१५४)

उपरोक्त विवेचनावरून स्पष्ट होते की, ज्या दर्शनांमध्ये द्वैतवास्तवाचे प्रतिपादन केले आहे. येथे द्वैतप्रतिपादक श्रुती सावकाश आहेत तसेच अद्वैत श्रुती निरवकाश असल्यामुळे गौणार्थक आहेत. (शा.दी. पृ.१२५)

उत्तरमीमांसेत 'जीवो ब्रह्मैव नापरः।' चा उद्घोष करून भगवत्पाद शंकराचार्यांनी जीव आणि ब्रह्मामधील वास्तविक भेदाचा निषेध केला आहे. व्यवस्थेच्या उपपत्तीकरिता अंतःकरण उपाधीच्या प्रभावभेदाने एका ब्रह्माची नानारूपता औपाधिक समजली जाते. अद्वैतदर्शनात आत्मा निःसंग समजला जातो तसेच कर्तृत्व, भोक्तृत्व आणि सुखदुःखादीस अंतःकरणाचा धर्म म्हटले जाते. अशाप्रकारे अंतःकरणभेदाने जगताचे वैचित्र्यसुद्धा प्रतिपादन केले आहे.

अशाप्रकारे अद्वैतवेदान्तामध्ये आत्मा नित्य आहे, श्रेष्ठ आहे आणि एक आहे. म्हणून या मतामध्ये पुढील द्वैतश्रुतींचा 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया' (श्वे.उ. ४.६), 'द्वे ब्रह्मणी वेदितव्ये' (त्रि.ता. ५.१७) यानुसार अनवकाश होतो.

भेदप्रतिपादक तसेच अभेदप्रतिपादक दर्शनांच्या अपेक्षेने भेदाभेदवादाचे प्रतिपादन करणारे वीरशैवदर्शन आहे. यात सर्व श्रुतिवाक्यांचा समन्वय होतो. यात सर्व श्रुतिवाक्यांचा समावेश होतो. भाष्यकार श्रीपतिपंडिताराध्य भगवत्पादांनी आपल्या सिद्धान्तास 'विशेषाद्वैत' या संज्ञेने विभूषित केले आहे.

श्रुत्यैकदेशप्रामाण्यं द्वैताऽद्वैतमतादिषु।
द्वैताऽद्वैतमते शुद्धे विशेषाद्वैतसंज्ञिते।
वीरशैवैकसिद्धान्ते सर्वश्रुतिसमन्वयः।। श्री.भा. मंगलश्लोक १५

विशेषाद्वैताचा व्युत्पत्तिनुसार अर्थ असा- विश्च शेषश्च इति विशेषौ- परमात्मजीवौ, तयोः अद्वैतम्- विशेषाद्वैतम्। 'विश्चक्षुषि व्योम्नि वाते परमात्मनि

पक्षिणि।' या निघण्टुवाक्याच्या आधारे पक्षिवाचक विशब्द परमात्मवाचक सुद्धा आहे. 'द्वा सुपर्णा' (श्वे.उ. ४.६), तसेच 'हंस हंसेति यो ब्रूयाद्धंसो ब्रह्मा हरिः शिवः' (ब्र.वि. ३४), इत्यादी श्रुतींमध्ये परमात्म्याचे पक्षिरूपी वर्णन केलेले आहे. म्हणून विशब्द प्राकृतात परमात्मावाचक आहे. तसेच 'यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिंगा व्युच्चरन्ति' (बृ.उ. ३.१.२०) इत्यादी श्रुतिवाक्यांनुसार जीवास परमात्म्याचा अंश असे संबोधले आहे. म्हणून शेष शब्दाने जीवाचा व्यवहार होतो. अद्वैत शब्दाचा अर्थ-'यथा नद्यः' (मुं.उ. ३.२.८), इत्यादी श्रुतीनुसार ब्रह्मासोबत जीवाचे सायुज्य आहे. अशाप्रकारे जीव आणि ईश्वराचा संसारदशेमध्ये भेद तसेच मोक्षदशेमध्ये अभेद असा भेदाभेद विशेषाद्वैतामध्ये प्रतिपादन केला आहे.

विशब्देनोच्यते शम्भुः द्वासुपर्णेति मन्त्रतः।
शेषशब्देन शारीरो यथाग्नेरिति मन्त्रतः।
अद्वैतेन भवेद्योगो यथा नद्यादिभिस्तथा।। श्री.भा. मंगलश्लोक १६

अर्थात् न्याय, वैशेषिक व योग या दर्शनांमध्ये जीवाचा व्यक्तीशी परस्पर तसेच ईश्वरासह भेद पारमार्थिक आहे. सांख्य व पूर्वमीमांसेमध्ये ईश्वराचा सद्भाव नाही अर्थात् जीवात्म्यामध्ये परस्पर वास्तविक भेदाचा अंगीकार केलेला आहे. त्याशिवाय अद्वैतवेदान्तामध्ये विभिन्न जीव व परमेश्वरामध्ये भेद पारमार्थिक नाही तर औपाधिक आहे. तसेच अभेद पारमार्थिक आहे.

उपरोक्त सर्व दर्शनांमध्ये श्रुती एकदेशी संबोधिली जाते. तर काहींच्या मते भेदप्रतिपादक श्रुतीची सार्थकता आहे इतरांच्या मते अभेदप्रतिपादक श्रुतीची सार्थकता आहे.

वीरशैवदर्शन उभयविध श्रुतींचा समन्वय या वैशिष्ट्याचे प्रतिपादन करते. भगवत्पाद श्रीरेणुकाचार्यांनी या सिद्धान्ताच्या वैशिष्ट्यास प्रकट केले आहे:-

वेदैकदेशवर्तिभ्यः सांख्यादिभ्यो महामुने।
सर्ववेदानुसारित्वाच्छैवतन्त्रं विशिष्यते।।
शैवतन्त्रमिति प्रोक्तं सिद्धान्ताख्यं शिवोदितम।
सर्ववेदार्थरूपत्वात् प्रामाण्यं वेदवत् सदा।। सि.शि. ५.७-८

उपरोक्त विवेचनावरून स्पष्ट होते की, नैयायिक, वैशेषिक व प्राभाकर जीवास सद्रूप समजतात. भाट्टमीमांसकांनी त्यास सद्रूप व आंशिक चिद्रूप समजले

आहे. सांख्य व योग दार्शनिकांनी सद्रूप व पूर्णचिद्रूप समजले आहे, तसेच अद्वैत दार्शनिकांनी जीवास सच्चिदानंद समजले आहे. या क्रमाने जरी जीवात्म्याचा विकास स्पष्ट दिसून येतो. तरी न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा आदी दर्शनांमध्ये भेदास पारमार्थिक मानले आहे. तसेच अद्वैतवेदान्तामध्ये भेदास औपाधिक व अभेदास पारमार्थिक मानले आहे. श्रुतींनी एकदेशासच या सर्व दर्शनांतील प्रमाण म्हणून स्वीकारले आहे, म्हणून श्रुती एकदेशी म्हणून ओळखली जाते. अवस्थाभेदाने भेद व प्रभेद दोन्हींना पारमार्थिक मानून सर्व श्रुतींच्या प्रामाण्याचे प्रतिपादक असे वीरशैवदर्शन हे सर्वश्रुतिसमन्वयात्मक आहे. म्हणून उपर्युक्त षड्विध दर्शनांपेक्षा वीरशैवदर्शनाचे वैशिष्ट्य सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट आहे.

### सृष्टिसमीक्षा

प्राचीन ऋषींना जर समजून घेतले तर आपल्या लक्षात येईल की, दृश्य विचित्र विश्वाच्या सृष्टि-स्थिति-लयाच्या संदर्भात त्यांचे निरूपण एकसारखे नाही. म्हणून असे म्हणतात की, 'नैको ऋषिर्यस्य मतं न भिन्नम्।' अर्थात् त्या ऋषींच्या विविध प्राचीन सृष्टीविचारांच्या पारस्परिक विशेषांची समीक्षा केली जाते.

### सृष्टिकारणसमीक्षा

नैयायिक व वैशेषिक जगताच्या उत्पत्तीमध्ये परमाणूंना उपादानकारण मानतात, तसेच ईश्वरास निमित्तकारण समजतात. जरी पाश्चात्त्य दार्शनिकांनी परमाणुंद्वारा सृष्टीचे प्रतिपादन केले आहे तरी परमाणूंचा प्रेरक किंवा निर्माता म्हणून कोणत्याही चेतनपुरुषास त्यांनी स्वीकारले नाही. अशाप्रकारे त्यांच्या मते घुणाक्षर-न्यायाने सृष्टी होती; परंतु नैयायिकांच्या परमाणुवादात सुविचारित-रमणीयतेचे वैशिष्ट्य स्पष्ट रूपाने दिसून येते.

सांख्य व योग दर्शनांमध्ये दृश्य जगतास सुखदुःखमोहात्मक समजले जाते. म्हणून त्याचे कारणही तसेच असावे. या कारणाने सुखदुःखमोहाचे कारण सत्त्व-रजस्-तमस् यांच्या साम्यावस्था प्रकृतीस जगताचे उपादानं कारण समजले जाते. कारणातील गुण कार्यात येतात, या युक्तिपूर्ण उक्तीच्या आधारे विवेचन केल्यानंतर असे लक्षात येते की, न्यायवैशेषिकानुसार वर्णित परमाणुवादापेक्षा सांख्य-योग

दर्शनांत जी प्रकृती असे संबोधली जाते, तिला अद्वैतवेदान्तात माया, कल्पित-प्रकृती-प्रभृती शब्दांमध्ये उपयोजिली जाते. येथे फरक हा आहे - सांख्यांची प्रकृती नित्य आहे तर अद्वैताची माया अनित्य आहे. न्याय-वैशेषिक दर्शनांमध्ये परमाणूस जगताचे उपादान म्हटले आहे, तसेच सांख्य-योग दर्शनांमध्ये प्रकृतीस जगताचे उपादान संबोधले आहे. म्हणून या चौघांचे जडकारणवादाविषयी एकमत आहे.

अद्वैतवेदान्तामध्ये मायाविशिष्ट चैतन्यास जगताचे अभिन्ननिमित्तोपादान कारण म्हटले आहे. म्हणून या दर्शनापेक्षा अद्वैतवेदान्ताची उत्कृष्टता सुस्पष्ट दिसते. परंतु अद्वैतवेदान्तामध्ये ईश्वर तसेच त्यापासून उत्पन्न जगत् या दोहोंना मिथ्या समजले आहे. या सर्व दर्शनांहून विलक्षण अशा वीरशैवदर्शनामध्ये शक्तिविशिष्ट परशिवासच जगताचे अभिन्ननिमित्तोपादान कारण मानले आहे. श्रीरेणुकभगवत्पादांनी शक्तिविशिष्ट परशिवास उपादानकारण मानले आहे. तसेच

यस्मादेतत् समुत्पन्नं महादेवाच्चराचरम्।
तस्मादेतन्न भिद्येत तथा कुम्भादिकं मृदः।।
यथा तन्तुभिरुत्पन्नः पटस्तन्तुमयः स्मृतः।
तथा शिवात् समुत्पन्नं शिव एव चराचरम्।।
आत्मशक्तिविकासेन शिवो विश्वात्मना स्थितः।
कुटीभावाद्यथा भाति पटः स्वस्य प्रसारणात्।। सि.शि.१०.२, ४-५

नैयायिकादी दार्शनिकांसारखे ईश्वरास केवल निमित्तकारण मानले तर 'यथा सौम्येकेन मृत्पिण्डेन सर्वं मृण्मयं विज्ञातं स्यात्' (छां.उ. ६.१.४) श्रुतिद्वारा प्रतिपादन केलेला एकविज्ञानाचा सर्वविज्ञानसिद्धान्त सिद्ध होत नाही.

लोकव्यवहारात कुलालज्ञानाने समस्त घटादिकार्यांचे ज्ञान दिसून येत नाही. म्हणून घटासाठी मृत्पिण्डासारखे जगत-प्रपंचाप्रति उपादानकारणरूपसुद्धा मान्य आहे.

अद्वैतवेदान्तामध्ये प्रपंचास मायेचा परिणाम म्हटले आहे. याचबरोबर त्या मतामध्ये माया मिथ्या समजली आहे. म्हणून प्रपंचसुद्धा मिथ्या मानला आहे. वीरशैवदर्शनामध्ये शक्तिविशिष्ट शिव मिथ्या नाही, म्हणून सत्य आहे. त्याचा परिणाम प्रपंचसुद्धा मिथ्या नाही, तर सत्य आहे.

**प्रपंचगत तत्त्वांची समीक्षा**

प्रपंच अंतर्गत विद्यमान वस्तूंना न्याय–वैशेषिकाचार्यांनी पदार्थशब्दाने तसेच सांख्य–योग व वीरशैवदर्शनाच्या आचार्यांनी तत्त्वशब्दाचा स्वीकार केला आहे. वीरशैवदर्शन व सांख्यदर्शनामध्ये तत्त्वशब्दाची समता असूनसुद्धा तत्त्वाची परिगणना व त्याच्या स्वरूपाच्या विषयात विषमता दिसून येते. सांख्याचार्यांनी २५ तत्त्वांचा अंगीकार केला आहे, तर वीरशैव आचार्यांनी ३६ तत्त्वांचा अंगीकार केला आहे. जसे

यस्योर्मिबुद्बुदाभास: षट्त्रिंशत्तत्त्वसंचय:।
निर्मलं शिवनामानं तं वन्दे चिन्महोदधिम्।। सि.शि.१.३

सांख्यसंमत २५ तत्त्वांशिवाय अन्य ११ तत्त्वांचा सुद्धा स्वीकार वीरशैवदर्शनामध्ये केला आहे. जसे– १.शिव, २.शक्ती, ३.सदाशिव, ४.ईश्वर, ५.शुद्धविद्या, ६.माया, ७.कला, ८.विद्या, ९.राग, १०.काल तसेच ११.नियती.

सांख्यदर्शनामध्ये प्रकृती आणि पुरुषास अंतिम परमतत्त्व समजले आहे. त्याविरुद्ध वीरशैवदर्शनामध्ये प्रकृती आणि पुरुषापेक्षा सूक्ष्म ११ तत्त्वांचा अंगीकार केला आहे. याप्रकारे सूक्ष्म अतिसूक्ष्म विवेचनासंदर्भात वीरशैवदर्शनाने स्वत:चे वैशिष्ट्य प्रकट केले आहे.

एवढेच नाहीतर एकसारखी नावे असलेली २५ तत्त्वे आहेत, त्यांच्या स्वरूपामध्ये सांख्य व वीरशैवदर्शनांमध्ये काही प्रमाणात भेद आहेत. सांख्याचार्यांनी पुरुषास असंग किंवा नित्यमुक्त मानून बुद्धीमध्ये बंध व मोक्षाची व्यवस्था स्वीकारली आहे. याउलट वीरशैवदर्शनाच्या आचार्यांनी पुरुषास पंच–कंचुकांनी बद्ध मानले असल्याकारणाने संसारी समजले आहे तर कंचुकांपासून मुक्त होऊन त्याची मुक्तीची प्राप्ती प्रतिपादन केली आहे. अशाप्रकारे पुरुषास बंधसुद्धा वास्तव आहे तसेच मोक्ष आहे.

तसेच सांख्यमतानुसार प्रकृतितत्त्वापेक्षा वीरशैवमतातील प्रकृतितत्त्व विलक्षण आहे. जसे– सांख्याचार्यांनी सत्त्वादी गुणत्रयांच्या साम्यावस्थेस प्रकृती असे संबोधले आहे. याउलट वीरशैवाचार्यांनी सत्त्वादी गुणत्रयांना आश्रयभूत द्रव्यास प्रकृती असे संबोधले आहे. भाष्यकार श्रीपतिपंडिताराध्य महोदयांनी स्पष्ट केले आहे की, 'सत्त्वादी गुण, द्रव्याचे धर्म आहेत स्वत: द्रव्यस्वरूप नाही. पृथिव्यादी

द्रव्यांमध्ये उपलब्ध होणारे लघुत्व प्रकाशत्व आदींचे कारणभूत सत्त्वादी गुणसुद्धा द्रव्याच्या धर्माचे स्वभावविशेष आहेत. मृत्तिकादी कारणद्रव्याच्या घटादी कार्यांमध्ये अनुस्यूत होणारी स्थिती सत्त्वादींमध्ये नाही. म्हणून सत्त्वादींची प्रसिद्धी गुणरूपांमध्ये आहे, द्रव्यरूपामध्ये नाही. तंतुरूप यद्वत् पटरूपासाठी कारण होते, तसे पृथिव्यादीं- मध्ये विराजमान सुखादींसाठी प्रकृतीमध्ये विद्यमान सत्त्वादींची कारणता आहे. महत्‌पासून पृथिवीपर्यंत तत्त्वांचे स्वरूप सांख्य तसेच वीरशैवदर्शनामध्ये प्रायः एकसारखेच आहे.

**प्रपंचाची सत्यता व मिथ्यारूपता यांची समीक्षा**

अद्वैतवेदान्ताशिवाय सर्व दर्शनांमध्ये प्रपंचाची सत्यता स्वीकारलेली आहे. वीरशैवदर्शनात शिवापासून भूमीपर्यंत ३६ तत्त्वांचा समूह प्रपंच म्हणून संबोधला जातो. ही ३६ तत्त्वे शक्तिविशिष्ट परशिवाची विकासरूपे आहेत. म्हणून कारण सत्य असल्याने कार्यप्रपंचाचे सत्यत्व योग्य आहे, त्यात मिथ्या असे काही नाही. म्हणून या दर्शनामध्ये त्यांना पदार्थ असे न संबोधता त्यांना तत्त्व असे म्हटले आहे. तत्त्वास अनारोपित स्वरूप किंवा प्रमेचा विषय समजले आहे. या व्युत्पत्तीवर आधारलेली तत्त्वे आणि त्यांचा समूह सत्य सिद्ध आहे.

भगवत्पाद भाष्यकार श्रीपतिपंडिताराध्यांनी मिथ्यातत्त्वाच्या त्रिविध विकल्पांना प्रतिपादित केले आहे. जसे- १ मिथ्यात्वाचा अर्थ आहे असत्त्व, २. अनिर्वचनीयत्व, ३. बाध्यत्व. प्रथम पक्षात वेदाच्या अप्रामाण्याची प्रसक्ती दिसून येते. द्वितीयपक्षात मौनत्वाची प्रसक्ती दिसून येते. तसेच तृतीय पक्षात बाध्यत्वाचे दोन प्रकार परिष्कृत करण्याची शक्यता व्यक्त केली आहे. - १.बाध्यत्वाचा अर्थ आहे - त्रैकालिकनिषेधप्रतियोगित्व तसेच २. ज्ञाननिवर्त्यत्व. प्रथम प्रकार अमान्य आहे कारण प्रपंच विद्यमान आहे तसेच त्यात अर्थसिद्धी व क्रियासिद्धीची सत्ता आहे. जसे प्रपंच अनादी आहे म्हणून पूर्वकालात त्याचा निषेध शक्य नाही. हा अनुभव आहे म्हणून वर्तमानकाळात सुद्धा त्याचा प्रतिषेध करणे शक्य नाही.

प्रलयावस्थेत वेदराशी संकुचितरूपात परमेश्वरामध्ये विद्यमान असते. म्हणून प्रपंचाचा भविष्यकाळामध्ये प्रतिषेध होणे शक्य नाही.

दुसरा प्रकारसुद्धा योग्य नाही. ज्ञानी साधकास सुद्धा पूर्ववत् प्रपंचाचा भास होत असतो. सोबतच तहान व भूक यांचे ज्ञान मुक्तावस्थेत पाहता येते.

(ब्र.सू.श्रीकर.१.१.२) या प्रकारे अनेक युक्ती व प्रयुक्तीच्या द्वारे प्रपंच मिथ्या आहे याचे निराकरण करून त्याची सत्यता स्थापन केली आहे. तत्पश्चात् आगम वचनाधारे प्रपंचाच्या सत्यतेचे त्यांनी समर्थन केले आहे. जसे–

जीवः सत्यं जगत्सत्यं शिवः सत्यं स्वभावतः।
तयोरभेदः सत्यं वा क्रिमिभ्रमरयोरिव।।

प्रपंचाच्या सत्यतेचे प्रतिपादन करताना वीरशैवाचार्यांचे मत असे आहे– लोकांमध्ये ज्ञानी लोकांपेक्षा अधिक अज्ञानी आहेत. 'प्रपंच मिथ्या आहे' या वचनानुसार ज्ञानी लोक प्रपंचात आस्थेचा परित्याग करून ब्रह्मामध्ये निष्ठावान होतात. परंतु जे अज्ञानी लोक आहेत ते या वचनांचे अनुकरण करीत नित्यकर्म व नैमित्तिक कर्मांमध्ये श्रद्धारहित होऊन नास्तिक होतील. अशा अवस्थेत लौकिक जीवन आदर्शशून्य होईल. यापेक्षा– 'तथा शिवात् समुत्पन्नं शिव एव चराचरम्।' (सि.शि.१०.६) 'शिवतत्त्वात् समुत्पन्नं जगदस्मान्न भिद्यते।' (सि.शि.१०.३) या आचार्यवचनानुसार प्रपंचाची शिवरूपता प्रतिपादन केल्यावर जसे ज्ञानीजन प्रपंचात शिवत्वबुद्धी उदयास येते असे मानतात. तसे अज्ञानी लोकांमध्ये नित्य व नैमित्तिक कर्माद्वारे श्रद्धा उत्पन्न होते. याप्रकारे लौकिक जीवनसुद्धा आदर्शमय होते.

म्हणून प्रपंचाचा निषेध करून परमतत्त्वाच्या स्वरूपबोधापेक्षा प्रपंचाचे शिवरूपत्व प्रतिपादन करून परमतत्त्वाचे प्रबोधन अधिक लाभदायक आहे. म्हणून या संदर्भात वीरशैवदर्शनच अन्य दर्शनांपेक्षा प्रमुख स्थानास प्राप्त होते, हे विद्वानांच्या सहज लक्षात येते.

**बंध व मोक्ष यांच्या स्वरूपाची समीक्षा**

**साधनाची समीक्षा**

न्याय, वैशेषिक, सांख्य, योग व अद्वैत वेदान्ती यांनी ज्ञानाने मोक्षाची प्राप्ती प्रतिपादन केली आहे. मीमांसक व वीरशैव ज्ञान आणि कर्माच्या समुच्चयास मोक्षाचा हेतू मानतात. कर्मानि मोक्षप्राप्तीला सर्व दार्शनिकांचे ऐकमत्य प्राप्त होत नाही, परंतु ज्ञानाच्या मोक्षहेतुतेमध्ये कोणताही वाद नाही.

न्याय, वैशेषिक, सांख्य, योग व अद्वैतवेदान्ती यांनी स्पष्टपणे स्वीकारले आहे की १. मिथ्याज्ञानच बंधनाचे कारण आहे तसेच २. तत्त्वज्ञानच मोक्षाचा हेतू आहे.

परंतु तत्त्वज्ञानाचे स्वरूप काय आहे या प्रश्नांचे उत्तर या दर्शनांमध्ये आचार्यांनी एकसारखे सांगितले नाही.

महर्षी गौतमांनी १६ पदार्थांच्या तत्त्वज्ञानाने नि:श्रेयसाची प्राप्ती सांगितली आहे. तसेच

'प्रमाणप्रमेयसंशयप्रयोजनदृष्टान्तसिद्धान्तावयवतर्कनिर्णयवादजल्पवितण्डा-हेत्वाभासच्छल जातिनिग्रहस्थानानांतत्त्वज्ञानानि:श्रेयसाधिगम:' (न्या.सू.१.१.१). त्यानंतर यांनी १२ प्रकारच्या प्रमेयांची गणना केली आहे (न्या.सू.१.१.९). भगवान भाष्यकारांनी सर्व १२ प्रकारच्या प्रमेयांद्वारे तत्त्वज्ञानाद्वारे मोक्षप्राप्ती सांगितली आहे, 'अस्य तु तत्त्वज्ञानादपवर्गो मिथ्याज्ञानात् संसार:' (न्या.सू.भा.१.१.९). अशाप्रकारे न्यायदर्शनामध्ये आत्मप्रभृती प्रमेयांच्या तत्त्वाचे ज्ञानच तत्त्वज्ञान म्हटले जाते. अनात्मभूत शरीरादींचे आत्मेतरत्वाने तसेच आत्म्याच्या आत्मेतरभिन्नत्वाने साक्षात्कारात्मक ज्ञान तत्त्वज्ञान म्हटले जाते. परिष्कृत भाषेत समीक्षाकारांनी आत्मविश्लेषक तसेच आत्मेतरभेदप्रकारक साक्षात्काररूपाच्या ज्ञानास मोक्षाचे कारण मानले, असे वर्णन केले आहे.

वैशेषिकाचार्यांनी तत्त्वाचे लक्षण सांगत असताना- 'अनारोपितं रूपमेव तत्त्वम्।' द्रव्यगुणादी सहा पदार्थांना त्यांनी तत्त्व शब्दाद्वारे व्यक्त केले आहे. त्यातील साधर्म्य व वैधर्म्य रूपाच्या साक्षात्कारात्मक ज्ञानास तत्त्वज्ञान असे संबोधतात. हे तत्त्वज्ञान मोक्षास कारणीभूत समजले जाते. न्याय व वैशेषिक या दोन दर्शनांमध्ये तत्त्वज्ञानाची नित्यानित्यवस्तुविवेकरूपता एकसारखीच आहे.

आचार्य गौतमांनी यासारख्या तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीकरिता अनेक सूत्रांच्या आधारे श्रवणमननादींसोबत यमनियमादी अष्टांगयोगास कारण मानले आहे. 'समाधिविशेषाभ्यासात्' (न्या.सू.४.२.३८) व 'तदर्थं यमनियमाभ्यासात्मसंस्कारो योगाच्चाध्यात्मविध्युपायै:।' (न्या.सू.४.२.४६). न्यायाचार्य श्रीभासर्वज्ञ यांनी स्पष्ट केले आहे की, 'यमनियमादी योगांगाचे सेवन करावे. मुमुक्षूंच्या ठिकाणी ब्रह्मादींच्या स्थानामध्ये अनेक प्रकारच्या दु:खांच्या भावनेद्वारा अनभिरतिसंज्ञक परवैराग्य उत्पन्न होते. तसेच परशिवामध्ये पराभक्तीचा आश्रय करून अत्यंत अभिनिवेशाद्वारे योगांगाचे सेवन केले जाते. मग लगेच भगवान शिवाचे प्रत्यक्ष दर्शन होते.' (न्या.सू.पृ.३०) उपरोक्त संदर्भानुसार आचार्यांनी महर्षी कपिल यांनी

सांगितल्याप्रमाणे योगांगाच्या अनुष्ठानाचे फळ परवैराग्याची उत्पत्ती सांगितली आहे. त्यानंतर निम्नांकित श्रुतीनुसार शिवानुग्रहाच्या उदयाने मोक्षप्राप्ती होते. आचार्य भासर्वज्ञांवर शैवसंप्रदायाचा अत्यंत प्रभाव दिसून येतो. जसे–

यदा चर्मवदाकाशं वेष्टयिष्यन्ति मानवा:।
तदा शिवमविज्ञाय दु:खस्यान्तो भविष्यंति।। श्वे.उ. ६.२०

वैशेषिक दर्शनामध्ये महर्षी कणादांनी तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीकरिता निवृत्तिलक्षणधर्माचे कारण सांगितले आहे. जसे–

'धर्मविशेषप्रसूतात् पदार्थानां साधर्म्य–वैधर्म्याभ्यां तत्त्वज्ञानान्नि:श्रेयसम्।' (वै.सू.१.१.४)

नंतरच्या काळात भाष्यकार प्रशस्तपाद–'तच्चेश्वरचोदनाभिव्यक्ताद्धर्मादेव' (प्र.पा.भा. पृ.१८), व कन्दलीकार श्रीधरभट्ट–'धर्मोऽपि तावन्न नि:श्रेयसं करोति यावदीश्वरेच्छया नानुगृह्यते।' (न्या.क. पृ.१९), यांनी निवृत्तीचे लक्षण असलेल्या धर्माचे स्वरूप अचेतन असल्याने त्याची स्वत:च्या नियतविषयात प्रवृत्ति–सामर्थ्याचा अभाव असल्याने मुक्तीच्या फलाचे प्रति उन्मुखता जरी शक्य नसली तरी परमेश्वराची कृपा अपेक्षित समजली आहे. हे दोन्ही विचार भासर्वज्ञाच्या विचारसाम्यास धरून आहेत.

म्हणून श्रीरेणुकाचार्यांसारख्या विवेकी व्यक्तींनी सुद्धा शिवानुग्रहाद्वारे मोक्षप्राप्ती प्रतिपादन केली आहे म्हणून वीरशैवाचार्यांचे विचारसुद्धा उपरोक्त तीन आचार्यांच्या विचारांशी समान आहेत. जसे–

शम्भो: शिवप्रसादेन संसारच्छेदकारिणा।
मोहग्रन्थिं विनिर्भिद्य मुक्तिं यान्ति विवेकिन:।।
विना प्रसादमीशस्य संसारो न निवर्तते।
विना सूर्योदयं लोके कुत: स्यात्तमसो लय:।। सि.शि. १८.४–५

सांख्यदर्शनामध्ये बुद्धी आणि पुरुषाच्या विवकेख्यातिरूपी ज्ञानासच तत्त्वज्ञान असे संबोधले आहे. ईश्वरकृष्णाच्या कारिकेत शुद्धज्ञानाची परिभाषा केली आहे:–

एवं तत्त्वाभ्यासान्नास्मि न मे नाऽहमित्यपरिशेषम्।
अविपर्ययाद् विशुद्धं केवलमुत्पद्यते ज्ञानम्।। सां.का. ६४

मी क्रियाशून्य आहे, मी कर्ता नाही, माझे काही नाही, याप्रकारचा क्रियाभिमान, कर्तृत्व अभिमान व स्वामित्वाचा अभिमानरहित असलेले ज्ञानच शुद्धज्ञान संबोधले जाते.

योगदर्शनामध्ये श्रीमहर्षी पतंजलींनी म्हटले आहे- 'विवकेख्यातिरविप्लवा हानोपाय:।' (यो.सू. २.२६) बुद्धिपुरुषातील विवेकाच्या ख्यातीलाच तत्त्वज्ञान असे म्हणतात. सांख्य तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीला श्रवण-मनन-निदिध्यासनास मुख्य कारण मानतात. तसेच अष्टांगयोगास सहकारीकारण मानतात. त्याविरुद्ध तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीमध्ये अष्टांगयोगास मुख्य कारण मानतात- योगदार्शनिक. योगाचार्यांनी असम्प्रज्ञात समाधीच्या प्राप्तीनंतर कैवल्यप्राप्तीचा अधिकार आहे, असे म्हटले आहे. महर्षी पतंजलींनी 'समाधिसिद्धिश्वरप्रणिधानात्' (यो.सू. २.४५) सूत्राद्वारे तसेच भगवान व्यासांनी आपल्या भाष्यामध्ये प्रतिपादन केले आहे की

'प्रणिधानाद् भक्तिविशेषादावर्जित ईश्वरस्तमनुगृह्यत्यभिध्यानमात्रेण। तदभिध्यानमात्रादपि योगिन आसन्नतर: समाधिलाभ: समाधिफलं च भवतीति।' (यो.सू.भा.१.२३)

ईश्वरसंकल्पाने समाधी तसेच त्याचे फल कैवल्याची प्राप्ती होते. यामुळे सांख्यदर्शनापेक्षा योगदर्शन सेश्वरसांख्य शब्दाने ओळखले जाते.

अशाप्रकारे न्याय, वैशेषिक व वीरशैवदर्शनाप्रमाणे योगदर्शनामध्ये सुद्धा कैवल्यप्राप्तीमध्ये ईश्वरानुग्रह-सापेक्षता यांचे प्रतिपादन केले आहे. म्हणून या दर्शनांच्या विषयामध्ये विचारसाम्य स्पष्ट केले आहे.

अद्वैतवेदान्तामध्ये 'तत् त्वमसि।' इत्यादी महावाक्यांमध्ये जीव व ब्रह्मामध्ये अभेदज्ञान उत्पन्न होते. या ज्ञानास तत्त्वज्ञान असे संबोधतात. मोक्षाबद्दल या तत्त्वज्ञानास कारण मानले आहे.

सांख्याचार्यांनी 'असंगो ह्ययं पुरुष:।' (बृ.उ. ४.३.१५) या श्रुतीनुसार प्रकृती व तिचे कार्यरूप जगत् प्रपंचापासून भिन्न पुरुष या भेदाचे ज्ञानच सर्वोत्कृष्ट ज्ञान मानले आहे. तर अद्वैतवादी आचार्यांनी- 'द्वितीयाद् वै भयं भवति' या श्रुतीनुसार जीवब्रह्माचे अभेदज्ञानास सर्वोत्कृष्ट ज्ञान मानले आहे.

सांख्यसिद्धान्तामध्ये द्वैतज्ञानाने मोक्षप्राप्ती होते तर अद्वैतसिद्धान्तामध्ये अभेदज्ञानाने मोक्षप्राप्ती होते, असे स्वीकारले आहे. स्थूलरूपाने असे म्हणतात

की, ज्या भेदज्ञानाने सांख्यमत मोक्षप्राप्ती स्वीकारते तर अद्वैतमत बंधनाची प्राप्ती स्वीकारते. म्हणून या दोन्ही मतांमध्ये सामंजस्य स्थापन करणे शक्य नाही.

मीमांसादर्शनाचे भाट्ट प्रस्थान तसेच प्राभाकर प्रस्थानामध्ये नित्यनैमित्तिक कर्म, समुच्चित देहेंद्रियादीव्यतिरिक्त आत्मज्ञानास मोक्षाचा हेतू मानले आहे. तसेच 'कंदली'कार श्रीधराने सुद्धा खालील वाक्यांना प्रमाण मानून कर्मसमुच्चित ज्ञानास मोक्षाचे कारण मानले आहे. जसे-

कर्मणा सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानेनात्मविनिश्चयः।
भवेद् विमुक्तिरभ्यासात् तयोरेव समुच्चयात्।। न्या.कं., पृ.६८३-६८९

या संदर्भानुसार न्यायाचार्य श्रीमान् उदयनाचार्य म्हणतात की, 'तत्त्वज्ञानमेव निःश्रेयसहेतुः, कर्मणा त्वनुत्पन्नज्ञानस्य ज्ञानार्थिनः तत्प्रतिबन्धकाधर्मनिवारणद्वारेण प्रायश्चित्तवद् उपयुज्यन्ते। उत्पन्नज्ञानस्य त्वन्तरालब्धदृष्टेः कारीरिपरिसमाप्तिवत् प्रारब्धाश्रमधर्मसमापनं लोकसंग्रहार्थमिति युक्तमुत्पश्यामः।' (किर. पृ.१३२)

यानुसार ज्ञानोत्पत्तीपूर्वी नित्य व नैमित्तिक कर्मांच्या अनुष्ठानाने उत्पन्न होऊन सुद्धा प्राप्त झालेले ज्ञान साधकास मिथ्याज्ञानरूपी दोषांच्या अभावामध्ये त्यातून उत्पन्न राग व द्वेष यांचा अभाव झाल्यामुळे प्रवृत्तीचा सुद्धा अभाव होतो. म्हणून ही कर्मे अकारण प्रत्यवाय उत्पन्न करीत नाहीत.

जसे पावसाकरिता कारीरियज्ञ सुरू केल्यानंतर त्याच्या समाप्तीपूर्वी पाऊस आला तरी संकल्प केलेला तो यज्ञ विधिपूर्वक संपन्न केला जातो. तसेच ज्ञानाच्या उत्पत्तीकरिता जीवनातील कर्तव्यरूपी संकल्पित नित्य व नैमित्तिक कर्मांचे ज्ञानाच्या उत्पत्तीचे अनुष्ठान लोकसंग्रहाकरिता केले जाते. न्यायाचार्यांनी प्रशस्तपादीय अभिप्रायास प्रकाशित केले आहे. अशाप्रकारे ज्ञानी लोकांनी सुद्धा नित्य व नैमित्तिक कर्मांचे आचरण करणे कर्तव्य आहे. असे प्रतिपादन करणाऱ्या श्रीधरभट्टांचा आशय तार्किक आहे.

श्रीमान् उदयनाचार्यांचे विचार व वीरशैवाचार्यांच्या विचारांमध्ये साम्य दिसते. श्रीरेणुकभगवत्पादांनी ज्ञानी लोकांनी स्वीकारलेल्या नित्य व नैमित्तिक कर्मांचे फल लोकसंग्रह सांगितले आहे. तसेच

ज्ञानामृतेन तृप्तोऽपि योगी धर्मं न सन्त्यजेत्।
आचारं महतां दृष्ट्वा प्रवर्तन्ते हि लौकिकाः।। सि.शि.१६.८

श्रीरेणुकाचार्यांनी ज्ञान व कर्माच्या समुच्चयास मुक्तीचा हेतू संबोधले आहे. तसेच–

अन्धपंगुवदन्योन्यसापेक्षे ज्ञानकर्मणी।
फलोत्पत्तौ विरक्तस्तु तस्मात् तद्द्वयमाचरेत्।।
ज्ञानेनाचारयुक्तेन प्रसीदति महेश्वरः।
तस्मादाचारवान् ज्ञानी भवेदादेहपातनम्।। सि.शि.१६.११, १४

जरी याविषयी वीरशैवदर्शनाचे ज्ञानकर्मसमुच्चयवादी मीमांसादर्शनामध्ये या संदर्भात साम्य मानले तरीसुद्धा वीरशैवमतानुसार ज्ञान आणि कर्म यांच्या स्वरूपामध्ये विलक्षणता दिसून येते. मीमांसक अग्निहोत्रादी कर्म सांगतात तर वीरशैवाचार्य शिवार्चनेसच कर्म असे संबोधतात. वीरशैवमतात बाह्य यज्ञांची उपेक्षा केली आहे व शिवपूजेस कर्म संबोधले आहे.

अनित्य स्वर्गादिफल देणाऱ्या यज्ञापेक्षा शिवानंदफलदायक इष्टलिंगार्चन कर्मास श्रेष्ठ संबोधले आहे. जसे –

शिवार्चा कर्म विज्ञेयं बाह्यं यागादि नोच्यते।
किमन्यैर्धर्मकलिलैः कीकषार्थप्रदायिभिः।
साक्षान्मोक्षप्रदः शम्भोर्धर्मो लिंगार्चनात्मकः।
लिंगनिष्ठस्य किं तस्य कर्मणा स्वर्गहेतुना।
नित्यानन्दशिवप्राप्तिर्यस्य शास्त्रेषु निश्चिता।। सि.शि. १०.४-८

मीमांसाचार्यांनी नैयायिकांप्रमाणे अनात्मपदार्थापासून आत्म्याचे भिन्नत्व ज्ञान तत्त्वज्ञान म्हणून स्वीकारले आहे. परंतु वीरशैवाचार्यांनी स्वात्मा व समस्त प्रपंचास शिवस्वरूपतः अवलोकनास श्रेष्ठ ज्ञान म्हटले आहे. हाच मोक्ष प्राप्तीचा हेतू समजला जातो. म्हणून शब्दामध्ये समानता असूनही ज्ञानकर्मसमुच्चयवादी वीरशैव व मीमांसक या दोहोंमध्ये अंतर आहे.

अशाप्रकारे वीरशैवतत्त्वज्ञान व अद्वैतवेदान्ताच्या तत्त्वज्ञानात समानता मानली जाते. अद्वैतवेदान्तामध्ये 'सर्वं खल्विदं ब्रह्म'– श्रुतिप्रवाहामध्ये सर्व प्रपंचाची ब्रह्मरूपता प्रतिपादन केली आहे. तसेच 'अयमात्मा ब्रह्म।' 'तत् त्वमसि' इत्यादी महावाक्यांद्वारा जीवाची ब्रह्मरूपता प्रतिपादन केली आहे. ती वीरशैवसिद्धान्ताच्या अविरुद्ध आहे. तसेच उभय दर्शनांची मूलभूत वैशिष्ट्ये समान आहेत. संपूर्ण

प्रपंचास ब्रह्मरूपी जाणून सुद्धा वेदान्ती लोक प्रपंचास काल्पनिक मानतात. म्हणून बाधा-सामान्याधिकरणाद्वारा प्रपंचाची ब्रह्मरूपता प्रतिपादन केली आहे. वीरशैवदर्शनामध्ये प्रपंचबाधेशिवाय त्याची परशिवरूपता मानली जाते. जसे-

पत्रशाखादिरूपेण यथा तिष्ठति पादपः।
तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।। सि.शि.१०.९

या श्लोकाची व्याख्या पदवाक्यप्रमाणविज्ञ श्रीमरितोंटदार्य महोदय म्हणतात- 'तत्र परशिवस्य धृत्या धरणिः, करुणया जलम्, उज्ज्वलतया तेजः, परमानन्दस्पन्देन वायुः, चिद्-व्याप्त्या व्योम, चितिसंकोचचित्तविशिष्टो जीव इति विवेकः।' (सि.शि.१०.९, तत्त्वप्रदीपिकाव्याख्या, पृ.१८९). परशिवाच्या अनंतशक्ती पृथिवी आदी रूपामध्ये परिणत होतात. येथे अद्वैतवेदान्ताप्रमाणे प्रपंचाची अधिसत्ता मानून त्यास मिथ्या समजले नाही, याउलट प्रपंचास शिवाचा अवयव मानून तो सत्य आहे असे मानले आहे.

उपरोक्त प्रकारे विश्लेषण केल्यानंतर लक्षात येते की, न्याय, वैशेषिक, सांख्य, योग तसेच मीमांसा दर्शनांमध्ये स्वीकारलेल्या तत्त्वज्ञानात अनात्म पदार्थाहून आत्म्याचे पार्थक्य सांगितले आहे. येथे परमतत्त्वाचा अभेद स्वीकारला नाही. अद्वैतवेदान्तामध्ये आत्म्याचा ब्रह्मासह अभेद सांगितला आहे. म्हणून तत्त्वज्ञानापेक्षा जीवब्रह्मभेदज्ञान विशेष आहे. वीरशैवदर्शनामध्ये तत्त्वज्ञानाने प्रपंचबाधाशिवाय जीव आणि प्रपंचाची सुद्धा परशिवरूपता स्वीकारली आहे. म्हणून वीरशैवदर्शन अद्वैतवेदान्ताहून विशिष्ट आहे.

### मुक्तिस्वरूपाची समीक्षा

येथे एक जिज्ञासा उदित होते, जीव मुक्त झाल्यावर सर्वप्रकारच्या दुःखातून निवृत्त होतो? किंवा दुःखनिवृत्तीसह आनंदाची अनुभूती होते? याचे समाधान असे आहे की, काही दर्शनाचार्य दुःखाभावपक्षाचे प्रतिपादन करतात तर काही आचार्य आनंदानुभूती पक्षाचे प्रतिपादन करतात. काही आनंदानुभूतिसमर्थक दुःखनिवृत्तीस सुद्धा स्वीकारतात म्हणून दुःखनिवृत्तीच्या विषयी सर्व आचार्यांचे एकमत आहे असे दिसते.

न्यायदर्शनामध्ये २१ प्रकारच्या दुःखाच्या आत्यंतिक निवृत्तीस मुक्ती असे म्हणतात.

वैशेषिक दर्शनामध्ये आत्म्याच्या विशेष गुणविच्छेदास मुक्ती असे संबोधले आहे. या दोन्ही दर्शनांमध्ये आत्मा स्वरूपत: पाषाणवत् जड मानला आहे. जेव्हा त्या आत्म्याचा प्राणासह, शरीर, इन्द्रियांसह मनाचा संयोग होतो तेव्हा त्या आत्म्यामध्ये सुख, दु:ख, इच्छा, द्वेष, कर्तृत्व व भोक्तृत्वप्रभृती धर्म व ज्ञानाची उत्पत्ती होते. मुक्तावस्थेमध्ये त्याचा मनासह संयोग होत नाही तर त्या आत्म्यामध्ये कोणताही धर्मांची किंवा गुणांची उत्पत्ती होत नाही. अशाप्रकारे तो आत्मा निर्विकार भावाने जडस्वरूपात राहतो.

म्हणून न्याय व वैशेषिक दर्शनांमध्ये मोक्ष भावरूप नसतो, तर अभावरूप असतो. मुक्त झालेला जीवात्मा कोणताही पदार्थ प्राप्त करीत नाही, परंतु त्याच्या सर्वाधिक दु:खांची निवृत्ती होते किंवा सर्व विशेषगुणांचा उच्छेद होतो. म्हणून महर्षी गौतमांनी मोक्षस्वरूपाचे प्रतिपादन करण्याकरिता सूत्र निर्माण केले आहे–

'तदत्यन्तविमोक्षोऽपवर्ग:' (न्या.सू.१.१.२२)

तसेच महर्षी कणादाचे सूत्र आहे–

'तदभावे संयोगाभावोऽप्रादुर्भावश्च मोक्ष:' (वै.सू.५.२.१८)

आलोचकांचा आक्षेप आहे की, मुक्तावस्थेमध्ये आनंदाची अनुभूती होत नाही म्हणून न्यायवैशेषिकांना मान्य मुक्तीस पुरुषार्थ म्हणता येणार नाही. श्रीमल्लिषेणसूरिनी स्पष्ट म्हटले आहे की, 'यदि तु जड: पाषाणनिर्विशेष एव तस्यामवस्थायामात्मा भवेत्, तदलमपवर्गेण। संसार एव वरमस्तु, यत्र तावदन्तरान्तरापि दु:खकलुषितमपि कियदपि सुखमनुभुज्यते। चिन्त्यतां तावत् किमल्पसुखानुभवो भव्य उतसर्वसुखोच्छेद एव।' (स्या.मं. पृ.६३). अर्थात् दु:खासह सुखाच्या सुद्धा आत्यन्तिक निवृत्तीस मोक्ष असे मान्य करणाऱ्या न्यायवैशेषिकांच्या मुक्तीपेक्षा सांसारिक जीवन सुखकारक आहे, त्यात थोडेतरी सुख प्राप्त होते. हा एक सामान्य तर्क आहे. मुक्तास आनंदधाम असलेल्या गोलोकाची प्राप्ती होते. वैष्णवांचे मत आहे की, वैशेषिकांच्या मुक्तीपेक्षा आनंदधाम वृंदावनात शृगालाचा जन्मसुद्धा श्रेष्ठ समजला जातो. जसे–

वरं वृन्दावने रम्ये शृगालत्वं वृणोम्यहम्।
वैशेषिकोक्तमोक्षात्तु सुखलेशविवर्जितात्।।

कवीतार्किकचक्रवर्ती श्रीहर्षाने शिलाकल्पाने मुक्तीचा उपदेश करणाऱ्या मुनींना अतिशयेन गौ: गौतमाची (नै.च. ७.७५) व्युत्पत्ती देणाऱ्या नावाने निंदा केली आहे.

वर्तमान शरीर पडल्यावर दुसरे शरीर प्राप्त होणे म्हणजे मोक्ष आहे हे म्हणणे चार्वाकाच्या 'मरणं मोक्षः।' या उक्तीसमान आहे. चार्वाकाच्या मते मरण मोक्ष आहे, पुरुषार्थ नाही. न्याय, वैशेषिक दर्शनांतील तत्त्वज्ञानात मुक्तीची प्राप्ती सांगितली आहे, म्हणून त्यांची मुक्ती पुरुषार्थ संबोधिली जाते. अशाप्रकारे मुक्तावस्थेमध्ये आनंदाचा प्रतिषेध केल्यानंतर आलेल्या आक्षेपांच्या निराकरणासाठी नैयायिक भासर्वज्ञांनी मुक्तीमध्ये नित्यसुखाभिव्यक्ती स्वीकारली आहे. तसेच-

'नित्यसंवेद्यमानेन सुखेन विशिष्टाऽत्यन्तिकी दुःखनिवृत्तिः पुरुषस्य मोक्षः।' (न्या.सा. पृ.३२)

याचा अर्थ असा आहे - 'आनन्दं ब्रह्मणो रूपं तच्च मोक्षोऽभिव्यज्यते।', 'विज्ञानमानन्दं ब्रह्म' (ब्र.उ. ३.९.२४) या श्रुतीनुसार मुक्तिदशेमध्ये आनंदाभिव्यक्तीचे प्रतिपादन केले. म्हणून प्रमाणान्तराद्वारे मुख्यार्थबाध होत नाही म्हणून उपचाराची कल्पना अयोग्य आहे.

याशिवाय हे लक्षात घेण्यासारखे आहे- न्यायवैशेषिकांच्या मताने परमाणू नित्य आहे. परमाणुरूप मनस् सुद्धा नित्य असल्यामुळे मुक्तावस्थेमध्ये त्याचा ध्वंस मान्य केलेला नाही. निष्कल असल्यामुळे त्याचा ध्वंस शब्दाने व्यपदेश केला आहे.- एकविंशतिदुःखध्वंसो मोक्षः। मुक्तिदशेत आत्म्याशी संयुक्त असलेले मन सुखादिकांच्या उत्पत्तीमध्ये साधन होत नाही. कारण असे आहे की- सुखादींच्या उत्पत्तीमध्ये अदृष्टसहकृत आत्मा मनःसंयोगास कारण मानत नाही. म्हणून मुक्तावस्थेमध्ये आत्मस्वरूप अधिकरणामध्ये अदृष्टाचा सद्भाव होत नाही म्हणून निरदृष्ट आत्म्याशी संयुक्त होणारे मनसुद्धा उदासीन असते.

प्राभाकर सिद्धान्तामध्ये नैयायिकसम्मत आत्मस्वरूप किंवा मुक्तिस्वरूप अभिमत आहे. नैयायिकांबद्दल घेतलेला आक्षेप प्राभाकरांच्या बाबतही घ्यावा लागेल. भट्ट अनुयायांचे मुक्तीविषयी एकमत नाही.

नारायण भट्ट यांनी मुक्तीमध्ये नित्यसुखाची अभिव्यक्ती स्वीकारली आहे. जसे-

दुःखात्यन्तसमुच्छेदे सति प्रागात्मवर्तिनः।
सुखस्य मनसा मुक्तिर्मुक्तिरुक्ता कुमारिलैः।। मा.मे. पृ.२०१

तो नित्यसुख संसारदशेमध्ये अव्यक्त असतो तसेच मुक्तावस्थेत अभिव्यक्त

होतो. हे नित्यसुख आत्म्यापेक्षा वेगळे नाही तर आत्मस्वरूप आहे. जसे मनाशिवाय नित्यसुखाचा उपभोग घेता येत नाही म्हणून श्रीनारायण भट्टांनी मुक्तावस्थेत स्थायी सुखाच्या अनुभूतीचे कारण म्हणून नित्यमनाचा स्वीकार केला आहे.

भट्टानुयायी श्रीपार्थसारथी मिश्र यांनी आपले मत व्यक्त करीत असताना म्हटले आहे- अत: प्रमाणान्तरवशादानन्दवचनं दु:खाभावपरम्, इतरत्तु यथाश्रुतिमिति न्याय्यम्। तस्मात् सुखदु:खादिसमस्तवैशेषिकात्मगुणोच्छेदो मोक्ष:।' श्रीमिश्रांनी नित्य सुखाच्या प्राप्तीचे प्रतिपादन करणाऱ्या वचनांचा अर्थ दु:खाभाव मानला आहे. म्हणून या मतानुसार मुक्ताचे अत्यन्तदु:खोच्छेदमात्र प्रतिपादन केले आहे. कुमारिलभट्टांचे अनुयायी नारायणभट्टांनी नित्यसुखाच्या अभिव्यक्तीस मुक्ती सांगून आत्मस्वरूप मानले आहे. म्हणून त्याची ही कल्पना अद्वैतवेदान्तसिद्धान्ताशी समान आहे. येथे एवढाच भेद आहे की, अनित्य वैशेषिक सुखाच्या अनुभवाकरिता मनाची सापेक्षता हवी आहे, तसेच आत्मस्वरूप असूनही नित्यसुखाच्या अनुभूतीकरिता नित्यमनाची आवश्यकता नारायण भट्टांनी सांगितली आहे. म्हणून हा वेदान्तसिद्धान्तापेक्षा स्वत:स भिन्न सिद्ध करतो; कारण अद्वैतवेदान्तामध्ये मुक्तावस्थेतील आत्म्यापेक्षा अन्य सर्वांचा निषेध केला आहे.

सांख्य-योगदर्शनांमध्ये प्रकृती आणि पुरुषांच्या संयोगास बंधन असे संबोधिले आहे. त्यांच्या वियोगास मुक्ती असे म्हटले आहे. येथे संयोग आणि वियोग शब्दांद्वारे दोन मूर्त द्रव्यांचा स्वाभाविक संयोग किंवा वियोग अपेक्षित नाही. येथे संयोग शब्दाची परिभाषा- पुरुष व प्रकृती यांची भोक्तृभोग्यभावापत्ती होय, तर वियोग शब्दाची परिभाषा- विवेकख्यातीने भोक्तभोग्यभावाची निवृत्ती होय. अशाप्रकारे सुस्पष्ट आहे की सांख्यदर्शनांमध्ये पुरुषाचा बंधनमोक्ष वास्तविक नाही तर केवळ औपचारिक आहे. वास्तविक या दर्शनांमध्ये बुद्धीमध्ये बन्ध आणि मोक्ष यांची स्थिती व्यक्त केली आहे. जसे -

तस्मान्न बध्यतेऽद्धा न मुच्यते नापि संसरति कश्चित्।
संसरति बध्यते मुच्यते च नानाश्रया प्रकृति:।। सां.का. ६२

सांख्य-योग दर्शनांमध्ये मुक्त पुरुषास सर्वप्रकारच्या औपाधिक संबंधापेक्षा बाजूला ठेवून स्फटिकाप्रमाणे स्वरूपामध्ये व्यक्त केले आहे. जरी न्याय-वैशेषिकांच्या द्वारे मुक्तात्म्याची केवलस्थितीच स्वीकारली आहे परंतु ती जडस्वरूप आहे, परंतु

सांख्यानुसार आत्मस्थिती चिद्रूपा आहे. हा या दोन सिद्धान्तांमध्ये भेद आहे.

दुसरीकडे सांख्य-योगदर्शनांमध्ये जसे पुरुषास नित्यमुक्त स्वीकारले आहे तसे अद्वैतवेदान्तामध्ये सुद्धा आत्मा नित्यमुक्तच आहे. वेदान्तसिद्धान्तामध्ये सुद्धा आत्मप्रतिबिम्बविशिष्ट बुद्धीमध्येच बंध व मोक्ष यांचा व्यवहार होतो. जसे सांख्यसिद्धान्तामध्ये आनंदास सत्त्वगुणाचा परिणाम मानले आहे जो स्वत: प्रकृतीचा धर्म आहे. म्हणून मुक्तास आनंदरूप मानता येत नाही.

अद्वैतवेदान्तामध्ये सुखाचे दोन भेद आहेत- नित्यसुख व अनित्यसुख. मुक्तावस्थेत नित्य वैषयिक आनंदाचा अभाव असताना सुद्धा नित्य आत्मस्वरूपी आनंदाची अभिव्यक्ती स्वीकारली आहे. सांख्यापेक्षा अद्वैतवेदान्ताचे हे वैशिष्ट्य आहे.

निष्कर्ष हा आहे की, न्याय, वैशेषिक तसेच प्राभाकरमीमांसा दर्शनाच्या आचार्यांनी मुक्तात्म्यास केवळ सद्रूप मानले आहे. सांख्य-योग दर्शनाच्या आचार्यांनी मुक्तात्म्यास सद्रूपासह चिद्रूप म्हणूनही स्वीकारले आहे. भाट्टमीमांसा व अद्वैतवेदान्त-दार्शनिकांनी मुक्तात्म्यास सच्चिदानंद रूपामध्ये स्वीकारले आहे. आधुनिक आलोचकांनी मुक्तिस्वरूप विषयामध्ये न्याय-वैशेषिकापासून अद्वैतवेदान्तापर्यंत क्रमश: विकासवादास स्वीकारले आहे. पूर्ण विकसित स्वरूप अद्वैतवेदान्तामध्ये स्वीकारले आहे. (भारतीय दर्शन में मोक्षचिंतन, पृ.१२६-१२७) या उक्तीनुसार विचार केल्यास वीरशैवमताने मोक्षस्वरूपास पूर्णपणे विकसित मानता येते. कारण या दर्शनामध्ये मुक्तावस्थेमध्ये जीवात्मा परशिवासह अभेदास प्राप्त करतो. ती स्थिती म्हणजे सच्चिदानंदस्वरूप स्थिती होय. जसे-

मुक्तिरेव परा तृप्तिः सच्चिदानन्दलक्षणा।
नित्यतृप्तस्य मुक्तस्य किमन्यैर्भोगसाधनैः।। सि.शि. १८.६

मुक्तात्म्याच्या सच्चिदानंदरूपासंबंधी वीरशैवदर्शनाचे अद्वैतवेदान्ताशी साम्य आहे. परंतु कित्येक वैशिष्ट्यांमुळे वीरशैवदर्शनाबाबत परिशीलन आवश्यक आहे.

अद्वैतवेदान्त आणि वीरशैवदर्शनामध्ये मुक्तात्म्या सह अभेद मानला जातो. दोन्ही दर्शनांमध्ये मुक्ताची सर्वदु:खनिवृत्तीसह परमानन्दाची प्राप्ती स्वीकारली आहे. या दोन दर्शनांमध्ये भेद एवढाच आहे की, अद्वैतवेदान्ती संसारावस्थेमध्ये प्रतीत होणाऱ्या जीवब्रह्मभेदास कल्पित मानतात, परंतु वीरशैव त्यास सत्य

मानतात. भेदाची सत्यता असूनही अभेदाचा स्वारसिक आनंद आहे. जसे ज्याने पूर्वी कष्ट सहन केले आहेत तसे त्यांना नंतर आनंदाची अनुभूती होते. त्याप्रमाणे वस्तुत: परमात्म्यापेक्षा भिन्न जीवास अभेदप्राप्ती झाल्यास अद्वैतानंदाची प्रतीती होते. अद्वैताचार्यांनी व्यावहारिक भेदास स्वीकारून अभेदाची व्यवस्था केली हे योग्य नाही. भेदास पारमार्थिक समजल्यास दोष नसल्याने त्यास व्यावहारिक समजणे उचित नाही.

आता ही जिज्ञासा आहे की, जीव परमार्थत: परशिवाशी भिन्न आहे तर या दोघांमध्ये अभेद कसा असू शकतो? याचे समाधान रहस्यात्मक आहे. 'यथा नद्य: स्यन्दमाना: समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय। तथा विद्वान्नामरूपाद् विमुक्त: परात्परं पुरुषमुपैति दिव्यम्।' (मुं.उ. ३.२.८) या श्रुतीमध्ये नदीसमुद्र दृष्टान्ताने जीवाची मुक्ती प्रतिपादन केली आहे तसेच समुद्राचे पाणी मेघांद्वारे वर्षाव केल्यानंतर नदीरूपाने प्रवाहित होते, तसेच शक्तिसंकोचरूपी त्रिविधमलाचे आवरण असल्यामुळे शिवांशास जीवत्वाची प्राप्ती होते. जसे नदी आणि समुद्र यात स्वाभाविक भेद आहे तसे जीव व परशिवामध्ये भेद सत्य आहे. समुद्रापासून भिन्न असूनही नदी जेव्हा सागरामध्ये प्रवेश करते तेव्हा नदीचे नदीत्व निवृत्त होते. तसे परशिवाशी भिन्न जीव मुक्तिदशेमध्ये परशिवासह एकीभूत होऊन स्वजीवत्वाचा त्याग करून परशिवत्वास प्राप्त करतो. श्रुतिप्रोक्त हा दृष्टान्त संसारावस्थेमध्ये जीव व शिवाच्या भेदाची सत्यता प्रतिपादन करीत असा वीरशैवदर्शनामध्ये अभेदाशी समन्वय साधला आहे, अद्वैतदर्शनामध्ये नाही.

अद्वैतवेदान्तामध्ये जीवभाव मिथ्या आहे तसेच नामरूपादी सुद्धा मिथ्या आहे. म्हणून 'नामरूपे विहाय' हे श्रुतिकथन अद्वैतवेदान्तामध्ये समाविष्ट नाही. हान तर सत्याचेच होते. मिथ्यावस्तूची निवृत्ती होते हान नाही. 'विहाय' शब्दाची लक्षणावृत्तीने निवृत्तीचा अर्थ अस्वारसिक आहे. अद्वैतवेदान्तामध्ये भेद औपाधिक असून श्रुतीने सांगितलेला नदी-समुद्र दृष्टान्त उपयुक्त नाही हे मात्र स्पष्ट आहे. श्रुतिप्रमाणे आगमवचनाने सत्य भेदाचे हानच मुक्तिदशेमध्ये निरूपित केले आहे. जसे-

कीटो भ्रमरयोगेन भ्रमरो भवति ध्रुवम्।
मानव: शिवयोगेन शिवो भवति सर्वदा।। श्री.भा. १.२.६

अर्थात् भृंगापासून भिन्न कीट नित्य भृंगाचे चिंतन करून कीटाकार व कीट-

स्वभावाचा परित्याग करून भ्रमराकृती व भ्रमरस्वभावास प्राप्त करतो. याशिवाय भ्रमरत्वास प्राप्त झालेला जीव-कीट, पुन्हा कीट होत नाही. त्याप्रमाणे अनादिकालापासून अनादिमलावरणाद्वारे परशिवापेक्षा भिन्न असलेला जीव सतत 'शिवोऽहम्'च्या ध्यानाने शिवरूप होतो.

याशिवाय रससंपर्काच्या सामर्थ्याने ताम्राचे सहज ताम्रत्व नष्ट होते तसेच सुवर्णत्व प्राप्त होते. तसेच सत्य जलच स्वाती नक्षत्रावर शिंपल्यात प्रवेश करून तत् संबंध सामर्थ्याने सहज असा जलभाव सोडून तो अनर्घमुक्ताकृतीस धारण करतो तसेच तो पुन्हा जलरूपामध्ये परत येत नाही. अशाप्रकारे लोकव्यवहारामध्ये जडपदार्थांमध्ये असाधारण वस्तूच्या संपर्काने सत्यस्वभावाची निवृत्ती पाहावयास मिळते- हा सर्वानुभवसिद्ध होय.

तेव्हा अघटितघटनासमर्थ परशिव स्व-उपासनेत मग्न असलेल्या जीवाच्या शक्तिसंकोचरूप स्वाभाविक मलाचा परिहार करून निजस्वरूपामध्ये विलीन होऊन ऐक्य दानाने अनुगृहीत करतो यात आश्चर्य ते काय?

म्हणून अभेदबोधाच्या प्रती प्रकारतावच्छेदक व विशेष्यतावच्छेदक धर्मांचा भेद समजला जातो. जसे 'नीलो घटः' वाक्याने नीलाभिन्नो घटः या अभेद बोधाची उत्पत्तीच्या प्रती नीलत्व एवम् घटत्व धर्मांच्या भेदास कारण समजले जाते. तसेच 'तत्त्वमसि' व 'जीवस्तु परमः शिवः।' या वैदिक व लौकिक वाक्यांपासून उत्पन्न अपरोक्षबोधामध्ये प्रकारतावच्छेदक व विशेष्यतावच्छेदक धर्मांचा भेद कारण होतो. हा कार्यकारणभाव भेद व अभेद हे पारमार्थिक असल्याने युक्तिसंगत होय. शिवाय 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः।' या मायावादामध्ये स्वीकारलेल्या जीवमिथ्यात्व व जगन्मिथ्यात्व पक्षामध्ये समानप्रत्यासक्तीने प्रकारतावच्छेदक व विशेष्यतावच्छेदक धर्मांमध्ये भेद होत नाही म्हणून अभेदबोध प्रतिकूल होतो, त्याप्रमाणे मायावादामध्ये 'जीवो ब्रह्मैव' या वाक्याने अवधारणवचनाने जीवाच्या मिथ्यात्वाचा अंगीकार केल्याने जीवामध्ये ब्रह्मबुद्धी असल्याने 'ब्रह्म ब्रह्मैव।' या वाक्यानुसार येथे सुद्धा प्रकारतावच्छेदक व विशेष्यतावच्छेदक धर्मांमध्ये भेद नसल्याने जीव व ब्रह्मामध्ये अभेदबोधाची प्रतिकूलता अनिवार्य आहे. म्हणून 'यथा नद्यः स्यन्दमानाः..।' (मुं.उ. ३.२.८) इत्यादी श्रुतीनुसार प्रबोधित सूक्ष्म-स्थूल-शक्तिरूप प्रकारतावच्छेदक व विशेष्यतावच्छेदक धर्मांच्या तात्त्विक भेदास

स्वीकृत स्वशक्तिविकासवशात् नामरूपी मुक्तदशेमध्ये जीवाचे परशिवासह सामरस्य प्रतिपादन करण्याकरिता शिवाद्वैत सिद्धान्त हा सोपा राजमार्ग आहे.' (शि.प., पृ.५५-५६) या आशयाचे प्रकाशन पूवल्लीबृहन्मठीय श्रीनीलकण्ठशिवाचार्यजींनी केले आहे. याप्रकारे वीरशैवदर्शनाचे वैशिष्ट्य व्यक्त केले आहे.

भगवत्पाद श्रीपतिपंडिताराध्यांनी खालील संदर्भवाक्यांद्वारा सत्यक्रिमीद्वारा सत्यभ्रमराकृतिप्राप्तीप्रमाणे सत्यजीवाच्या बंधाच्या निवृत्तीद्वारे सत्यशिवत्वाची प्राप्ती शक्य आहे, असा निर्णय प्रस्तुत करून सत्यबंधनाच्या ज्ञानापासूननिवर्तनाची युक्ती सुद्धा दर्शविली आहे. जसे-

'तस्मादात्यन्तिकपाशनिवृत्ति...पूर्वपक्षस्य च सिद्धान्तेन निवृत्तिदर्शनात्।'

सर्व दार्शनिक सिद्धान्तांचा सर्वंकष विचार केल्यानंतर लक्षात येते की, न्याय, वैशेषिक, सांख्य, योग व पूर्वमीमांसा दर्शनाचार्यांनी मुक्तावस्थेत परमतत्त्वासह अभेद प्रतिपादन केलेला नाही तसेच उपक्रमोपसंहार आदींबाबत विचार न करता द्वैतश्रुतींच्या प्रामाणिकतेचे प्रतिपादन केले आहे. तर अद्वैतश्रुतींची उपचारार्थता सांगितली आहे.

दुसरीकडे अद्वैत श्रुतींच्या प्रामाणिकतेचे अभिधान करीत असताना अद्वैत वेदान्ती द्वैतश्रुतींची गौणार्थता सांगत असते. म्हणून द्विविधदार्शनिक श्रुत्येकदेशी म्हणून ओळखले जातात. याउलट वीरशैवदर्शनामध्ये बद्धावस्थेत द्वैताचा अंगीकार व मुक्तावस्थेत अद्वैताचा अंगीकार केला आहे. परिणामस्वरूप सर्वश्रुतींचा समन्वय या वीरशैवदर्शनामध्ये सामावलेला आहे.

मुक्तिसोपान-षट्स्थलातील भक्तस्थल व माहेश्वरस्थलामध्ये भेदभावना, प्रसादिस्थल व प्राणलिंगिस्थलात भेदाभेदभावना तर शरणस्थल व ऐक्यस्थलामध्ये अभेदभावना आत्मसात करून परशिवाची उपासना करणारा साधक शिवप्रमातृभावामध्ये प्रतिष्ठित होतो. याप्रमाणे प्रतिपादनपाटव प्रवीण वीरशैवदर्शनद्वैतश्रुती, द्वैताद्वैतश्रुती व अद्वैतश्रुतींचा समन्वय होतो.

## जीवन्मुक्तिसमीक्षा

शरीराचा प्राणादीशी संबंध असताना मुक्त होण्यास जीवन्मुक्त असे म्हणतात. ही अवस्था न्यायवैशेषिक दर्शनांमध्ये स्वीकारली नाही. कारण त्यांच्या मते २१

प्रकारच्या दुःखध्वंसास मुक्ती असे संबोधतात. म्हणून २१ दुःखामध्ये एका शरीराची सुद्धा गणना होते म्हणून शरीर असताना मुक्ती शक्य नाही तर जीवन्मुक्ती कशी काय होऊ शकते? म्हणून जीवन्मुक्तीमध्ये शरीरप्राणादींची स्थिती इच्छिलेली आहे म्हणून सूत्रकार व भाष्यकारांनी जीवन्मुक्तीस स्वीकारले नाही. 'न्यायवार्तिक'कार श्रीभारद्वाज उद्योतकरांनी (न्या.सू.वा. १.१.१) तसेच वृत्तिकार विश्वनाथांनी (न्या.सू.वा. १.१.१) सुद्धा जीवन्मुक्ती स्वीकारली आहे. उद्योतकराने उद्‌घोष केला की जीवन्मुक्त स्वीकारला नसेल तर शास्त्रसंप्रदायाचा विच्छेद होईल. शास्त्र तेच आहे जे तत्त्वद्रष्ट्याद्वारे साक्षात्कृत व्हावे किंवा त्याचे धूर्तप्रणीतत्त्व होणे अशक्य असेल तर ते अप्रमाण होईल. म्हणून त्यांनी जीवन्मुक्तीस स्वीकार्य संबोधले आहे तर जीवन्मुक्तांद्वारे रचलेल्या शास्त्रांना प्रामाण्य म्हणून स्वीकारले आहे. वृत्तिकार विश्वनाथाने सुद्धा उद्योतकराप्रमाणे जीवन्मुक्तीचे समर्थन केले आहे. यावरून हे लक्षात येते की उत्तरकालावधीत सिद्धान्ताचे विवेचन अत्यंत मनोज्ञ झाले आहे.

सांख्य व योग दर्शनांमध्ये नास्मि, नाऽहम्, न मे अशाप्रकारे तत्त्वज्ञानाने मुक्तीची प्राप्ती विशद केली आहे. हे ज्ञान जीवनकाळात पुरुषास अलंकृत करते, म्हणून या दोन्ही दर्शनांमध्ये जीवन्मुक्ती सर्वथा स्वीकार्य आहे. ईश्वरकृष्णाने स्पष्ट केले आहे की-

सम्यग्ज्ञानाधिगमाद् धर्मादीनामकारणप्राप्तौ।
तिष्ठति संस्कारवशात् चक्रभ्रमिवद् धृतशरीरः।। सां.का. ६७

मीमांसाचार्यांनी त्रिविध बंधनाचा स्वीकार करीत असताना १. भोगायतन शरीर, २. भोगसाधन इन्द्रियवर्ग तसेच ३. भोग्य शब्दादी विषय. या संबंधाने आत्मा हा बद्ध होतो तर संबंधाचा विलय झाल्याने तो मोक्षास प्राप्त होतो. त्यानुसार मीमांसादर्शनामध्ये सुद्धा शरीरसंबंध सापेक्ष जीवन्मुक्तीमध्ये मुक्तिरूपाने अंगीकारली आहे.

अद्वैतवेदान्तामध्ये तत्त्वज्ञानाने अविद्येचा विलय झाल्यावर सुद्धा क्षालित-लशुनभाण्डामध्ये अनुवृत्त लशुनवासनाकल्प अविद्यासंस्काराचे अनुवर्तन अप्रतिषिद्ध राहते. या संस्काराद्वारेच मुक्तीच्या देहादींची अनुवृत्ती होते. किंवा तत्त्वज्ञानाद्वारे

अविद्येच्या आवरणांशाचा नाश झाल्यावर सुद्धा विक्षेपांशाचे अनुवर्तन प्रतिषिद्ध होत नाही. म्हणून शरीरादींची अनुवृत्ती तशीच राहते. म्हणून जीवन आणि मोक्ष या दोहोंचे सामंजस्य उपपन्न होऊन सुदृढतेने जीवन्मुक्ती स्वीकारली आहे.

अर्थात् अद्वैतवेदान्तानुसार शरीरादींच्या संबंधमात्राने आत्म्याचे बंधन होत नाही किंवा संबंधविरहमात्राने आत्म्याची मुक्ती होत नाही. या शरीरादींसोबत ममत्व होणे बंधन होय तर ममत्वाभिमानरहित होणे म्हणजे मुक्ती होय. जसे-

द्वे पदे बन्धमोक्षाय ममेति निर्ममेति च।
ममेति बध्यते जन्तुर्न ममेति विमुच्यते।। कुला.१.१११

अशाप्रकारे तत्त्वसाक्षात्कारी सिद्ध शिवयोगी शरीराशी संबधित असून सुद्धा शरीरादींमध्ये ममत्वबुद्धीची निवृत्ती करून जीवन्मुक्त होऊन अनुग्रहमूर्तिरूपाने लोकपूजित होतो. किंवा नाहम्, न मे, नास्मि ची अभिमानशून्यताच तत्त्वज्ञान आहे. या मताचे अनुसरण करीत असलेल्या सांख्य न्यायामध्ये जीवन्मुक्तीची संभावना निरस्त केली जाते.

वीरशैवदर्शनामध्ये शिवज्ञानसंपन्न साधक जेव्हा संपूर्ण जगतास शिवमय पाहतो तसेच अहंकार आणि ममकाराने रहित होऊन सुद्धा जीवन्मुक्तीस प्राप्त करतो.

अद्वैतवेदान्तामध्ये तत्त्ववेत्ता सर्वप्रपंचाची मिथ्यात्वबुद्धीद्वारे ममकार शून्य होतो. परंतु वीरशैवदर्शनामध्ये प्रपंचाचे अमिथ्यात्वाने साधक, संपूर्ण विश्वप्रपंचास शिवमय पाहतो आणि ममकारशून्य होतो. हे वीरशैवसिद्धान्ताचे वैशिष्ट्य स्तुत्य आहे. श्रीरेणुकाचार्यांच्या शब्दावलीनुसार-

स्वस्वरूपं शिवाकारं ज्योतिः साक्षाद्विचिन्तयन्।
देहवानपि निर्देहो जीवन्मुक्तो हि साधकः।। सि.शि.१६.६
गलिताहंकृतिग्रन्थिः क्रीडाकल्पितविग्रहः।
जीवन्मुक्तश्चरेद्योगी देहिवन्निरुपाधिकः।। सि.शि.१७.१३
इन्द्रियाणि समस्तानि शरीरं भोगसाधनम्।
शिवपूजांगभावेन भावयन् मुक्तिमाप्नुयात्।। सि.शि.१७.११
सर्वेन्द्रियगतं सौख्यं दुःखं वा कर्मसम्भवम्।
शिवार्थं भावयन् योगी जीवन्मुक्तो भविष्यति।। सि.शि.१७.८

उपरोक्त विवेचनावरून लक्षात येते की, तत्त्वसाक्षात्कारी साधक शिवमयदृष्टी संपन्न होऊन 'शिवात्मकमिदं सर्वम्' या भावनेने भावित होऊन स्वत:स त्याप्रमाणे संपूर्ण विश्वास शिवरूपाने पाहत जीवन्मुक्तरूपाने विलक्षण आनंदमयभावाचा अनुभव करतो. शरीरत्यागानंतर तो शिवसायुज्यास प्राप्त करून आनंदी होतो. हे वीरशैवदर्शनाचे महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य होय.

□□

आठवा परिच्छेद

# 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे विशिष्ट सिद्धान्त

पूर्वीच्या सात परिच्छेदांत ईश्वर, जीव, जगत्, बंध-मोक्ष इत्यादी दार्शनिक विषयांवर 'श्रीसिद्धान्तशिखामणी' व इतर दर्शनशास्त्रांच्या मान्यतांविषयी तुलनात्मक समीक्षा केली आहे. वर उल्लेखिलेल्या दार्शनिक सिद्धान्तांहून अतिरिक्त काही विशिष्ट सिद्धान्तांचे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये प्रतिपादन केले आहे.

परशिव व त्याचा अंशभूत असलेला जीव यांच्या अभिन्नत्वाचे प्रतिपादन हे वीरशैवदर्शनाचे मुख्य प्रयोजन आहे. म्हणून ज्ञान आणि कर्म यांचा समसमुच्चयवाद पूर्वी प्रतिपादन केला आहे. त्याव्यतिरिक्त अष्टावरण, पंचाचारादी तत्त्वे समजून घेतली पाहिजे. वीरशैवदर्शनात अष्टावरण हे साधकाची अंगे तर पंचाचार हे त्याचे पंचप्राण मानले गेले आहेत. ज्याप्रमाणे सामान्यत: जीवांचे लौकिक व्यवहार, हात, पाय हे अवयव, प्राण व शरीर यांच्याकडून होतात तसेच अष्टावरण-पंचाचारांकडून वीरशैव साधकांचे दार्शनिक व्यवहार होतात. म्हणून अष्टावरणे अंगे तर पंचाचार हे प्राणासारखे व्यवहार करतात. त्यांचे स्वरूप पाहूया.

## अष्टावरण

गुरू, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, भस्म, रुद्राक्ष व मंत्र हे अष्टावरण म्हणवितात. इतर दर्शनशास्त्रांत आवरण शब्द स्वरूपाला आच्छादन करणारे या अर्थाने वापरला जातो, पण या दर्शनात यांना रक्षाकवच मानतात. योद्धा युद्धभूमीवर शत्रूच्या शस्त्रप्रहारांपासून रक्षण करण्यासाठी चिलखत अंगात घालतो तसेच शिवभक्त साधक कामक्रोधादींपासून वाचण्यासाठी अष्टावरणांचा उपयोग करतो. 'चंद्र-ज्ञानागमा'त म्हटले आहे:-

गुरुर्लिंगं जंगमश्च तीर्थं चैव प्रसादकः।
भस्म रुद्राक्ष मंत्राश्चेत्यष्टावरणसंज्ञिताः।।
इमानि शिवभक्तानां भवदोषततेः सदा।
निवारणैककार्याणि ख्यातान्यावरणाख्यया।। २.२-३

या अष्टावरणांत गुरू, लिंग व जंगम हे तीन आराध्य (पूज्य) आहेत. विभूती, रुद्राक्ष व मंत्र हे पूजेसाठी सामग्रीरूप आहेत. पादोदक-प्रसाद पूजेची फले होत.

## १. गुरू

गुणातीतं गुकारं च रूपातीतं रुकारकम्।
गुणातीतमरूपं च यो दद्यात् स गुरुः स्मृतः।। सि.शि. १५.८

'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये वरीलप्रमाणे गुरुतत्त्वाचे स्वरूप सांगितले. अर्थात् सत्त्व, रज व तम या त्रिगुणांच्या पलीकडे असलेले म्हणून निर्गुण व निराकार असलेली चिन्मय वस्तू जो देतो तो गुरू. त्यालाच आचार्यदेखील म्हणतात. आचार्यांचे लक्षण 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये पुढीलप्रमाणे आहे:-

आचिनोति च शास्त्रार्थानाचारे स्थापयत्यपि।
स्वयमाचरते यस्मादाचार्यस्तेन चोच्यते।। सि.शि. १५.९

वीरशैवधर्मात वीरमाहेश्वर (जंगम) वर्णात जन्मलेला, कुठल्यातरी वीरशैव संप्रदायाच्या मठात आचार्य म्हणून पट्टाभिषेक झालेला, 'शिवाचार्य' उपाधीने युक्त तसेच वीरशैवागमांचे ज्ञान असलेला गुरू होय. म्हणूनच श्रीनीलकंठ शिवाचार्यांनी 'क्रियासार' ग्रंथात म्हटले आहे:-

मठस्थलसमुत्पन्नः शान्तः शैवागमार्थवित्।
अनूचानः प्रसन्नात्मा शिवदीक्षाऽभिषेचितः।। क्रि.सा. भाग ३, पृ. १३३

वीरशैवांना इष्टलिंगदीक्षा यांच्याकडूनच दिली जाते. दीक्षा घेण्यासाठी कोणत्या गुरूकडे जावे यासंबंधी 'कुलक्रमागताचारं कुमार्गाचारवर्जितं'पासून 'लिंगस्थल भेदज्ञं श्रीगुरुं शिववादिनम्'पर्यंत 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये सांगितलेली वैशिष्ट्ये ज्यात आहेत तोच गुरुत्वासाठी योग्य असे सुचविले आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे टीकाकार मरितोंटदार्यांनीसुद्धा कुलक्रमागताचारचा अर्थ गुरुवंशक्रमानुगताचारवान् म्हणजे गुरुवंशोत्पन्न (जंगमवंशोत्पन्न) यालाच गुरुपदयोग्य मानून समर्थन केले आहे.

हेच गुरू दीक्षा देतात म्हणून दीक्षागुरू, शिक्षण देतात म्हणून शिक्षागुरू व ज्ञानोपदेश करतात म्हणून ज्ञानगुरू म्हटले जातात. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हणतात:-

दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाशबंधनम्।
यया दीक्षेति सा तस्यां गुरुर्दीक्षागुरुस्मृत:।। १५.७
दीक्षागुरुरसौ शिक्षाहेतु: शिष्यस्य बोधक:।
प्रश्नोत्तरप्रवक्ता च शिक्षागुरुरितीर्यते।। १५.१२
उपदेष्टोपदेशानां संशयच्छेदकारक:।
सम्यग्ज्ञानप्रद: साक्षादेष ज्ञानगुरु: स्मृत:।। १५.२१

गुरू साधकाची योग्यता पाहून शिवस्वरूपाचा उपदेश करून संसारातून तारतात. म्हणूनच अष्टावरणात पहिल्या स्थानावर गुरू आहे. रंभापुरी, उज्जयिनी, केदार, श्रीशैल व काशी या वीरशैवांच्या पंचपीठांवरील आचार्यांना 'पंचाचार्य जगद्गुरू' म्हणतात, तेच मुख्य गुरू होत. पंचपीठांच्या शाखांवर असलेल्यांना आचार्य, उपाचार्य, पट्टाधिकारी असे म्हणतात.

## २. लिंग

लयं गच्छति यत्रैव जगदेच्चराचरम्।
पुन: पुन: समुत्पत्तिं तल्लिंगं ब्रह्मशाश्वतम्।। सि.शि. ६.३७

प्रपंचाची उत्पत्ती, पालन आणि लय यांना कारणीभूत असलेले तत्त्व म्हणजे लिंग, अशी लिंग शब्दाची व्याख्या भगवत्पाद रेणुकाचार्यांनी 'श्रीसिद्धान्त-शिखामणी'मध्ये केली आहे. परंतु येथे 'लिंग'पदाने त्या परमतत्त्वाचे चिन्ह मानले आहे. इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंग रूप असलेले हे लिंग देहावर सदैव धारण केले जाणारे साधकाचे प्रियतम तत्त्व मानले आहे.

वीरशैवधर्मात श्रीगुरू क्रियादीक्षेमध्ये पंचसूत्रपद्धतीने तयार केलेले, शिलेपासून उत्पन्न केलेले स्फटिकाचे अंगुष्ठपरिमाण लिंग घेऊन जलाधिवास, धान्याधिवासादी क्रियांनी संस्कारित करून त्यातील शिलात्व निवृत्त करून त्या लिंगावर प्राणप्रतिष्ठा करून पंचाक्षरमंत्राचा उपदेश करून शिष्याच्या हातात देऊन 'या लिंगाचे प्राणासारखे जतन कर' अशी सूचना करतात. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

स्फाटिकं शैलजं वाऽपि चन्द्रकान्तं मयं तु वा।
बाणं वा सूर्यकान्तं वा लिंगमेकं समाहरेत्।।

सर्वलक्षणसंपन्ने तस्मिल्लिंगे विशोधिते।
पीठस्थितेऽभिषिक्ते च गन्धपुष्पादिपूजिते।।
मन्त्रपूते कलां शैवीं योजयेद्विधिना गुरुः।
शिष्यस्य प्राणमादाय लिंगे तत्र निधापयेत्।।
तल्लिंगं तस्य तु प्राणे स्थापयेदेकभावतः।
एवं कृत्वा गुरुर्लिंगं शिष्यहस्ते निधापयेत्।।
प्राणवद् धारणीयं तत्प्राणलिंगमिदं तव।
कदाचित् कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः।। ६.२२-२५

**इष्टलिंग**

इष्टलिंग म्हणजे स्थूलदेहावर धारण केले जाणारे लिंग. त्यासंबंधी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहेः-

इष्टलिंगमिदं साक्षादनिष्टपरिहारतः।
धारयेदवधानेन शरीरे सर्वदा बुधः।। ६.५१

अर्थात् अनिष्टाचा परिहार करणारे हे लिंग असल्याने त्याला इष्टलिंग म्हणतात. हे सर्वकाळ देहावर धारण करावे. इष्टलिंगधारण वैदिक आहे. यजुर्वेदातील मंत्रप्रमाणांनी लिंगधारण वेदमान्य असल्याचे सांगितले जाते.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये भगवत्पादाचार्य रेणुक अगस्त्य महर्षींना उपदेश करताना ऋग्वेद, यजुर्वेदातील मंत्रप्रमाणांनी लिंगधारण वेदप्रमाण असल्याचे सांगतात.

ऋगित्याह पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते।
तस्मात् पवित्रं तल्लिंगं धार्यं शैवमनामयम्।। सि.शि. ६.५९

'पवित्रं ते' या ऋग्वेदाच्या मंत्रात ब्रह्मणस्पतीला उद्देशून म्हटले आहे की, हे ब्रह्मणस्पते, तुझे लिंगरूप आहे ते शिवादिभूम्यन्त छत्तीस तत्त्वांत व्यापलेले असून ते अत्यंत पवित्र आहे. अशा दोषरहित लिंगरूपी तुला शरीरावर धारण करावे.

अघोरा पापकाशीति याते रुद्र शिवा तनूः।
यजुषा गीयते यस्मात्तस्माच्छैवोऽघवर्जितः।। सि.शि. ६.६२

हे रुद्रा, तुझे लिंगरूपी शरीर शांत, मंगलमय आणि निष्पाप लोकांच्या शरीरावर प्रकाशित होणारे आहे, असे यजुर्वेदात म्हटले आहे. म्हणून शरीरावर इष्टलिंग

धारण करणारा वीरशैव निष्पाप असतो.

या दोन श्लोकांमधून टीकाकारांनी प्रतिपादन केले आहे की, 'पवित्रं ते विततं' या मंत्राप्रमाणे लिहिले की, हे ब्रह्मणस्पते, तुझे हे लिंग शिवतत्त्वापासून भूमितत्त्वापर्यंतच्या ३६ तत्त्वांमध्ये विस्तार पावले आहे. हे पवित्र आहे, दोषवर्जित आहे. म्हणून हे शिवलिंग निष्ठापूर्वक धारण केले पाहिजे. तसेच रुद्रसूक्तात 'या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी' असे लिंगासंबंधी म्हटले आहे. याचा अर्थ असा की, हे रुद्रशिवा, आपले जे मंगलमय शरीर आहे ते शिवशक्तिरूप आहे. हे अघोर म्हणजे शांत आहे. अपापकाशिनी म्हणजे पापरहित. हे भक्तांच्या शरीरावर प्रकाशमान होते. याचे गुणगान यजुर्वेदाद्वारे केले आहे. म्हणून लिंगधारक भक्त सदासर्वदा पापरहित असतात, पापमुक्त असतात. 'श्रीकरभाष्या'चे प्रणेते श्रीपतिपंडिताराध्य जिज्ञासाधिकरणात विस्तृत रूपाने वेद व आगमांच्या आधारे हे लिंगधारण वेदसंमत असल्याचे सिद्ध करतात. ते म्हणतात, 'लिंगधारणसिद्धान्तस्तु... अग्निहोत्रादिवत् वैदिकं सिद्धम्।'

### इष्टलिंगपूजेत सूतकनिषेध

वीरशैवधर्मात स्त्रियांनाही लिंगधारण-पूजनाचा अधिकार दिला आहे. त्यांना प्रसूती, मासिक धर्म यांचे सूतक धर्मशास्त्राप्रमाणे पाळावे लागेल? किती दिवसपर्यंत वैदिक मंत्रांनी पूजा करणे थांबवावे लागेल? असा प्रश्न उपस्थित करून उत्तर देताना म्हणतात, इष्टलिंग पूजेमध्ये सूतक नसते. आचार्य म्हणतात:-

लिंगार्चनरतायाश्च ऋतौ नार्या न सूतकम्।
तथा प्रसूतिकायाश्च सूतकं नैव विद्यते।।
गृहे यस्मिन् प्रसूता स्त्री सूतकं नात्र विद्यते।
शिवपादाम्बुसंस्पर्शात् सर्वपापं प्रणश्यति।। सि.शि. ९.४४-४५

इष्टलिंग धारण करणे, नित्यपूजन करणे नित्यकर्म असल्याने करावेच लागते. जसे अग्निहोत्रादी नित्यकर्म न केल्यास त्यात प्रत्यवाय आहे तसे लिंगपूजादी कर्म न केल्यास प्रत्यवाय आहे, ते करावेच हा अर्थ. शंकरशास्त्री म्हणतात:-

लिंगस्य धारणं यस्य स्थूलदेहे न विद्यते।
तद्देहं निष्फलं ज्ञेयं जीवत्यक्तशरीरवत्।।

तस्मात्तद्धारणं प्रोक्तं यावज्जीवाग्निहोत्रवत्। सि.शि.उ. पृ. ४२

ज्या कार्याच्या प्रारंभी संकल्प केलेला आहे अशा व्रतसत्राचे कर्म करताना अशौच आल्यास कर्म थांबविता येत नाही, ते करावेच लागते. पौंडरीकादी दीर्घ सत्राच्या कार्यात अनेकदा स्त्री रजस्वला होते पण म्हणून कर्म सोडता येत नाही. तसे अशौच आले तरी लिंगपूजादी सोडता येत नाही.

प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिंगमिदं तव।
कदाचित्कुत्रचिद्वापि न वियोजय देहत:।। सि.शि. ६.२६

प्राणासारखे लिंगाचे रक्षण करावे, तो हरवला तर देह सोडावा, असे सांगितले आहे. प्राण असेपर्यंत लिंगधारण व पूजन करावे हे तात्पर्य.

लिंगधारी सदा शुद्धो निजलिंगं मनोरमम्।
अर्चयेद् गन्धपुष्पाद्यै: करपीठे समाहित:।। सि.शि. ६.५४

शरीरात प्राण असेपर्यंत मग ते शौच किंवा अशौच असो, लिंगधारण व पूजन करावे. 'सिद्धान्तशिखोपनिषदा'त म्हटले आहे:-

अत्याश्रमित्वाद् गणवंशजानां लिंगांगसंगिनां तत्र जन्मान्तदीक्षा।
यथा गंगा शिवसंगात् तथैव न सूतकं वा नाप्यशुचित्वमेषाम्।। १२

पावसाळ्यात सामान्य नद्यांना सूतकप्राप्ती होते, म्हणून धर्मशास्त्रात सामान्य नदीचे स्नान पावसाळ्यात निषिद्ध मानले जाते. परंतु भ. शिवाच्या सान्निध्यात असणाऱ्या गंगेचे स्नान नेहमीच पवित्र असते. कारण तिला सूतक नसते. इष्टलिंगधारी वीरशैव स्त्रियांना सूतकप्राप्तीकाळात सूतक लागत नाही.

यथा विश्वेशनिकटात् गंगा सूतकवर्जिता।
तथा लिंगांकिता भक्ता: पंचसूतकवर्जिता:।। लिं.सा.

येथे एक गोष्ट विचारणीय आहे की, स्त्रियांना इष्टलिंगधारण आणि पूजन करण्यास हरकत नाही. पण स्वयंपाक करण्यासाठी हरकत घेतली जाते, असे परस्परविरुद्ध कसे काय, असे विचारले आहे. याचे समाधान असे की, आपल्या वेदांमध्ये काहीवेळा काही विधानांमध्ये परस्परविरुद्ध आशय असल्याचे जाणवते. त्यांपैकी कोणते ग्राह्य आणि कोणते अग्राह्य याचा निर्णय विचारपूर्वक केलेला असतो. उदा.- 'मा हिंस्यात् सर्वभूतानि,' 'न मांसमश्नीयात्' किंवा 'नोच्छिष्टं

कस्यचिद् दद्यात्' या तीन विधानांत मांसभक्षणाचा निषेध केलेला आहे. तथापि 'अग्नीषोमीयं पशुमालभेत्,' 'सोमेन यजेत् सोमेनोच्छिष्टं' इत्यादी श्रुतिवचनांमध्ये हिंसा यज्ञाधिकरणक पशुहिंसा कर्तव्यरूप मानली आहे. त्याचप्रमाणे येथे रजस्वलावस्थेत पूजादी कार्यासाठी अनुमती दिली आहे, पण स्वयंपाकादी कार्यात निषेध केला आहे. म्हणून या स्थितीत स्वयंपाक करणे निषिद्ध मानावे.

स्वेष्टलिंगैकपूजायां नैवाशौचं विधीयते।
पौंडरीके रज:स्त्रीणां स्वाग्निहोत्रे यथा तथा।।
अकरस्पर्शयोग्यापि यथा जिव्हा महेश्वरि।
मंत्रोच्चारणमात्रस्य पूता भवति भूतले।।
तथा सूतकिन: शैवा पूजामात्रसुनिर्मला:।
नान्य स्पर्शानुकूला: स्युरिति वेदानुशासनम्।। सि.शि.उ. पृ. ४३

याचे समाधान असे की, शिवार्चनादी कर्मे मोक्षोपयोगी आहेत. ती कर्मे केल्यामुळे रजस्वला स्त्रीला पाप लागत नाही. पुढे अशी जिज्ञासा शक्य आहे की, अशौचग्रस्त स्त्रीच्या स्पर्शाने स्थावरलिंगाची स्थापना करताना लिंगावर केलेल्या संस्काराचा नाश होत असल्याने ते लिंग अपूजनीय ठरते. इष्टलिंगाची पूजा केल्याने दीक्षाविधी करतानाचा संस्कारनाश होतो व लिंग अपूजनीय ठरते. याचे समाधान असे की, स्थावरलिंग आणि इष्टलिंग यांच्यात विषमता आहे. स्थावरलिंगाची पूजा रजस्वला स्त्रीने केली तर पूजनीयता नष्ट होण्याचा प्रसंग येतो. म्हणून इतर दुसऱ्या कोणी पूजा करू शकेल, पण इष्टलिंगाची पूजा इतर कोणाला करता येणार नाही. ज्याचे लिंग आहे त्यानेच पूजा केली पाहिजे.

अपगच्छतु सर्वस्वं शिरच्छेदनमस्तु वा।
माहेश्वरो न मुंचेत लिंगपूजामहाव्रतम्।। सि.शि. १०.२२

सर्वस्व जाण्याची वेळ आली तरी प्रसंगी शिरच्छेद झाला तरी शिवभक्ताने महाव्रतस्वरूप लिंगपूजा सोडू नये, अशी आज्ञा असल्याने स्त्रीला रजस्वलावस्थेत पूजन सोडता येत नाही. पौंडरीक यज्ञाच्या दीर्घ सत्रातही स्त्री रजस्वला झाली तर सूतकप्राप्ती होत नाही. यज्ञक्रिया सोडता येत नाही. स्नान करून पूजा करावीच लागते. तसे वीरशैव स्त्रियांना लिंगपूजा सोडता येत नाही.

**प्राणलिंगस्वरूप**

प्राणापानसमाघातात् कन्दमध्याद्यदुत्थितम्।
प्राणलिंगं तदाख्यातं प्राणापाननिरोधिभिः।। सि.शि. १२.६

असे रेणुकभगवत्पादाचार्य प्राणलिंगाचे लक्षण करतात. यातील भाव असा- गुरूंच्या उपदेशाने साधक जेव्हा प्राणायामप्रक्रियेने मूलाधारात असलेल्या अपानवायूला प्राणवायूने संघटित करतो तेव्हा त्यांच्या संघर्षाने मूलाधारापासून एक ज्योती उत्पन्न होऊन सुषुम्नामार्गाने वर जाते. ती ज्योती द्वादशदल असलेल्या हृदयातील कमलाच्या कर्णिकेत अंगुष्ठपरिमाण विद्रुमवर्ण स्फुरण पावत तेथे थांबते. अशा प्रकाशमान ज्योतीलाच वीरशैवाचार्य प्राणलिंग म्हणतात. जसे सूर्योदय झाल्यावर धुके त्या प्रकाशात लीन होते तसेच हृदयकमलस्थित प्राणवायू या ज्योतीमध्ये विलीन होतो. त्यालाच प्राणलिंग म्हणतात. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

प्राणो यत्र लयं याति भास्करे तुहिनं यथा।
तत्प्राणलिंगमुद्दिष्टं तद्धारी स्यात् तदाकृतिः ।। सि.शि. १२.७

हेच प्राणलिंग स्वकीय चिद्रूपतेचे बोधरूप आहे.

**भावलिंगस्वरूप**

क्रिया यत्र लयं प्राप्ता तथा भावोऽपि लीयते।
यत्र तद्देशिकैरुक्तं भावलिंगमिति स्फुटम्।। सि.शि. १५.३७

असे रेणुकभगवत्पादाचार्यांनी भावलिंगाचे स्वरूप वर्णिले आहे. हृदयातील अष्टदलकमलामध्ये परमात्मा प्राणरूपाने राहतो हेच भावलिंग असते. ते प्रमाणांना अगोचर असे केवळ भावैकसमाधिगम्य निराकार रूप असते. हृदयातील प्राणलिंगाची उपासना निर्मल मनाने केली जाते, तसेच शिरस्थ भावलिंगाची उपासना 'शिवोऽहं' -मी शिव आहे- अशा भावनेने केली जाते. शिवोऽहंभावनेचा जेथे लय होतो तेच भावलिंग आहे असे समजावे.

## ३. जंगम

जानन्त्यतिशयाद्ये तु शिवं विश्वप्रकाशकम्।
स्वस्वरूपतया ते तु जंगमा इति कीर्तिताः।। सि.शि. ११.३६

'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये जंगमाचे लक्षण सांगताना ज. रेणुकाचार्य म्हणतात, 'तस्य भासा सर्वमिदं विभाति।' अर्थात् त्याच्या प्रकाशाने सर्व जग प्रकाशित होते. या न्यायाने स्वतःच्या चित्क्रिया शक्तीने प्रपंचाला प्रकाशित करणाऱ्या शिवाला आत्मरूपाने स्वरूपतया जाणतात. आपल्या स्वतःला शिवस्वरूपच असे निश्चित रूपाने जाणतात ते शिवज्ञानसंपन्न जंगम होत. त्यांना 'वीरशैवसदाचारसंग्रहा'मध्ये

जकाराज्जननं दूरं गकाराद् गतिनाशनम्।
मकारान्मरणं नष्टं जंगमस्त्र्यक्षरात्मकः।।
यस्य नास्ति पुनर्जन्म गतिर्नास्ति कदाचन।
बाधते यं न मरणं श्रुणु नाथे स जंगमः।।
जरामरणशून्यत्वाद् गमागमनवर्जनात्।
मनुष्याचारराहित्याज्जंगमोऽयमुदाहृतः।। वी.स.सं. १५.६-८

'ज' म्हणजे ज्यांना जन्म नाही, मरण नाही असे जीवन्मुक्त महात्मे जंगम होत. जंगमाला शिवयोगी म्हणतात. अर्थात् शिवाशी योग साधणारे ते शिवयोगी असतात. शिवयोग्याच्या स्वयजंगम, चरजंगम, परजंगम अशा तीन अवस्था होतात.

**स्वयजंगम**

यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते।। ई.उ. ६

या श्रुतीप्रमाणे जे सर्वांना आत्मरूपाने पाहतात ते जंगम.

स्वच्छन्दाचारसन्तुष्टो ज्योतिर्लिंगपरायणः।
आत्मस्थसकलाकारः स्वाभिधो मुनिसत्तमः।। सि.शि. १५.५२

अर्थात् जो आत्मप्रेरित आचारात संतुष्ट असतो, बाह्यलिंगाकडे विमुख होऊन जो ज्योतिर्लिंगात तल्लीन होतो, आपल्या आत्म्याच्या ठिकाणी सृष्टीला पाहतो तो स्वय नाम धारण करणारा मुनिश्रेष्ठ स्वयजंगम होय. जे शिवज्ञान, भिक्षाहार व एकांतशीलता या कर्मातच मग्न असतात ते स्वयजंगम होत.

ध्यानं शैवं तथा ज्ञानं भिक्षा चैकान्तशीलता।
यतेश्चत्वारि कर्माणि न पंचममिहेष्यते।। सि.शि. १५.५६

सर्वत्र स्वतःचेच रूप पाहणाऱ्या जंगमांना कोणाचा द्वेष मत्सर नसतो.

**चरजंगम**

स्वरूपज्ञानसम्पन्नो ध्वस्ताहंममताकृति:।
स्वयमेव स्वयं भूत्वा चरतीति चराभिध:।। सि.शि. १५.५७

अर्थात् अहंता आणि ममता यांच्यापासून विमुक्त, आत्म्याच्या स्वरूपज्ञानाने संपन्न, स्वयलिंगी, इतराची अपेक्षा न बाळगता स्वत:च स्वत:हून फिरतो म्हणून त्यास चरजंगम असे म्हणतात.

**परजंगम**

'परश्चासौ जंगमश्च परजंगम:' अशी व्युत्पत्ती देऊन जो जीवन्मुक्तांमध्ये श्रेष्ठ असतो तो परजंगम. पर म्हणजे विश्वोत्तीर्ण परशिव. जो स्वात्मरूपाने निरंतर तैलधारेसारखे ध्यान करतो तो परजंगम होय. स्वत:हून भिन्न काहीच नाही. सर्वकाही मीच असा साक्षात्कार ज्याला होतो तो परजंगम. म्हणूनच रेणुकभगवत्पादाचार्य म्हणतात:–

स्वयमेव स्वयं भूत्वा चरत: स्वस्वरूपत:।
परं नास्तीति बोधस्य परत्वमभिधीयते।। सि.शि. १५.६४

अर्थात् आपल्या स्वरूपाचे यथार्थज्ञान झाल्यामुळे स्वत:च स्वयंसिद्ध होऊन शिवयोगी संचार करीत असतो. आपल्या स्वरूपाहून पर दुसरे काही नाही, हे तो जाणतो म्हणून त्यास परजंगम म्हणतात.

घटपटादीमध्ये सर्व पदार्थांत त्याला घटपटादीची प्रचीती येत नाही, सर्व पदार्थामध्ये शिवभावनेने पाहतो असा परमहंस पुरुष परजंगम. तोच योगिराज असतो. शिवज्ञानाच्या उपदेशाने तो शिवभक्तांना संसारदु:खापासून उद्धरून नेतो तो परजंगम. संरक्षण करणारा आवरणरूप जंगम तो हाच.

## ४. पादोदक

पादोदक म्हणजे चरणतीर्थ. येथे पादोदकाचा तात्त्विक अर्थ सांगितला आहे.

परमानन्द एवोक्त: पादशब्देन निर्मल:।
ज्ञानं चोदकशब्देन तयोरैक्यं तु दीक्षया।। सि.शि. १९.८

श्रीरेणुकभगवत्पादाचार्यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये सांगितल्याप्रमाणे स्वकीय

परमानंदज्ञान हेच पादोदक होय. वीरशैवधर्मात अशा ज्ञानप्राप्तीसाठी साधनीभूत गुरु-जंगमांच्या चरणामृताला पादोदक म्हणतात. पादोदक कसे घ्यावे, यासंबंधी

अंगुष्ठे भावयेद् रुद्रं तर्जन्यां शंकरं स्मरेत्।
मध्यमायां महादेवमनामिक्यां त्रियम्बकम्।।
कनिष्ठिकायामीशानं पादोपरि कपर्दिनम्।
पादाधः पंचवदनं गुल्फयोरुग्रभर्गकौ।।
सर्वं लिंगमयं ध्यात्वा पादं जंगमलिंगिनः।
पिबेत् संक्षालितं तोयं पीत्वा शिरसि धारयेत्।। पा.आ. ७.४७-५०

या पारमेश्वरागमोक्तीप्रमाणे शिवयोग्याच्या शरीरात अंगुष्ठात रुद्र, तर्जनीत शंकर, मध्यमेत महादेव, अनामिकेत त्र्यंबक, कनिष्ठिकेत ईश्वर, पादोर्ध्व भागात कपर्दिन्, अधोभागात पंचवदन, गुल्फेत उग्रभर्गक यांची स्थापना असते.

जीवन्मुक्त महात्मा जंगमाच्या पायाच्या अंगुष्ठापासून करंगळीपर्यंत शिवाच्या नाना मूर्तींचे ध्यान करून पायांची पूजा करून पायाखाली हात ठेवून, दोन्ही अंगठ्यांवर पाणी टाकून खालच्या पायात तीर्थ संग्रहित केलेले जलच पादोदक होय. वीरशैव संप्रदायाचा प्रतिदिन पादोदक घेण्याचा आदेश आहे.

पादोदकं यथा भक्त्या स्वीकरोति महेशितुः।
तथा शिवात्मनोर्नित्यं गुरुजंगमयोरपि।। सि.शि. ९.६८

गुरुपूजेनंतर होणारे गुरुपादोदक तर जंगमपूजेनंतर प्राप्त होणारे जंगमपादोदक असते. इष्टलिंगपूजा करून मिळणारे लिंगपादोदक होय. वीरशैव या तिघांचे त्रिविध पादोदक भक्तीने स्वीकारतात. त्रिविध पादोदक सेवन केल्याने सर्वपापक्षय होतो. असे हे पादोदक पापनाश करणारे असल्याने भक्तांचे रक्षण करते.

## ५. प्रसाद

साधनेला फल असते म्हणूनच साधना सफल होते. हे फल म्हणजेच प्रसाद. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये प्रसादाची व्याख्या दिली आहे. 'नैर्मल्यं मनसो लिंगं प्रसाद इति कथ्यते।' या आचार्यांच्या वचनाप्रमाणे चित्त निर्मल झाले की, प्रसाद प्राप्त झाला असे समजावे. शिवाला समर्पित वस्तूंचे सेवन केल्याने चित्ताची

निर्मलता होते. समर्पित केलेल्या वस्तू भोग्य किंवा धार्य असतात. अन्नादी भोग्य, वस्त्रादी धार्य मानल्या जातात. शिवभक्त आपल्याला हव्या असलेल्या भोग्य वा धार्य वस्तू स्वीकारण्यापूर्वी शिवाला समर्पण करतो.

शिवप्रसादं यद् द्रव्यं शिवाय विनिवेदितम्।
निर्माल्यं तत्तु शैवानां मनोनैर्मल्यकारणम्।। सि.शि. ११.७

प्रसादाने मन निर्मल होते. निर्मल मनातच भक्ती उदित होते. भक्तीचा उदय झाला की, शिवप्रसाद मिळतो. म्हणून शिवप्रसाद व शिवभक्ती या बीजांकुरासारख्या अन्योन्याश्रयी आहेत. म्हणूनच म्हटले आहे:-

प्रसादादेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसम्भवः।
यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः।। सि.शि. ९.११
भुंजीयाद् रुद्रभुक्तान्नं रुद्रपीतं जलं पिबेत्।
रुद्राघातं सदा जिघ्रेदिति जाबालिकी श्रुतिः।।
अर्पयित्वा निजे लिंगे पत्रं पुष्पं फलं जलम्।
अन्नाद्यं सर्वभोज्यं च स्वीकुर्याद् भक्तिमान्नरः।। सि.शि. ९.७०-७१

अशाप्रकारे श्रीरेणुकभगवत्पादाचार्य जाबाल श्रुतीतील उदाहरण देऊन शिवप्रसाद ग्रहण करण्याचा आग्रह धरतात. 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' या उपनिषदातील वाक्यातही आधी समर्पण, नंतर भोग असा क्रम दिलेला आहे. आधी त्यागांग व नंतर भोगांग असा क्रम सांगितला आहे. जसा गुरुप्रसाद सेवन करावा, तसाच जंगम व लिंगाचाही प्रसाद सेवन करावा.

गुरुमुखातून प्राप्त झालेला शुद्ध प्रसाद, लिंगमुखातून प्राप्त झालेला सिद्ध प्रसाद तर जंगममुखातून प्राप्त झालेला लिंगप्रसाद हा प्रसिद्ध प्रसाद मानला जातो. मरितोंटदार्य म्हणतात:-

प्रसादस्त्रिविधः प्रोक्तः शुद्धः सिद्धः प्रसिद्धकः।
शुद्धोगुरुमुखात् प्राप्तः सिद्धो लिंगमुखातथा।
प्रसिद्धो जंगममुखात् प्रसादस्त्रिविधो मतः।। वी.आ.चं. पृ. १३३

प्रसाद हा मनःप्रसादाला कारण होतो व शिवभक्ताला संसारसागरातून तारून नेतो.

## ६. विभूती

विभूती हे धार्य आवरण आहे. ते वीरशैवाचे बाह्य आवरण आहे, हे परिशुद्ध गोमयापासून बनविलेले असते. याची पाच नावे आहेत. विभूती, भसित, भस्म, क्षार आणि रक्षा. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

विभूतिर्भूतिहेतुत्वाद् भसितं तत्त्वभासनात्।
पापानां भर्त्सनाद् भस्म क्षरणात् क्षारमापदाम्।।
रक्षणात् सर्वभूतेभ्यो रक्षेति परिगीयते।। सि.शि. ७.५

विभूती ऐश्वर्यप्रदायक आहे. यामुळे अणिमादी आठ ऐश्वर्ये प्राप्त होतात. भसित धारण केल्याने शिवतत्त्वाची प्राप्ती होते. भस्माचे धारण केल्यावर कायिक, वाचिक पापांचे भर्त्सन होते. क्षारधारणाने तापत्रयोत्पन्न विपत्ती नष्ट होतात. रक्षाधारणाने सर्व विघातक ग्रहयक्षादीपासून रक्षण होते.

भगवान शिवाच्या सद्योजातादी पाच मुखांतून उत्पन्न झालेल्या नंदादी गाईंच्या गोमयापासून बनविलेल्या भस्माचा प्रकार व त्याचा विनियोग यासंबंधीचे ज्ञान खालील सारणीवरून होईल.

| मुख | नाव | वर्ण | भस्मप्रकार | विनियोग |
|---|---|---|---|---|
| सद्योजात | नंदा | कपिलवर्ण | विभूती | नित्यकर्मासाठी |
| वामदेव | भद्रा | कृष्णवर्ण | भसित | नैमित्तिक |
| अघोर | सुरभि | शुभ्रवर्ण | भस्म | प्रायश्चित्त |
| तत्पुरुष | सुशीला | धूम्रवर्ण | क्षार | काम्यकर्म |
| ईशान | सुमना | रक्तवर्ण | रक्षा | मोक्षगमन |

शिवाच्या सद्योजात मुखापासून उत्पन्न झालेल्या कपिलवर्ण नंदा गाईच्या गोमयापासून निर्मित विभूती असते. त्याचा वापर इष्टलिंगपूजारूपी नित्यकर्मासाठी करतात.

शिवाच्या वामदेव मुखापासून उत्पन्न झालेल्या कृष्णवर्ण भद्रा गाईच्या गोमयापासून निर्मित भसित असते. त्याचा वापर नैमित्तिक कर्मासाठी करतात.

शिवाच्या अघोर मुखापासून उत्पन्न झालेल्या शुभ्रवर्ण सुरभी गाईच्या गोमयापासून निर्मित भस्म असते. त्याचा वापर प्रायश्चित्त कर्मासाठी करतात.

शिवाच्या तत्पुरुष मुखापासून उत्पन्न झालेल्या धूम्रवर्ण सुशीला गाईच्या गोमयापासून निर्मित क्षार असते. त्याचा वापर काम्य कर्मासाठी करतात.

शिवाच्या ईशान मुखापासून उत्पन्न झालेल्या रक्तवर्ण सुमना गाईच्या गोमयापासून निर्मित रक्षा असते. त्याचा वापर मोक्ष प्रदान करणाऱ्या निष्काम कर्मासाठी करतात.

## ७. रुद्राक्ष

भ. शिवाला आवडणारे रुद्राक्ष हे वृक्षबीज आहे. भगवत्पाद रेणुकाचार्यांच्या उक्तीप्रमाणे

पुरा त्रिपुरसंहारे त्रिनेत्रो जगतां पतिः।
उदपश्यत् पुरा योगमुन्मीलितविलोचनः।।
निपेतुस्तस्य नेत्रेभ्यो बहवो जलबिन्दवः।
तेभ्यो जाता हि रुद्राक्षा रुद्राक्षा इति कीर्तिताः।। सि.शि. ७.४७,४८

अर्थात् पूर्वी त्रिपुरासुराचा वध करण्याच्या प्रसंगी जगाचा पती असा त्रिनेत्रधारी शिव त्रिपुरासुराची आकाशात भ्रमण करणारी तीन नगरे एकत्र केव्हा येतात हे वर दृष्टी लावून एकटक पाहत असताना त्याच्या नेत्रांतून जे योगाश्रू खाली पडले त्यापासून रुद्राक्ष उत्पन्न झाले. रुद्राच्या नेत्रांपासून उत्पन्न झाले म्हणून त्यांना रुद्राक्ष असे नाव प्राप्त झाले.

रुद्राच्या नेत्रांपासून जन्मलेले रुद्राक्ष होत. भ. शिवाच्या सूर्यनेत्रापासून बारा, चंद्रनेत्रापासून सोळा, अग्नी ह्या नेत्रापासून दहा प्रकारचे, असे एकूण अडतीस प्रकारचे रुद्राक्ष झाले. यांच्या औषधी गुणांमुळे अनेक व्याधी दूर होतात.

दर्शनात् स्पर्शनाच्चैव स्मरणादपि पूजनात्।
रुद्राक्षधारणाल्लोके मुच्यन्ते पातकैर्जनाः।। सि.शि. ७.६१

रुद्राक्षाच्या दर्शनाने, स्पर्शाने, केवळ स्मरणाने व पूजनाने सर्व पातके नष्ट होतात.

### रुद्राक्षधारण : स्थान, मुख व संख्या

शिखास्थानी एकमुखी एक रुद्राक्ष, मस्तकावर दोन-तीन-बारा मुखांचे एकेक

असे तीन रुद्राक्ष, मस्तकाभोवती अकरा मुखांचे छत्तीस रुद्राक्ष, दोन्ही कानांवर पाच-सात-दहा मुखांचे प्रत्येकी दोन असे सहा रुद्राक्ष, कंठात सहा मुखांचे सोळा व आठ मुखांचे सोळा असे बत्तीस रुद्राक्ष, वक्षस्थळावर चार मुखांचे पन्नास रुद्राक्ष, दोन्ही दंडांवर तेरा मुखांचे पन्नास रुद्राक्ष, दोन्ही मनगटांत नऊ मुखांचे बारा बारा रुद्राक्ष आणि चौदा मुखांचे १०८ रुद्राक्ष यज्ञोपवितप्रमाणे कंठात धारण करावेत.

## ८. मंत्र

वीरशैवधर्मात श्रीगुरूकडून शिष्याच्या उजव्या कानात मंत्र दिला जातो तो पंचाक्षरमंत्र होय. प्रणव लावून तो षडक्षर होतो. हा मंत्र श्रुतीमधील सर्वश्रेष्ठ मंत्र मानला जातो. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे:-

नमः शब्दं वदेत्पूर्वं शिवायेति ततः परम्।
मन्त्रः पंचाक्षरो ह्येष सर्वश्रुतिशिरोगतः।। ८.७
सप्तकोटिषु मन्त्रेषु मन्त्रः पंचाक्षरो महान्।
ब्रह्मविष्ण्वादिदेवेषु यथा शम्भुर्महत्तरः।। ८.४

मंत्रोच्चार करताना सुरुवातीला 'नमः' असे म्हणावे व 'शिवाय' असे नंतर म्हणावे. सप्तकोटी मंत्रांमध्ये हा श्रेष्ठ मानला जातो. हा मंत्र प्रणवपूर्वक होतो तेव्हा त्याला षडक्षर मंत्र म्हणतात. या 'नमः शिवाय' मंत्राला मूल, विद्या, शिव, शैवसूत्र व पंचाक्षर अशी नावे आहेत. सात कोटी मंत्रांत मूलकारण असल्याने 'मूल' म्हणतात. या मंत्राच्या मननाने शिव-जीवाच्या ऐक्याचे ज्ञान होते. विद्येचा उदय होतो म्हणून याला विद्या असे म्हणतात. शिवदर्शनाचे निमित्त कारण असल्याने शिव म्हणतात.

'शिव'संबंधीचे सर्व विषय पाच पाच अक्षरांत सूत्ररूपाने निहित आहेत म्हणून याला शिवसूत्र म्हणतात. यात नमः शिवाय अशी पाच अक्षरे असल्याने याला पंचाक्षर म्हणतात. पंचाक्षर मंत्राचा वामदेव ऋषी आहे, पंक्तिछंद आहे, शिव ही देवता आहे, ओंकार बीज आहे, उमा शक्ती आहे, हे सर्व गुरुमुखातून समजून घेऊन तीन वेळा प्राणायाम करून पूर्व किंवा उत्तरेकडे मुख करून रुद्राक्षमाळा घेऊन किमान एकशे आठ जप करावा.

जपस्तु त्रिविधः प्रोक्तो वाचिकोपांशुमानसः।
श्रूयते यस्तु पार्श्वस्थैर्यथा वर्णसमन्वयः।।
वाचिकः स तु विज्ञेयः सर्वपापप्रभञ्जनः।
ईषत्स्पृष्ट्वाऽधरपुटं यो मन्दमभिधीयते।।
पार्श्वस्थैरश्रुतः सोऽयमुपांशुः परिकीर्तितः।
भाव्यते वर्णरूपेण स मानस इति स्मृतः।। सि.शि. ८.२७-२९

मंत्रोच्चाराला जप म्हणतात. वाचिक, उपांशू व मानस असे जपाचे तीन प्रकार. जवळ बसलेल्या लोकांना ऐकू येईल असा स्वच्छ उच्चार करणे वाचिक जप होय. या जपाने मन, वाणी व शरीर यांच्यापासून उद्भवलेली पापे नष्ट होतात. ज्यामध्ये ओठाची किंचित हालचाल होते पण जवळ बसलेल्या लोकांना ऐकू येत नाही, तो उपांशू जप होय. ओठ किंवा जीभ न हालवता मनातल्या मनात केला जातो, तो मानस जप होय. हा सर्वश्रेष्ठ मानला जातो.

वीरगोत्राच्या आचार्यांना ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय हा प्रसादपंचाक्षर होतो.
नंदिगोत्राच्या आचार्यांना ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं नमः शिवाय हा मायापंचाक्षर होतो.
भृंगिगोत्राच्या आचार्यांना ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं नमः शिवाय हा सूक्ष्मपंचाक्षर होतो.
वृषभगोत्राच्या आचार्यांना ॐ ऱ्हां ऱ्हीं नमः शिवाय हा स्थूलपंचाक्षर होतो.
स्कंदगोत्राच्या आचार्यांना ॐ ऱ्हां नमः शिवाय हा मूलपंचाक्षर होतो.

## पंचाचार

वीरशैवदर्शनाच्या मार्गावरून जाताना साधकाला पंचाचार हे प्राणस्वरूप आहेत.

लिंगाचारः सदाचारः शिवाचारस्तथैव च।
भृत्याचारो गणाचारः पंचाचाराः प्रकीर्तिताः।। चं.आ. ९.४

लिंगाचार, सदाचार, शिवाचार, भृत्याचार व गणाचार असे पाच आचार सुचविले आहेत.

### १. लिंगाचार

अंगसंज्ञक जीवाला लिंगसंज्ञक शिवस्वरूपाची प्राप्ती करण्यासाठी उपदिष्ट आचार म्हणजे लिंगाचार. शरीराने लिंगपूजन, मनाने चिंतन, भावनेने निदिध्यासन म्हणजे लिंगाचार.

गुरुणा दत्तलिंगाद्वै नास्ति दैवं महीतले।
इति भावानुसंधानं लिंगाचारः स उच्यते।। चं.आ. ९.५

नार्चयेदन्यदेवांस्तु न स्मरेन्न च कीर्तयेत्।
न तन्निवेद्यमश्नीयाच्छिवभक्तो दृढव्रतः।।
यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत्।
नान्यदेवार्चकान् मर्त्यान् पूजाकाले निरीक्षयेत्।।
सदा शिवैकनिष्ठानां वीरशैवाध्ववर्तिनाम्।
नहि स्थावरलिंगानां निर्माल्याद्युपयुज्यते।। सि.शि. ९.३१-३३

अर्थात् इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंग या व्यतिरिक्त स्थावर लिंगांचे पूजन निषिद्ध आहे. इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंगाव्यतिरिक्त स्थावर लिंगाचे किंवा अन्य देवांचे अर्चन निषिद्ध मानले आहे. इथे निषेध करताना निषेध मुख्य नसून त्यांचे अपकृष्टत्व प्रतिपादन करणे हा हेतू आहे.

## २. सदाचार

सज्जनः शिवभक्तश्च येन मार्गेण सर्वदा।
तोष्यते च महादेवि सदाचारः स उच्यते।। सू.आ. ८.७

सूक्ष्मागमात सांगितल्याप्रमाणे सज्जन शिवभक्त व भ. शिव यांना आवडणारा आचार म्हणजे सदाचार. कसे वागल्यास सज्जनांना संतोष होईल या प्रश्नाचे उत्तर देतात.

धर्मार्जितेन द्रव्येण यत्संतर्पणमन्वहम्।
गुरुलिंगजंगमानां सदाचार इति स्मृतः।। चं.आ. ९.६

अर्थात् धर्ममार्गाने प्राप्त केलेले धन त्याच्याद्वारा गुरू, संत, लिंग, जंगम यांना तृप्त करणे म्हणजे सदाचार. दान तीन प्रकारचे मानले आहे. सोपाधिदान, निरुपाधिदान आणि सहजदान. यांपैकी तुच्छ सांसारिक अभिलाषेने दिलेले सोपाधिदान, तुच्छ सांसारिक इच्छारहित ईश्वरार्पण वृत्तीने दिलेले निरुपाधिदान व 'भोक्ताभोज्यप्रेरयितारं च मत्वा त्रिविधं ब्रह्ममेतद्' या श्रुतीप्रमाणे देणारा घेणारा व दिले जाणारे दान हे शिवस्वरूप आहे असे चिंतन करून घडलेले सहजदान. या त्रिविध दानातील सर्वोत्कृष्ट सहज दान मानले आहे.

सहजं दानमुत्कृष्टं सर्वदानोत्तमोत्तमम्।
शिवज्ञानप्रदं पुंसां जन्मरोगनिवर्तकम्।। चं.आ. ९.२२

असे उत्कृष्ट दान म्हणजेच सदाचार. सदाचाराशी संबंधित वीरशैव शास्त्रात आठ शील सांगितले आहेत ते पुढीलप्रमाणे:-

१. अंकुर- गुरुकृपेने षडध्वन्यासाने सुशोभित शरीर अप्राकृत आहे या स्वभावगत भावनेस अंकुरशील असे म्हणतात.

२. उत्पन्न- शिवदीक्षेने युक्त पत्नी आदींच्या सहवासास उत्पन्नशील असे म्हणतात.

३. द्विदल- भस्मादी चिह्न शरीरावर प्रमादरहित धारण करणे यास द्विदलशील असे म्हणतात.

४. प्रवृद्ध- शिवधर्माच्या माहात्म्याचे अनुशीलन करणे यास प्रवृद्धशील असे म्हणतात.

५. सप्रकांड- इष्टलिंगाच्या पूजेशिवाय भोजन न करणे यास सप्रकांडशील असे म्हणतात.

६. सशाख- इष्टलिंगाला समर्पित न केलेल्या द्रव्याला न स्वीकारणे यास सशाखशील असे म्हणतात.

७. सपुष्प- शिवार्पित प्रसादाचा त्याग न करणे यास सपुष्पशील असे म्हणतात.

८. सफल- गुरुलिंग जंगमास अभेदभावनेने पूजन करणे यास सफलशील असे म्हणतात.

सदाचारासंबंधी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे:-

सदाचारप्रियः शम्भुः सदाचारेण पूज्यते।
सदाचारं विना तस्य प्रसादो नैव जायते।। सि.शि. १६.६६

अर्थात् भ. शंकराना सदाचार सर्वाधिक प्रिय आहे. त्याची पूजा सदाचारानेच केली जाते. सदाचाराशिवाय त्याचा अनुग्रह होत नाही.

## ३. शिवाचार

शिव एव परंब्रह्म पंचकृत्यपरायणः।
न ततोऽन्या भक्तिरिति शिवाचारो हि कीर्तितः।। चं.आ. ९.७

सृष्टी, स्थिती, लय, तिरोधान व अनुग्रह यांना पंचकृत्ये म्हणतात. भ. शिव हे पंचकृत्यपरायण मानले जातात ही दृढ भावना म्हणजे शिवाचार.

शिवभक्तो महातेजा: शिवभक्तिपराङ्मुखान्।
न स्पृशेन्नैव वीक्षेत न तै: सह वसेत्क्वचित्।। सि.शि. ९.२७

शिवभक्त शिवाचा अनन्यशरणागत असतो हा शिवाचार मानला आहे. शिवभक्तिविहीनाचा स्पर्श, दर्शन व सहवास त्याला आवडत नाही. शिवाचारामध्ये द्रव्य, क्षेत्र, गृह, भांड, तृण, काष्ठ, वीटिका, पाक, रस, भव, भूत, भाव, मार्ग, काल, वाक् आणि जन हे सोळा शील आहेत.

विद्वन्नयं शिवाचार: सर्वशास्त्रेषु गोपित:।
एतदाचरणान्मर्त्य: शिवसायुज्यमश्नुते।। चं.आ. ९.८

**शिवाचारासंबंधीच्या शीलांचे विवरण**

१. द्रव्य- प्राप्त फल, मूल आदींवर भस्म प्रोक्षण करून त्यांचे शुद्धीकरण करणे यास द्रव्यशुद्धी म्हणतात.

२. क्षेत्र- क्षेत्राच्या चारी कोनाच्या ठिकाणी नन्दिमुद्रा अंकित करून शिलान्यास करणे यास क्षेत्रशुद्धी म्हणतात.

३. गृह- घराच्या महाद्वारामध्ये शिवलिंग अंकित करणे गृहशुद्धी होय.

४. भांड- भोजनादीसाठी उपयोगात आणलेल्या पात्रावर शिवलिंगाचे अंकन करणे भांडशुद्धी होय.

५. तृण- गायीसाठी आणलेल्या गवतावर भस्मप्रोक्षण करणे तृणशुद्धी होय.

६. काष्ठ- घरात लागणारे सरपण यावर भस्मप्रोक्षण करणे काष्ठशुद्धी होय.

७. वीटिका- भक्तासाठी तयार केलेल्या तांबूलास भस्मप्रोक्षण करणे ही वीटिकाशुद्धी.

८. पाक- शिवदीक्षा घेतलेल्या व्यक्तीकडून केलेला स्वयंपाक ग्रहण करणे पाकशुद्धी.

९. रस- म्हशीचे तूप, दही, दूध वा ताक यांचा त्याग करून हे सर्व गायीचे स्वीकारणे यास रसशुद्धी म्हणतात.

१०. भाव- काम्यकर्माचा त्याग करून शिवभाव ग्रहण करणे म्हणजे भावशुद्धी होय.

११. भूत- प्राण्यावर दया करणे भूतशुद्धी होय.

१२. भाव– समस्त कामनांचा त्याग करणे व शिवभावाचे अनुसंधान करणे ही भावशुद्धी.

१३. मार्ग– चालताना पायाखाली आल्यामुळे मुंगी आदीची हिंसा होऊ नये हे पाहणे यास मार्गशुद्धी म्हणतात.

१४. काल– शुभकाळी शिवलिंगाची आराधना करणे कालशुद्धी होय.

१५. वाक्– खोटे बोलणे, कठोर बोलणे, बीभत्स, घृणित तसेच दांभिक बोलण्याचा त्याग करणे वाक्शुद्धी.

१६. जन– बसताना, झोपताना, वाहनात असताना सदैव सत्संगतीत असणे जनशुद्धी होय.

## ४. गणाचार

'अनुष्ठितो भक्तगणैर्गणाचार इतीरितः' अर्थात् भक्तगणांनी केलेले आचरण यास गणाचार म्हणतात. शिव अथवा शिवभक्ताची निंदा कधीही ऐकू नये यासही गणाचार म्हणतात. भगवत्पाद रेणुकाचार्यांनी प्रतिपादित केले की, समर्थ शिवभक्ताने शिवनिंदा करणारास ताडन करावे. कारण 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहेः–

> शिवनिन्दाकरं दृष्ट्वा घातयेदथवा शपेत्।
> स्थानं वा तत्परित्यज्य गच्छेद् यद्यक्षमो भवेत्।।
> यत्र चाचार निन्दास्ति कदाचित् तत्र न व्रजेत्। ९.३६

शिवभक्त सक्षम असेल तर निंदकास ताडन करावे. अक्षम असेल तर ते स्थान सोडून जावे.

गणाचारासंबंधी कायिक, वाचिक व मानसिक असे ६४ शील सांगितले आहेत. वाचिक शीलाचे सात प्रकार, पाणिगत शीलाचे पाच प्रकार, पादगत शीलाचे चार प्रकार, त्वक्संबंधी दोन शील, नेत्रगत दोन शील, जिह्वागत एक शील, घ्राणगत एक शील, श्रोत्रगत दोन शील, कायशोध पाच शील, मानसिक शील ३५ सांगितले आहेत.

### वाचिक शील

वाचा म्हणजे वाणी, बोलणे. वाणीचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

१. वाचेने यथार्थ भाषण करावे.

२. कुणालाही खूष करण्यासाठी असत्य बोलू नये. सत्य अप्रिय असेल तर बोलूच नये.

३. धर्माचा व ज्ञानाचा बोध करणाऱ्या वेदांचा, आगमांचा आणि पुराणांचा अभ्यास करावा.

४. शिव, शिवभक्त आणि गुरू यांची निरंतर प्रशंसा करावी.

५. शिवाखेरीज इतर कोणत्याही देवतांची आणि मनुष्यांची मुळीच प्रशंसा करू नये.

६. आत्मप्रौढी व आत्मस्तुती कधीही करू नये.

७. कोणत्याही देवतेची आणि मनुष्याची कधीही निंदा करू नये.

**पाणिगत शील**

पाणि म्हणजे हात. हाताचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

८. गुरू, लिंग व जंगम यांना आदरपूर्वक नमस्कार करावा.

९. शिवपूजेसाठी रात्रंदिवस पूजासामग्री जमवावी.

१०. रुद्राक्षमाळेने नेहमी जप करावा.

११. गुरू, लिंग व जंगमांची नित्य पूजा-अर्चा करावी.

१२. गुरू व जंगमांना यथाशक्ती दान करावे.

**पादगत शील**

पाद म्हणजे पाय. पायाचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

१३. गुरू आणि जंगमांकडे भक्तीने चालत जावे.

१४. गुरू आणि जंगमांना प्रदक्षिणा घालावी.

१५. पूजासामग्री जमविण्यास चालत जावे.

१६. गुरू व लिंगाच्या पूजेसाठी स्थिर आसन घालावे.

**त्वचागत शील**

त्वचेने कसे आचरण करावे ते येथे सांगितले आहे.

१७. नित्य इष्टलिंग धारण करावे म्हणजे त्याच्या स्पर्शात असावे. इष्टलिंगाचा वियोग कधीही होऊ नये.

१८. इष्टलिंगाच्या स्पर्शाने रोमांचित व्हावे. याला स्पर्शगत शील म्हणतात.

**चक्षुगत शील**

चक्षू म्हणजे डोळे. डोळ्यांचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

१९. अविश्रांतपणे अनुरागपूर्वक इष्टलिंगाचे दृष्टीने अनुसंधान करावे.

२०. शिवलिंग पाहून डोळे आनंदाने भरून यावेत.

**जिव्हागत शील**

जिव्हा म्हणजे जीभ. जिभेचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

२१. लिंगाला अर्पिलेल्या नैवेद्याचा स्वीकार करावा.

**घ्राणगत शील**

घ्राण म्हणजे नाक. नाकाचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

२२. लिंगार्पित पुष्पांचा सुगंध घ्यावा.

**श्रोत्रगत शील**

श्रोत्र म्हणजे कान. कानाचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

२३. गुरू, लिंग व भक्तांची स्तोत्रे ऐकावीत.

२४. गुरू, लिंग व भक्तांची निंदा ऐकू नये.

**कायशोधन शील**

काया म्हणजे शरीर. शरीराचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

२५. गुरू, लिंग व जंगम यांचा प्रसाद घेऊन काया शुद्ध करावी.

२६. निषिद्ध विषयांचा इंद्रियनिरोध करावा.

२७. अस्पृश्य वस्तूंच्या स्पर्शानंतर शरीर जलस्नानाने किंवा भस्मस्नानाने पवित्र करावे.

२८. बसताना, झोपताना, वाहनात बसताना, गोठ्यात वावरताना वीरशैव-दीक्षारहित व्यक्तींचा स्पर्श टाळावा.

२९. शरीरावर विभूती, रुद्राक्ष व इष्टलिंग सर्वदा धारण करावे.

**मानसिक शील**

मनाचे आचरण कसे असावे ते येथे सांगितले आहे.

३०. निषिद्ध भोगविषयांचा संकल्प करू नये. (ब्रह्मचर्य पाळावे.)

३१. भक्तीशिवाय इतर विषयांची आवड नसावी.

३२. अधर्मावर क्रोध असावा, वैऱ्यावर क्रोध असू नये.

३३. धनाचा लोभ नसावा, शिवपूजेचा असावा.

३४. भक्तांचा मोह असावा, स्त्रीपुत्रादिकांचा मोह असू नये.

३५. इंद्रियांचा मत्सर करावा, व्यक्तीचा करू नये.

३६. धर्म व प्रपंच यांच्याबद्दल मद नसावा, मायेवर जय मिळविण्यास मद असावा.

३७. गुरू व जंगमांचे गुण–अवगुण पाहू नये.

३८. प्राणिमात्रांना त्रास देऊ नये.

३९. प्राणिमात्रांना होत असलेले दुःख सहन करू नये.

४०. दुसऱ्याला वाईट वाटणार नाही असे आपले बोलणे व वागणे असावे.

४१. शत्रू असो की मित्र असो, त्यांच्यात भेदभाव न करता त्यांना आर्जव करावे.

४२. गुरूंनी उपदेशिलेले आगम व निगम यांच्यावर दृढ विश्वास ठेवावा.

४३. मोठ्यात मोठ्या आपत्तीतही धर्म सोडू नये.

४४. शत्रूलाही दोष न देता क्षमा करावी.

४५. मन भोगासक्तरहित असावे.

४६. वाणी व क्रिया यांनी प्रमाद घडू नये.

४७. भगवान शिवाखेरीज अन्य कोणत्याही वस्तूसंबंधी संकल्प करू नये. नेहमी अंतःकरणात शिवसंकल्पच करावा.

४८. परद्रव्याचा परिग्रह करू नये.

४९. एखादी इच्छित वस्तू प्राप्त झाली नाही तरी आपली वृत्ती समाधानी असावी.

५०. नेहमी परमेश्वराच्या नामाचे व रूपाचे स्मरण करावे.

५१. भगवान शिवाच्या नामाचे, रूपाचे व गुणांचे चिंतन करावे.

५२. भगवान शिवाची पादसेवन–भक्ती करावी.

५३. भगवान शिवाची आवाहनादिक उपचारांनी मानसपूजा करावी.

५४. भगवान शिवाच्या चरणांना नेहमी प्रणाम करावा.

५५. भगवान शिव हे सेव्य आहेत व मी त्यांचा दास आहे, ही भावना मनात सदैव बाळगावी.

५६. मंगलस्वरूप शिव माझे मित्र आहेत अशा भावनेने वागावे.

५७. आपले सर्वस्व शिवाला अर्पण करावे.

५८. मूलमंत्राचा मानसिक जप करावा.

५९. हृदयात शिवाच्या दिव्य रूपाचे ध्यान करावे.

६०. शिवामध्ये तेलाच्या धारेप्रमाणे मन केंद्रित करावे.

६१. शांत दीपाप्रमाणे मन शिवामध्ये दृढपणे ठेवावे.

६२. सोऽहंभावाने ध्यान करीत इंद्रियव्यवहाराचा भाव मनातून नाहीसा करावा.

६३. शिवाचे अखंडपणे अनुसंधान करावे, चिंतन करावे.

६४. आपणच शिव आहोत हे जाणून शिवानंद प्राप्त करून घ्यावा. सर्व जग आत्मरूप आहे असे समजावे.

## ५. भृत्याचार

शिवभक्ता जना: सर्वे वरिष्ठा: पृथिवीतले।
तेषां भृत्योहमिति भृत्याचार इति स्मृत:।। चं.आ. ९.९

अर्थात् पृथ्वीवर जे ज्येष्ठ श्रेष्ठ शिवभक्त आहेत ते माझ्यासाठी शिवसमान पूज्य आहेत. मी सर्वांचा भृत्य आहे असे मानून त्यांची सेवा करणे म्हणजे भृत्याचार. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये सांगितले आहे:-

शिवयोगी शिव: साक्षाददिति कैंकर्यभक्तित:।
पूजयेदादरेणैव यथा लिंगं तथा गुरुम्।। ९.९

जसे लिंग तसेच शिवयोगी हे साक्षात शिव आहेत. सर्वांची सेवा करणे भृत्याचार होय. 'चंद्रज्ञानागमा'त म्हटले आहे की देशिकास शरीर, लिंगाला चित्त आणि जंगमाला सर्वस्व देऊन पारलौकिक सुखापासून विन्मुख होऊन मोक्षाची अभिलाषा करणारा वीरभृत्य होय.

आचार म्हणजे सगळ्यांसाठी अलंकार आहे. आचारहीन पुरुष सगळ्यांकडून निंदित होतो. आचारयुक्त ज्ञानाने भ. शिव प्रसन्न होतो. अज्ञानी वा तत्त्वज्ञ महापुरुष असला तरी तो आचारसंपन्न असलाच पाहिजे. नीलकंठ शिवाचार्यांनी 'क्रियासार' ग्रंथात मुद्दाम सांगितले की, अष्टावरण जाणणारा पंचाचारपरायण अशा भक्ताने ज्ञानप्राप्तीसाठी वैदिक कर्मे करावीत. पाशवी कर्मे कधीच करू नयेत.

□□

नववा परिच्छेद

# उपसंहार

संपूर्ण ग्रंथात प्रतिपादन केलेल्या विषयाची संक्षेपाने केलेली मांडणी म्हणजे उपसंहार होय. शास्त्रामध्ये एखाद्या वाक्याचे स्पष्टीकरण करताना उपक्रम-उपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फल, अर्थवाद व उपपत्ती या षड्लिंगांद्वारे निर्णय केला जातो. यामध्ये उपक्रम व उपसंहार एकलिंग मानले जाते. 'श्रीसिद्धान्त-शिखामणिसमीक्षा' या शोधप्रबंधाच्या उपक्रमात जे स्पष्ट केले आहे तेच संक्षेपाने येथे उपसंहारामध्ये सांगावे लागणार आहे. या ठिकाणी एक शंका उपस्थित होईल की, जे उपक्रमात सांगितले आहे तेच जर उपसंहारात सांगितले तर पुनरुक्ती होणार आणि उपसंहारात विषयांतर केले तर उपक्रम व उपसंहार हे एकलिंग होणार नाही. याचे समाधान असे करता येईल. उपक्रमातील विषय जर उपसंहारामध्ये आला तर ती पुनरुक्ती मानली जात नाही. कारण नित्यसिद्ध आत्मतत्त्वाचे स्पष्टीकरण करण्यासाठी उपनिषदांत 'तत्त्वमसि श्वेतकेतो' असे नऊ वेळा म्हटले आहे. पहिले वाक्यच बोध दृढ करण्यासाठी श्रीगुरूंनी पुनःपुन्हा उच्चारिले आहे. म्हणून ती पुनरुक्ती मानता येत नाही. ते जसे गुरुकृपेमुळे घडते त्याप्रमाणेच उपक्रमातील विषयवस्तू संक्षेपाने उपसंहारात व्यक्त केली तरी ती पुनरुक्ती मानली जात नाही.

सामान्यतः जगातील सर्व जीवांच्या ठायी अनिष्टांच्या निवृत्तीची आणि इष्टार्थाच्या प्राप्तीची इच्छा असते. सुख हेच सर्वांचे इष्टार्थ होय. त्यामुळे तत्त्वज्ञ 'सर्वेषां अनुकूलतया वेदनीयं सुखम्' असे सुखाचे लक्षण सांगतात. सुख हे नित्य व अनित्य असे द्विविध असते. शब्दस्पर्शादी विषयांमुळे प्राप्त होणारे सुख अनित्य असून मोक्षसुख नित्य आहे. वैषयिक सुखदेखील सर्वांना सर्वकाळ सुख देईलच असे नाही. हिवाळ्यात जे सूर्यकिरण सुखकारक वाटतात तेच उन्हाळ्यात दुःखदायक ठरतात. एकच वस्तू एकासाठी सुखकारक तर दुसऱ्यासाठी दुःखकारक ठरू शकते. केवळ मोक्षच परमसुख देतो. चौऱ्यांशी लक्ष योनींमधून भ्रमण करीत, अनंत दुःखे भोगीत जीव शेवटी मनुष्यजन्माला येतो. मनुष्यशरीरात देखील पुनःपुन्हा अकारण

दु:ख भोगत असलेल्या जीवांना पाहून करुणाशाली गौतम, कणाद, कपिल, पतंजली, जैमिनी, बादरायण आदी महर्षींनी न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा या शास्त्रांची रचना केली. ही सर्व शास्त्रे वेदांना प्रमाण मानणारी असल्यामुळे त्यांना 'वैदिक षड्दर्शने' असे संबोधिले जाते.

मानवसमाजाच्या कल्याणासाठी प्रवृत्त झालेल्या या षड्दर्शनांमध्ये एकमत दिसून येत नाही. आकाशातून पडलेला पाऊस वेगवेगळ्या मार्गांनी वाहात जातो, त्याप्रमाणे ऋषींच्या रुचिभेदानुसार भिन्न भिन्न शास्त्रे निर्माण झाली. ऋषींच्या ह्या रुचिभेदाबद्दल मधुसूदन सरस्वती म्हणतात की, हे ऋषी अज्ञ नव्हते तर सर्वज्ञ होते. परंतु सर्वसामान्य माणसे समबुद्धीची नसल्यामुळे त्या सर्वांना बोध करण्यासाठी ह्या ऋषींनी भिन्न भिन्न शास्त्रे रचली. म्हणून ही सर्व शास्त्रे सन्मान करण्यायोग्य होत. या शास्त्रांत परस्परविरोध नसून ती एकमेकांना पूरक आहेत आणि क्रमश: मुक्तिमार्ग दाखविणारी आहेत. या शास्त्रांमध्ये क्रमविकास कसा आहे ते पाहू.

### षड्दर्शनांतील क्रमविकास

न्याय आणि वैशेषिक ही दोन्ही शास्त्रे तत्त्वज्ञानाने मुक्ती मिळते, असे प्रतिपादन करतात. देहादी अनात्म पदार्थांपासून आत्मा भिन्न असून आत्मा हा अनात्मा नव्हे आणि अनात्मा हा आत्मा नव्हे, हे भेदज्ञान होणे म्हणजे तत्त्वज्ञान होय. आत्मा आणि अनात्मा या दोन्ही तत्त्वांतील भेदांचे ज्ञान आवश्यक आहे, असे ही दोन शास्त्रे मानतात. त्यासाठी या शास्त्रांमध्ये स्थूल अनात्म पदार्थांचे अत्यंत विस्ताराने विवेचन करून त्या पदार्थांपेक्षा जो भिन्न आहे तो आत्मा होय, असे प्रतिपादन केलेले आहे.

सांख्य व योग या दर्शनांत प्रकृती आणि पुरुष यांच्या विवेकज्ञानामुळे मुक्ती मिळते, असे प्रतिपादन केलेले आढळते. या दोन दर्शनांत प्रकृती व पुरुष यांचे विवेचन केलेले आहे. अद्वैत वेदान्तामध्ये ब्रह्मज्ञान हेच मोक्षाचे कारण आहे, असे प्रतिपादन केले आहे. या दर्शनांत जड प्रपंचाचे मिथ्यत्व सांगून ब्रह्मज्ञानाचे दृढीकरण केलेले आहे. न्याय व वैशेषिक आचार्य स्थूल पदार्थांचे तर सांख्य व योगाचार्य सूक्ष्म प्रकृती व पुरुष यांचे विवेकज्ञान कथन करतात. अद्वैत वेदान्तात सूक्ष्मातिसूक्ष्म परब्रह्मज्ञानाचे विवेचन आढळते. अशाप्रकारे षड्दर्शनांमध्ये स्थूल,

सूक्ष्म व सूक्ष्मातिसूक्ष्म असा क्रमविकास दिसून येतो.

या षड्दर्शनांमधील क्रमविकास अधिक विस्ताराने सांगता येईल. आत्मस्वरूपाच्या विवेचनामध्ये संपूर्ण शरीराला आत्मा मानणारे चार्वाक, केवळ इंद्रियांना आत्मा मानणारे एकदेशीय चार्वाक आणि बुद्धीला आत्मा मानणारे बौद्ध यांचे खंडन करून न्याय-वैशेषिक आचार्यांनी शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी यांपेक्षा भिन्न, नित्य व सद्रूप असलेले तत्त्व म्हणजे आत्मा होय, असे सिद्ध केले. आत्मा चिद्रूप नसून तो सद्रूप व नित्य आहे. तो पाषाणासारखा जड आहे. ज्यावेळी आत्म्याचा मनाशी संयोग होतो तेव्हा आत्म्याच्या ठायी ज्ञानगुण उत्पन्न होतो, असे न्याय-वैशेषिक दर्शने म्हणतात. अशा रीतीने नैयायिक-वैशेषिकांचा आत्मा सद्रूप असून ज्ञानादी गुणांचा आधार आहे. परंतु तो ज्ञानरूप मात्र नव्हे.

सांख्य व योग आचार्यांच्या मते, 'असंगो ह्ययं पुरुषः' (बृ.उ. ४.३.१५-१६), 'साक्षी चेता केवलो निर्गुणश्च' (श्वे.उ. ६.११) इत्यादी श्रुतींच्या आधारे आत्मा असंग असल्यामुळे तो कोणत्याही गुणांचा आधार होऊ शकत नाही. म्हणून तो निर्गुण आहे. तो स्वतः सद्रूप व चिद्रूप आहे. न्याय-वैशेषिकांनी आत्म्याला केवळ सद्रूप मानले तर सांख्य-योगाचार्यांनी त्याला सद्रूपाबरोबर चिद्रूपही मानले आहे. सांख्य व योग या शास्त्रांमध्ये आनंद हा सत्त्वगुणाचा परिणाम आहे, असे मानतात. आत्मा निर्गुण असल्यामुळे ते आत्म्याला आनंदरूप मानत नाहीत.

अद्वैत वेदान्तामध्ये 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म:' (तै.उ. २.१), 'विज्ञानमानंदं ब्रह्म' (बृ.उ. ३.९.२८), इत्यादी श्रुतिप्रमाणांनी जो सत् आहे तोच चित् आहे, जो चित् आहे तोच आनंदरूप आहे, असे स्वीकारून आत्म्याला सत्-चित्-आनंदरूप मानले आहे. अशा रीतीने न्याय-वैशेषिक आचार्यांच्या मते आत्मा केवळ सद्रूप आहे, सांख्य-योगाचार्यांच्या मते तो सद्रूपाबरोबर चिद्रूपही आहे आणि अद्वैतवेदान्ताचार्यांच्या मते तो सत्-चित्-आनंदरूप आहे. आत्मा या विषयाचे विवेचन करीत असताना न्यायमतापासून अद्वैतवेदान्तापर्यंत हा क्रमविकास स्पष्टपणे दिसून येतो. यावरून षड्दर्शनांमध्ये अद्वैत वेदान्तदर्शन हे परिपूर्ण आहे असे लक्षात येते. एका नैयायिकाने म्हटले आहे की, 'इदं तु कंटकावरणं तत्त्वं तु बादरायणात्' अर्थात् न्यायदर्शन हे अद्वैतवेदान्ताचे रक्षण करणारे काटेरी कुंपण होय. म्हणून असे म्हणता येईल की, या षड्दर्शनांमध्ये पारमार्थिक मतभेद नसून

षड्दर्शनांची रचना क्रमशः मंद, मध्यम व उत्तम अशा अधिकारी साधकांसाठी झाली आहे.

न्याय-वैशेषिकांच्या मते आकाश, काल, दिक्, आत्मा, मन ही नित्य द्रव्ये आणि पृथ्वी, आप, तेज, वायू ही चार अनित्य द्रव्ये असून त्यांचे परमाणू मात्र नित्य आहेत. अनेक नित्य पदार्थ मानल्यामुळे न्याय व वैशेषिक ही द्वैतदर्शने मानली जातात. त्याप्रमाणेच सांख्य व योग या दर्शनांत प्रकृती व पुरुष ही दोन नित्य तत्त्वे मानल्यामुळे ही दर्शनेदेखील द्वैतदर्शनेच ठरतात. पूर्वमीमांसा दर्शनात प्रपंच व वेद हे प्रवाहरूपी असून नित्य आहेत असे मानल्यामुळे पूर्वमीमांसा हे देखील द्वैतदर्शनच ठरते. अशाप्रकारे न्याय, वैशेषिक, सांख्य, योग व पूर्वमीमांसा ही सर्व शास्त्रे एकापेक्षा अधिक तत्त्वांना नित्य मानणारी असल्यामुळे ती द्वैतदर्शने ठरतात.

उत्तरमीमांसा म्हणजे वेदान्तदर्शनात 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या । जीवो ब्रह्मैव नापरः' (ब्रह्मज्ञानावली, २०) या श्लोकात आद्य शंकराचार्यांनी ब्रह्म, जगत् व जीव या तीन पदार्थांमध्ये ब्रह्म हे सत्य व जग मिथ्या असून जीव ब्रह्मरूपच होय, असे प्रतिपादन केले आहे. या सिद्धान्तात परब्रह्माव्यतिरिक्त अन्य पदार्थांचे अस्तित्व न मानल्यामुळे वेदान्तशास्त्राला अद्वैतदर्शन असे म्हटले जाते.

### द्वैताद्वैत श्रुतिसमन्वय

अशा प्रकारे षड्दर्शनांमध्ये द्वैतप्रतिपादन व अद्वैतप्रतिपादन असल्यामुळे त्यांच्यात खंडन-मंडन चाललेले दिसते. द्वैत व अद्वैत या मतांचा समन्वय साधल्याशिवाय हे खंडन-मंडन थांबत नाही. त्यासाठीच द्वैताद्वैतात्मक आणि विशेषाद्वैतसंज्ञक वीरशैवदर्शनामध्ये या दोन्ही मतांचा समन्वय केलेला आढळतो. वीरशैवदर्शनाचा प्रमुख ग्रंथ असलेल्या 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी

सांख्यं योगः पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा।
एतानि मानभूतानि नोपहन्यानि युक्तिभिः।।
वेदः प्रधानं सर्वेषां सांख्यादिनां महामुने।
वेदानुसरणादेषां प्रामाण्यमिति निश्चितम्।। सि.शि. ५.४-५

या श्लोकांद्वारे जगाला एक संदेश दिला आहे. तो असा की, सांख्यादी

षड्दर्शने वेदानुसारी असून त्यांना वेद हेच मुख्य प्रमाण आहे. त्यामुळे या दर्शनांचे युक्तिप्रयुक्तीने कोणी खंडन करू नये. ही दर्शने वेदांचे अनुसरण करीत असल्यामुळे ती वेदांइतकीच प्रमाण आहेत. असे उदात्त विचार व्यक्त करून खंडन-मंडन करण्यापेक्षा सर्व दर्शनांची उपयोगिता सिद्ध करण्याची गरज आहे, असे त्यांचे मत आहे. षड्दर्शनांचा समन्वय साधण्यासाठी ते पुढे म्हणतात-

वेदैकदेशवर्तिभ्यः सांख्यादिभ्यो महामुने।
सर्ववेदानुसारित्वाच्छैवतंत्रं विशिष्यते।।
शैवतंत्रमिति प्रोक्तं सिद्धान्ताख्यं शिवोदितम्।
सर्ववेदार्थरूपत्वात् प्रामाण्यं वेदवत् सदा।।
सिद्धान्ताख्ये महातंत्रे कामिकाद्ये शिवोदिते।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम्।। सि.शि. ५.७-८

या श्लोकांचे तात्पर्य असे की, द्वैतप्रतिपादक सांख्यादी दर्शनांमध्ये द्वैतप्रतिपादक वेदमंत्रांना प्राधान्य देऊन अद्वैतप्रतिपादक मंत्रांना गौण मानले जाते. याच्या उलट उत्तरमीमांसा शास्त्रात म्हणजे अद्वैतवेदान्तात अद्वैतप्रतिपादक वेदमंत्रांना प्राधान्य देऊन द्वैतप्रतिपादक मंत्रांना गौणत्व दिले जाते. यावरून ही षड्दर्शने वेदैकदेशी म्हणजे वेदातील एका विशिष्ट भागालाच प्रमाण मानतात, असे स्पष्ट दिसते. परंतु प्रत्यक्ष शिवाने प्रतिपादन केलेले सिद्धान्तरूपी शैवतंत्र म्हणजे कामिक-आगमांपासून वातुल-आगमांपर्यंत २८ आगम हे वेदांतील द्वैत आणि अद्वैत अशा दोन्ही मतांना मानणारे आहेत. त्यामुळेच सिद्धान्तागम हे सर्ववेदानुसारी होत. या २८ आगमांच्या उत्तरभागात वीरशैव सिद्धान्ताचे प्रतिपादन केलेले आहे. म्हणून वीरशैव सिद्धान्तदेखील सर्ववेदानुसारी आहे, असे शिवयोगी शिवाचार्य म्हणतात.

### निष्कर्ष

यावरून पुढील निष्कर्ष निष्पन्न होतात. द्वैतसिद्धान्तप्रतिपादक न्याय-वैशेषिक आचार्य 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' (त्रि.म.उ. ३.३) या वाक्यातील एकत्वाबरोबर असलेल्या 'अद्वितीय' या पदाचा अर्थ 'विजातीय पदार्थपेक्षा विलक्षण' असा करतात. तसेच 'सर्वं खल्विदं ब्रह्म' (छां.उ. ३.१४.१) या श्रुतिवाक्याचा 'ब्रह्म सर्व विश्वाला व्यापून आहे, म्हणजे विश्वातील सर्व पदार्थांशी ते संबंधित आहे'

असा अर्थ लावून न्याय-वैशेषिक आचार्य विश्व ब्रह्मरूप नव्हे, असे म्हणतात. जर घटपटादी वस्तूंना ब्रह्मरूप मानले तर ब्रह्म अनित्य व जड ठरेल, अशी त्यांची भूमिका आहे. ते पुढे म्हणतात, 'तत्त्वमसि' (छां.उ. १०.८.७), 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' (मुं.उ. ३.२.९) इत्यादी वाक्यांत सुद्धा जो ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मासमान होतो, परंतु ब्रह्मरूप होत नाही. अशाप्रकारे अद्वैतप्रतिपादक मंत्रांचे गौण अर्थ केले जातात. म्हणून श्रीधर भट्ट म्हणतात, 'अभेदश्रुतयस्तु गौणार्थाः इति दिक्।' (न्यायकंदली, पृ. २१३) म्हणजे अद्वैतपर श्रुती गौणच होत, त्याबद्दल अधिक बोलणेच नको.

याविषयी सांख्य-योगाचार्यांचे मत असे- 'नाद्वैत श्रुतिविरोधः जातिपरत्वात्' (न्यायसूत्रम् १.१५४) या सूत्रामध्ये महर्षी कपिल यांनी, अद्वैतपर श्रुतींनी ज्या द्वैताचा निषेध केला आहे तो सजातीय अशा पुरुषांमधील द्वैताचा केलेला नसून पुरुषापेक्षा विजातीय व जडत्व असलेल्या बुद्धि-चित्त-अहंकारादी प्रकृति-विकृतीमधील भेदांचा केलेला आहे, असे प्रतिपादन केले आहे. अशा रीतीने वास्तविक द्वैतप्रतिपादन करणारी न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा आदी दर्शने द्वैतपर श्रुतींबद्दल आदर बाळगतात, परंतु अद्वैतपर श्रुतींना गौण मानतात. त्यांच्या दृष्टीने द्वैत हा मुख्यार्थ असून अद्वैत हा गौणार्थ आहे. वेदान्तशास्त्राध्ये अद्वैतपर श्रुतींचा मुख्यार्थाने स्वीकार केला असून 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया', (श्वे.उ. ४.६) 'द्वे ब्रह्मणी वेदितव्ये' (त्रि.उ. ५.१७) इत्यादी द्वैतपर श्रुतींना व्यावहारिक द्वैतपर मानले जाते. वेदान्ताच्या दृष्टीने लोकरूढी जे द्वैत मानते तेच द्वैतदर्शने सांगतात. त्यात नाविन्य, अपूर्वता नाही. परंतु अद्वैतपर श्रुती मात्र अपूर्वप्रतिपादक आहे. जे लोकांना अज्ञात आहे ते अद्वैतश्रुती प्रतिपादन करते.

न्याय-सांख्यादी षड्दर्शने वेदांतील एका भागालाच मुख्य मानून दुसऱ्या भागाला गौण मानतात. म्हणून ही षड्दर्शने संपूर्ण वेदानुसारी नाहीत. परंतु वीरशैव सिद्धान्त मात्र वेदांतील द्वैतपर व अद्वैतपर अशा दोन्ही श्रुतींना प्रमाण मानून त्यांचा समन्वय करतो, म्हणून हा सिद्धान्त संपूर्ण वेदानुसारी होय. श्रीपती पंडिताराध्य 'श्रीकरभाष्या'त म्हणतात:-

श्रुत्यैकदेशप्रामाण्यं द्वैताद्वैतमतादिषु।
द्वैताद्वैतमते शुद्धे विशेषाद्वैतसंज्ञिते।

वीरशैवकसिद्धान्ते सर्वश्रुतिसमन्वयः।। श्री.भा., मंगलश्लोक १५

याचा अर्थ असा की, वीरशैवसिद्धान्ताला 'विशेषाद्वैतसिद्धान्त' असे म्हटले जाते. 'विः' याचा अर्थ पक्षी आणि परमात्मा. 'शेष' म्हणजे जीवात्मा. या दोघांचे अद्वैत प्रतिपादन करणारा सिद्धान्त म्हणजे विशेषाद्वैत. 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया' (ब्र.उ. ३४) आणि 'हंस हसेतिः' इत्यादी श्रुतींमध्ये परमात्म्याचे पक्षिरूपात वर्णन केलेले आढळते. तसेच 'यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिंगा व्युच्चरंति' (बृ.उ. २.१.२०) इत्यादी श्रुतींमध्ये जीवात्म्यांना परमात्म्याचे अंश म्हटले आहे. शेष हा शब्द अंशवाचक असल्यामुळे शेष शब्दाने जीवात्म्याचा निर्देश केला आहे. 'यथा नद्यः स्यंद्यमानः समुद्रे अस्तं गच्छन्ति' (मुं.उ. ३.२.८) या मंत्रात श्रुतिसिद्ध जीव-शिवाचे सायुज्य प्रतिपादन केले आहे. म्हणून संसारावस्थेमध्ये जीव व ईश्वर यांच्यात वास्तविक भेद असतो आणि मोक्षदशेमध्ये भ्रमरकीटन्यायाने भ्रमराचे चिंतन करून कीटक जसा भ्रमररूप होतो त्याप्रमाणे निरंतर शिवध्यानामुळे जीव शिवरूप होतो. म्हणून वीरशैवसिद्धान्तात जीव आणि शिव यांच्याविषयीच्या द्वैत व अद्वैत अशा दोन्ही श्रुतींचा समन्वय केलेला आहे. वीरशैवसिद्धान्तात जीव व शिव यांच्यातील भेद सत्य मानल्यामुळे द्वैतप्रतिपादक श्रुतींचा आदर केला जातो, त्याप्रमाणे शिवापासून भिन्न असलेला जीव कीटभ्रमरन्यायाने शिवचिंतन करून शिवस्वरूप होतो. अर्थात् शिवसायुज्य प्राप्त करून घेतो. या अवस्थेत शिव आणि जीव असा भेद राहात नाही. जीवाच्या मुक्तदशेत अद्वैत होत असल्यामुळे वीरशैवसिद्धान्तात अद्वैतप्रतिपादक श्रुतींचाही आदर केलेला आहे. अशा रीतीने द्वैताद्वैतपर श्रुतींचा समन्वय होत असल्यामुळे वीरशैवसिद्धान्त सर्व श्रुतिसमन्वयक होय.

### सगुण-निर्गुणपर श्रुतींचा समन्वय

द्वैताद्वैताचा विचार केल्यानंतर आता ईश्वराच्या सगुण-निर्गुण रूपाचा विचार करू. न्याय-वैशेषिक दर्शनांमध्ये पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, काल, दिक्, आत्मा व मन अशी नऊ द्रव्ये मानली आहेत. यामध्ये आत्मरूपी द्रव्यातच जीवात्मा व परमात्मा समाविष्ट आहेत. गुण व क्रिया यांचा आश्रय म्हणजे द्रव्य. ईश्वर हेदेखील एक द्रव्य असल्यामुळे तो सगुणच असतो. तो निर्गुण असू शकत

नाही, असे न्याय-वैशेषिक आचार्यांचे मत आहे. सांख्यदर्शनाने ईश्वर मानलेलाच नाही. परंतु योगदर्शनाने मात्र पुरुषविशेष म्हणून ईश्वर मानलेला आहे. क्लेश-कर्म-विपाक आदींपासून मुक्त असा पुरुषविशेष म्हणजे ईश्वर. तो सर्वज्ञत्व इत्यादी उत्कृष्ट गुणांनी युक्त असल्यामुळे योगशास्त्रात तो सगुणच होय. न्याय-वैशेषिक व योग या दर्शनांमध्ये ईश्वराच्या सगुणरूपप्रतिपादक श्रुतींचा स्वीकार केलेला असला तरी निर्गुणरूपप्रतिपादक श्रुतींचा अस्वीकार केलेला आहे. त्यामुळे त्यांच्या दृष्टीने ईश्वर निर्गुण नसून सगुण आहे. त्यामुळे ईश्वराच्या सगुण-निर्गुण रूपाच्या संदर्भात ही तिन्ही दर्शने एकदेशीय ठरतात.

अद्वैतवेदान्तामध्ये मायाउपाधियुक्त ब्रह्मतत्त्वाला ईश्वर मानले असून तो सगुण आहे. मायाउपाधिरहित ब्रह्मतत्त्वाला ते निर्गुण मानतात. परंतु त्यांच्या दृष्टीने माया मिथ्या असल्यामुळे मायाउपाधियुक्त सगुण ईश्वरदेखील मिथ्याच ठरतो. अद्वैतवेदान्तात ईश्वर मिथ्या ठरल्यामुळे त्यांनी ईश्वराच्या सगुणप्रतिपादक श्रुतींचा स्वीकार केला असला तरी तो न केल्यासारखाच होय. म्हणून अद्वैतवेदान्तदेखील ईश्वराच्या सगुण-निर्गुणरूपपर श्रुतींचा समन्वय करण्यात एकदेशीयच ठरतो.

परशिव हा शक्तिविशिष्ट म्हणजे विमर्शशक्तीने युक्त आहे, असे वीरशैवदर्शन मानते. चंद्र आणि त्याची प्रभा जसे एकरूप असतात त्याप्रमाणे विमर्शशक्ती शिवाशी अविनाभावसंबंधाने युक्त म्हणजे एकरूप असते. विमर्शशक्तीची दोन रूपे असून विश्वनिर्मिती आधी ती अविभाग-परामर्श अवस्थेत असते आणि सृष्टिकाळात ती विभाग-परामर्श अवस्थेत येते. अविभाग-परामर्श अवस्थेत ती सत्-चित्-आनंदस्वरूपिणी असते आणि विभाग-परामर्श दशेत ती इच्छा-ज्ञान-क्रियारूपिणी असते. विभाग-परामर्श अवस्थेत शक्तिविकास होऊन सृष्टिनिर्मिती होते तर प्रलयकाळात शक्तिसंकोच होऊन ती अविभाग-परामर्श अवस्थेत जाते. शक्तीचा संकोच म्हणजे प्रलय होय. वीरशैवसिद्धान्तात इच्छा-ज्ञान-क्रियारूपिणी शक्तीने युक्त असा परशिव सगुण होय आणि शक्तीच्या संकोचावस्थेतील परशिव हा निर्गुण होय. श्रीपती पंडिताराध्य 'श्रीकरभाष्या'त म्हणतात:-

सृष्टेः पूर्वं महादेवः शक्तिसंकोचहेतुना।
निर्गुणत्वेन शास्त्रेषु गीयते तत्त्ववेदिभिः।।
सृष्ट्यादौ परमेशस्य शक्तेः प्राचुर्यवैभवात्।

सर्वज्ञत्वादिकल्याणगुणवानिति कीर्त्यते।।
तस्माद् द्वैतश्रुतीनां तु सृष्ट्युत्तरसमन्वयः।
अद्वैतश्रुतिबोधस्तु सृष्टेः प्रागेव कथ्यते।।
अथ सत्त्वादिवैशिष्ट्यात् सगुणत्वं सदाशिवे।
तत्साक्षिकत्वात् चिच्छक्त्यानिर्गुणत्वं विधीयते।
सकलो निष्कलश्चेति तस्माद् वेदेषु गीयते।। श्री.भा. १.३.७

या श्लोकाचे तात्पर्य असे की, सृष्टिनिर्मितीपूर्वी शक्तीच्या संकोचावस्थेत महादेव निर्गुण असतो, असे शास्त्रे म्हणतात. सृष्टिनिर्मितीच्या वेळी शक्तिविकासामुळे तो सर्वज्ञत्वादी कल्याणकारक उत्कृष्ट गुणांनी युक्त होऊन सगुण होतो. सृष्टिनिर्मितीनंतरच्या काळात द्वैत आणि सृष्टिनिर्मितीपूर्वीच्या काळात अद्वैत असल्यामुळे वीरशैवसिद्धान्तात द्वैताद्वैत श्रुतींचा समन्वय झालेला आहे.

अशाप्रकारे परशिव सृष्टीआधी निर्गुण आणि सृष्टीनंतर सगुण असतो अशी मान्यता या सिद्धान्तात असल्यामुळे येथे सगुण-निर्गुणप्रतिपादक अशा दोन्ही श्रुतींना समानरूपाने प्रमाण मानून त्यांचा समन्वय साधलेला आहे. याबद्दल आणखी विचार करू.

'निरवद्यं निरंजन' (श्वेताश्वतरोपनिषत् ६.१९) या श्रुतीमध्ये ब्रह्म निर्विकार आहे असे म्हटले आहे. 'बहुस्यां प्रजाययेति' (छां.उ. ६.२.३) या श्रुतींमध्ये ब्रह्माचा परिणामरूपी विकार सांगितला आहे. येथे एक शंका उत्पन्न होते की, ब्रह्म जगद्रूपाने परिणाम पावते की नाही? म्हणजेच ब्रह्म हे जगाचे उपादानकारण आहे किंवा नाही? न्याय-वैशेषिक आचार्यांच्या मते, पंचमहाभूतांचे परमाणू हे सृष्टीचे उपादानकारण असून ईश्वर हे निमित्तकारण होय. सांख्य-योगाचार्यांच्या मते, प्रकृती ही विश्वाचे उपादानकारण असून पुरुष हा निमित्तकारण आहे. पूर्वमीमांसक परमाणू हे विश्वाचे उपादान कारण आणि जीवांचे अदृष्ट हे निमित्तकारण मानतात. अद्वैतवेदान्तात ब्रह्म निर्विकार असल्यामुळे ते विश्वाचे परिणाम-उपादानकारण होत नाही. परंतु ते ब्रह्माला विवर्त-उपादानकारण मानतात.

परिणाम-उपादान म्हणजे दूध परिवर्तित होऊन त्याचे दही होते. म्हणजेच दुधावर परिणाम होऊन त्याचे दही होते. विवर्त-परिणाम म्हणजे सोने हे अलंकाररूपात परिवर्तित होते. परंतु सोने विकृत होत नाही.

न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा व वेदान्त या दर्शनांनी ब्रह्माला अथवा ईश्वराला परिणाम–उपादानकारण न मानल्यामुळे निर्विकारबोधक श्रुतिवाक्यांचे प्रामाण्य सिद्ध झाले तरी त्यांच्या मते 'एकोहं बहुस्यां प्रजायेय' आदी ईश्वराचा परिणाम प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींचे प्रामाण्य सिद्ध होत नाही. त्यामुळे ही दर्शने एकदेशीय ठरतात. वीरशैवदर्शनात

आत्मशक्तिविकासेन शिवो विश्वात्मना स्थित:।
कुटीभावाद्यथा भाति पट: स्वस्य प्रसारणात्।। सि.शि. १०.५

या श्लोकात जगद्गुरू रेणुक भगवत्पादांनी असे म्हटले आहे की, वस्त्र ताणल्यावर तंबूचे रूप धारण करते आणि नंतर त्याचा संकोच झाल्यावर त्याची घडी होते. या क्रियेमुळे वस्त्रामध्ये कोणताही विकार निर्माण होत नाही. त्याप्रमाणे शक्तियुक्त शिव आत्मशक्तीच्या विकासाने विश्वरूप झाला तरी त्यात कोणताच विकार येत नाही. या ठिकाणी अविकृत परिणामवादाचे प्रतिपादन केलेले आहे. विश्वात्मा–अवस्थेत म्हणजे सृष्टिकाळात शिव विश्वरूपात परिणत होत असला तरी तो अविकृतच राहतो. विश्वोत्तीर्ण–अवस्थेत तो निर्विकाररूपात असतो. म्हणून वीरशैवसिद्धान्तात परब्रह्माचे निर्विकारत्व व परिणामित्व प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींचा समन्वय होतो.

**ज्ञान–कर्मसमन्वय**

आणखी एक प्रश्न या ठिकाणी उपस्थित होतो. तो हा की, मोक्षप्राप्तीसाठी ज्ञान हे साधन आहे की कर्म हे साधन आहे? किंवा ही दोन्ही साधने आहेत काय? 'तमेव विदित्वाति मृत्युमेति नान्य: पंथा विद्यतेऽयनाय' ( श्वे.उ. ३.८) या श्रुतीमध्ये ज्ञान हेच मोक्षाचे साधन असून अन्य कोणतेही नव्हे, असे प्रतिपादन करून कर्माचा निषेध केला आहे. 'विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयं सह' (ई.उ. ११) या श्रुतीमध्ये कर्म हेदेखील मोक्षसाधन आहे असे म्हटले आहे. केवळ ज्ञानाने मोक्ष मिळतो की ज्ञान–कर्माने मिळतो, असा प्रश्न येथे उपस्थित होतो. याबद्दल न्याय, वैशेषिक, सांख्य, योग व अद्वैतवेदान्त या दर्शनांत कर्म हे केवळ चित्तशुद्धीचे कारण असून केवळ ज्ञानानेच मोक्ष मिळतो, असे मत व्यक्त केले आहे. परंतु कर्माने मोक्षप्राप्ती होते असे प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींना गौणत्व दिले आहे. वीरशैवदर्शनात असे म्हटले आहे:–

अंधपंगुवदनोन्यसापेक्षे ज्ञानकर्मणी।
फलोत्पत्तौ विरक्तस्तु तस्माद् तद् द्वयमाचरेत्।
ज्ञाने सिद्धेऽपि विदुषां कर्मापि विनियुज्यते।
फलाभिसंधिरहितं तस्मात् कर्म न संत्यजेत्।। सि.शि. ५.४

या श्लोकांचे तात्पर्य असे की, अंध आणि पंगू हे दोघे ज्याप्रमाणे परस्परांवर अवलंबून असतात त्याप्रमाणे ज्ञान आणि कर्म परस्परसापेक्ष असतात. म्हणून कर्मफलाची अपेक्षा न करता ज्ञानी व्यक्तीने कर्म आचरिले पाहिजे. ज्ञानप्राप्ती झाली तरी कर्मत्याग करता येत नाही. ज्ञानाबरोबर कर्म करीत राहिले पाहिजे. वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंगपूजा हे पतिकर्म मानले आहे. यज्ञयागादी हे पशुकर्म असून इष्टलिंगपूजादी हे पतिकर्म होय. यज्ञयागादी हे स्वर्गादी फळे देतात तर इष्टलिंगपूजा लिंगांगसामरस्याची प्राप्ती करून देते. वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंगरूपी कर्म करीत करीत अद्वैतज्ञानप्राप्ती होते. शिवाद्वैत ज्ञान झाल्यावर देखील इष्टलिंगपूजाकर्म त्यागू नये, असा शास्त्रादेश आहे. या सिद्धान्तात ज्ञान व कर्म यांचा समुच्चय असल्यामुळे ज्ञानाने मोक्षप्राप्ती व कर्माने मोक्षप्राप्ती असे प्रतिपादन करणाऱ्या दोन्ही श्रुतींचा समन्वय झालेला आहे.

अशा प्रकारे ज्या ज्या ठिकाणी द्वैत आणि अद्वैत दर्शने परस्परविरुद्धार्थ श्रुतींमुळे कलह करतात त्या त्या ठिकाणी वीरशैवाचार्य समन्वय साधून कलह दूर करतात.

प्रस्तुत प्रबंधात प्रसंगानुसार श्रुतींचा समन्वय दर्शविला आहे. हा सर्व भाग उपसंहारातील असल्यामुळे येथे श्रुतिसमन्वयाचे केवळ दिग्दर्शन केले आहे. या विषयाचा विस्तार प्रबंधाच्या प्रमुख प्रकरणांत पाहावयास मिळेल. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त प्रतिपादन केलेले वीरशैवदर्शन हे कोणत्याही अन्य दर्शनाच्या खंडनासाठी प्रवृत्त झाले नसून ते समन्वय साधणारे आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. हेच वीरशैवदर्शनाचे वैशिष्ट्य होय.

वीरशैवदर्शन 'एकेन जन्मना मुक्तिः वीराणां तु महेश्वरी' या आगमोक्तीप्रमाणे पुनर्जन्माचा स्वीकार करीत नाही. आणवादी मलांचे आवरण हे पुनर्जन्माचे कारण होय. त्रिविध दीक्षेमुळे मलत्रयांचे निवारण होऊन जीव एकाच जन्मात मोक्ष प्राप्त करून घेतो. म्हणून त्याला पुनर्जन्म मिळत नाही.

स्त्री-पुरुष, जाति-वर्ण आदी भेद न करता सर्वांना समानरूपाने दीक्षा देण्यात येते. विशेषत: स्त्री-पुरुषांना दीक्षेत समान अधिकार असल्यामुळे वीरशैवसिद्धान्त सर्वांना सामावून घेतो. या सिद्धान्तामध्ये इष्टलिंगदीक्षा घेतलेला साधक 'लिंगधारी सदा शुचि:' या उक्तीप्रमाणे सर्वदा पवित्र असतो. म्हणून त्याला पंचसूतके बाधक ठरत नाहीत. धर्मशास्त्रामध्ये जनन, मरण, रज:, जाती व उच्छिष्ट अशी पंचसूतके मानली आहेत. स्त्रियांना ऋतुकाळात चार दिवस रज:सूतक आणि प्रसूतिकाळात बारा दिवस जननसूतक पाळावे लागते. घरात मृत्यू झाला तर १३ दिवस मरणसूतक पाळावे लागते. या काळात कोणतेही धार्मिक कार्य करू नये धर्मशास्त्रात म्हटले आहे. परंतु वीरशैवसिद्धान्तात लिंगधारी स्त्री सूर्य व अग्नीप्रमाणे सदा पवित्र असल्यामुळे तिला इष्टलिंगपूजेसाठी सूतक पाळण्याची गरज नाही. तसेच घरात मृत्यू झाला तरी कुटुंबियांना मरणसूतक बाधत नाही. त्याही काळात त्यांनी लिंगपूजा केलीच पाहिजे, असे वीरशैवदर्शन सांगते. पादोदक-प्रसादसेवनात उच्छिष्टसूतक आणि इष्टलिंगदीक्षा घेतल्यावर जातिसूतक नाही.

भारतीय षड्दर्शनांमध्ये विविध विषयांवर मतभेद असताना वीरशैवाचार्यांनी मात्र खंडन-मंडन न करता सर्व विचारांचा समन्वय साधून एक आदर्श सर्वांसमोर ठेवला. दर्शन म्हणजे तत्त्वज्ञान. तत्त्वदर्शनामुळे मानवाला मन:शांती लाभावी अशी अपेक्षा आहे. परंतु खंडन-मंडनामुळे अशांती उत्पन्न होते. म्हणून खंडन-मंडन टाळून वीरशैवाचार्यांनी सर्व तत्त्वविचारांचा समन्वय केला आहे.

सर्वे भवन्तु सुखिन: सर्वे सन्तु निरामया:।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दु:खभाग्भवेत्।।

या उक्तीप्रमाणे विश्वकुटुंबभावनायुक्त वीरशैवाचार्यांनी 'श्रीसिद्धान्त-शिखामणी'मध्ये प्रतिपादन केलेला वीरशैवसिद्धान्तच सर्वांना हितकारक आणि सर्वांचा अभ्युदय करणारा होय.

इति शिवम्।

□□

# संदर्भग्रंथ –संकेतसूची

| | | | |
|---|---|---|---|
| अ.सू. | अनुभवसूत्र | न्या.कं. | न्यायकंदली |
| ई.उ. | ईशावास्योपनिषद | न्या.कु. | न्यायकुसुमांजली |
| क.उ. | कठोपनिषद | न्या.सा. | न्यायसार |
| कि.र. | किरणावली | न्या.सू. | न्यायसूत्रम् |
| कुला. | कुलार्णव | न्या.सू.भा. | न्यायसूत्रभाष्यम् |
| कू.पु. | कूर्मपुराण | न्या.सू.वा. | न्यायसूत्रवार्तिकम् |
| क्रि.सा. | क्रियासार | पा.आ. | पारमेश्वरागम |
| कौषी | कौषीतकिब्राह्मणोपनिषद | पा.सू. | पाणिनिसूत्रम् |
| गु.वं.का. | गुरुवंशकाव्यम् | पा.स्मृ. | पाराशरस्मृती |
| चं.आ. | चंद्रज्ञानागम | प्र.पा.भा. | प्रशस्तपादभाष्यम् |
| छां.उ. | छांदाग्योपनिषद | बृ.उ. | बृहदारण्यकोपनिषद |
| तं.नि. | तंत्राधिकारनिर्णय: | ब्र.उ. | ब्रह्मविद्योपनिषद |
| त.प्र. | तत्त्वप्रदीपिका | ब्र.सू. | ब्रह्मसूत्रम् |
| त.भा. | तर्कभाषा | ब्र.सू.भा. | ब्रह्मसूत्रभाष्य भामती टीका |
| त.सं. | तर्कसंग्रह | ब्र.सू.शा.भा. | ब्रह्मसूत्र शांकरभाष्य |
| त्रि.ता. | त्रिपुरोतापिन्युपनिषद | ब्र.शां. | ब्रह्मसूत्रशांकरीवृत्ती |
| त्रि.म.ना. | त्रिपाद्विभूतिमहा–नारायणोपनिषद | भ.गी. | भगवद्गीता |
| | | भ.गी.म. | भगवद्गीता मधुसूदनी |
| तै.उ. | तैत्तिरीयोपनिषद | भ.सं.उ. | भवसंतरकोपनिषद |
| द.श्लो. | दशश्लोकी | भास्करी | भास्करी |
| दे.क्ष.स्तो. | देव्यपराध क्षमापन स्तोत्र | म.भा. | महाभारत |
| नै.ष. | नैषधीयचरितम् | म.स्तो. | महिम्नस्तोत्र |

| | |
|---|---|
| मा.मे. | मानमेयोदय: |
| मुं.उ. | मुंडकोपनिषद |
| यो.सू. | योगसूत्रम् |
| यो.सू.भा. | योगसूत्रभाष्य |
| यो.सू.वा. | योगसूत्रवार्तिकम् |
| र.वं. | रघुवंशमहाकाव्यम् |
| लिं.सा. | लिंगसार |
| वा.पु. | वायुपुराण |
| वा.तं. | वातुलशुद्धतंत्र |
| वी.आ.चं. | वीरशैवानंदचन्द्रिका |
| वी.ध.शि. | वीरशैवधर्म–शिरोमणी |
| वी.स.सं. | वीरशैवसदाचारसंग्रह |
| वै.सू. | वैशेषिक सूत्र |
| श.वि.द. | शक्तिविशिष्टाद्वैत दर्शन |
| श.वि.सि. | शक्तिविशिष्टाद्वैतसिद्धान्त |
| शां.उ. | शांडिल्योपनिषद |
| शा.दी. | शास्त्रदीपिका |
| शि.द. | शिवाद्वैतदर्पण |
| शि.प. | शिवाद्वैतपरिभाषा |
| शि.पु. | शिवपुराण |
| शि.त.र. | शिवतत्त्वरत्नाकर |
| शि.मं. | शिवाद्वैतमंजरी |
| शि.सू.वि. | शिवसूत्रविमर्शिनी |
| श्वे.उ. | श्वेताश्वतर उपनिषद |
| श्लो.वा. | श्लोकवार्तिकस्य न्यायरत्नाकरव्याख्या |
| श्री.भा. | श्रीकरभाष्य |
| ष.स. | षड्दर्शनसमुच्चय |
| स.द.सं. | सर्वदर्शनसंग्रह |
| सां.का. | सांख्यकारिका |
| सां.सू. | सांख्यसूत्र |
| सि.चं. | सिद्धान्तचंद्रोदय |
| सि.शि.उ. | सिद्धान्तशिखोपनिषद |
| सि.शि. | श्रीसिद्धान्तशिखामणी |
| सू.आ. | सूक्ष्मागम |
| स्कं.पु. | स्कंदपुराण |
| स्या.मं. | स्याद्वादमंजरी |
| ह.ना. | हनुमन्नाटकम् |



# संदर्भग्रंथसूची

## संस्कृत


०१. अद्वैतब्रह्मसिद्धिः, कलकत्ता विश्वविद्यालय, कलकत्ता, १९३२

०२. अद्वैतसिद्धिः, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९३७

०३. अनुभवसूत्रम् (तन्त्रसंग्रहः, भाग १), सं० सं० वि० वि० वाराणसी, १९७०

०४. अमरकोशः, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९६९

०५. अर्थसंग्रहः, चौखम्बा संस्कृत सीरीज, वाराणसी, १९७६

०६. ईशाद्यष्टोत्तरपनिषदः, नि० सा० प्रेस, मुंबई, १९२५

०७. ईशावास्योपनिषत् शांकरीव्याख्या, शंकरविलास संस्कृत पाठशाला, मैसूर, १९७६

०८. उपनिषद्वाक्यमहाकोशाः, गुजराती प्रिंटिंग प्रेस, मुंबई, १९४०

०९. ऋग्वेदसंहिता, वैदिक संशोधन मण्डल, पुणे, १९४१

१०. एकाक्षरनामकोषसंग्रह, राजस्थान प्राच्यविद्या प्रतिष्ठान, जोधपूर, १९६४

११. कारिकावली, मुक्तावली-प्रभा-दिनकर्यादिटीकासमन्विता, बाल-मनोरमा प्रेस, मद्रास, १९२३

१२. किरणावली, उदयनाचार्यकृता, रघुनाथ चटर्जी स्ट्रीट, कलकत्ता, १९६३

१३. किरातार्जुनीयम्, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९२२

१४. कुलार्णवतन्त्रम्,मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९७५

१५. क्रियासारः, भाग १-३, प्राच्यविद्या संशोधनालय, मैसूर, १९५४-५७-५८ इ०

१६. गुरुवंशकाव्यम्, वाणीविलास मुद्रणालय, श्रीरंगम्

१७. चंद्रज्ञानागमः, काशीनाथ ग्रंथमाला, मैसूर, १९५६

१८. तत्त्वचिन्तामणिः, मोतीलाला बनारसीदास, दिल्ली, १९७४

१९. तत्त्वप्रदीपिका (चित्सुखी), उदासीन संस्कृत विद्यालय, काशी, १९५६

२०. तत्त्वावली, चन्द्रकान्ततर्कालंकारकृता, कलकत्ता, १९२६ वि०सं०

२१. तन्त्रयात्रा, रत्ना प्रकाशन, कमच्छा, वाराणसी, १९८२

२२. तन्त्राधिकारनिर्णयः, राजराजेश्वरी मुद्रणालय, वाराणसी, १९४५ वि०सं०
२३. तन्त्रालोकः, काश्मीर संस्कृत ग्रन्थावलिः, श्रीनगर, १९३६
२४. तर्कभाषा, चौखम्बा संस्कृत संस्थान, वाराणसी, १९७७
२५. तर्कभाषा, आचार्यबदरीनाथशुक्लकृतहिन्दीटीकायुता, मोतीलाल बनारसीदास, वाराणसी, १९७६
२६. तर्कसंग्रहः, नवटीकोपेतः, चौखम्बा संस्कृत संस्थान, वाराणसी, १९७६
२७. नयविवेकः, मद्रास विश्वविद्यालय, मद्रास, १९३७
२८. नैषधीयचरितम्, निर्णयसागर प्रेस, मुंबई १९२८
२९. नैष्कर्म्यसिद्धिः, बनारस संस्कृत सीरीज, बनारस, १८९०
३०. न्यायकुसुमांजलिः, सं०सं०वि०वि०, वाराणसी, १९७३
३१. न्यायकोषः, भांडारकर प्राच्यविद्या संशोधनालय, पुणे, १९२८
३२. न्यायदर्शनम्, चौखम्बा संस्कृत संस्थान सीरीज, वाराणसी, १९७०
३३. न्यायदर्शनम्, भाष्य-वार्त्तिक-तात्पर्यटीकासहितम्, एम०पी०एण्ड पी०एच० कलकत्ता, १९३६
३४. न्यायभूषणम्, षड्दर्शनप्रकाशनप्रतिष्ठानम्, वाराणसी, १९६८
३५. न्यायमंजरी, चौखम्बा संस्कृत संस्थान सीरीज, वाराणसी, १९७१
३६. न्यायसारः, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९१०
३७. न्यायसुधा, चौखम्बा संस्कृत संस्थान सीरीज, वाराणसी, १९०९
३८. न्यायसूत्रवृत्तिः, मेडिकल हाल प्रेस, बनारस
३९. न्यायलीलावती, चौखम्बा संस्कृत संस्थान सीरीज, वाराणसी, १९३४
४०. पंचदशी, भार्गव पुस्तकालय, वाराणसी, १९५६
४१. पातंजलयोगदर्शनम्, चौखम्बा संस्कृत संस्थान सीरीज, वाराणसी, १९७०
४२. पारमेश्वरतन्त्रम्, वीरशैवब्राह्मणग्रन्थमाला, सोलापुर, १९०४
४३. पाराशरस्मृतिः श्रीवेंकटेश्वर स्टीम प्रेस, मुंबई, १९८१ वि०सं०
४४. प्रकरणपंजिका, चौखम्बा संस्कृत संस्थान सीरीज, वाराणसी, १९०४

४५. प्रकरणपंचिका, न्यायसिद्धव्याख्यासंवलिता, काशी हिन्दू विश्वविद्यालय, वाराणसी, १९६१
४६. प्रत्यभिज्ञाहृदयम्, मोतीलाल बनारसीदास, वाराणसी, १९७३
४७. प्रभाकरविजयः, संस्कृत साहित्य परिषत्, कलकत्ता, १९२६
४८. प्रशस्तपादभाष्यम्, न्यायकन्दलीसंवलितम्, सं०सं०, वि०वि०, वाराणसी, १९७७
४९. प्रस्थानभेदः, आनन्दाश्रम, पुणे, १९७७
५०. बृहदारण्यकवार्त्तिकसारः, १-२ भाग, अच्युत ग्रन्थमाला, वाराणसी, १९७७
५१. बृहदारण्यकोपनिषत्, शांकरभाष्यम्, गीताप्रेस, गोरखपूर
५२. ब्रह्मसूत्रपूर्णप्रज्ञभाष्यम्, श्रीनिम्बार्क पीठ, प्रयाग, २०३१ वि०सं०
५३. ब्रह्मसूत्रशांकरभाष्यम्, रत्नप्रभा-भामती-न्यायनिर्णयव्याख्यात्रयोपेतम्, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९०९
५४. ब्रह्मसूत्रशांकरीवृत्तिः, शंकरविलास संस्कृत पाठशाला, मैसूर, १९७४
५५. ब्रह्मसूत्रश्रीकरभाष्यम्, १-२ भाग, प्राच्यविद्या संशोधनालय, मैसूर, १९७७
५६. भास्करी, सरस्वतीभवन टेक्स्ट नं० ८३, इलाहाबाद, १९५०
५७. मनुस्मृतिः, मन्वर्थमुक्तावलीसमेता, खेमराज श्रीकृष्णदास, मुंबई, १९४५ वि०सं०
५८. महाभारतम् (वनपर्व, शान्तिपर्व), चित्रशाला प्रेस, पुणे, १९३०, १९३२
५९. मानमेयोदयः, षड्दर्शनप्रकाशनप्रतिष्ठानम्, वाराणसी, १९७८
६०. मीमांसादर्शनम्, शाबरभाष्यसहितम्, आनन्दाश्रम, पुणे, १९७६
६१. मीमांसान्यायप्रकाशः, भाण्डारकर प्राच्यविद्या संशोधनालय, पुणे, १९७२
६२. याज्ञवल्क्यस्मृतिः, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९४२
६३. योगवासिष्ठः, भाग १-२, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९१८
६४. योगसारसंग्रहः, मोतीलाल बनारसीदास, वाराणसी, २०१४ वि०सं०
६५. योगसूत्रभाष्यम्, तत्त्ववैशारदीसहितम्, जीवानन्द विद्यासागर, कलकत्ता, १९४०
६६. योगसूत्रभोजवृत्तिः, जीवानन्द विद्यासगर, कलकत्ता, १९३६
६७. रघुवंशमहाकाव्यम्, छन्नूलाल ज्ञानचन्द पाठक, वाराणसी

६८. रत्नत्रयम्, वाणीविलास मुद्रणालय, श्रीरंगम्, १९२३
६९. लिंगधारणचन्द्रिका, जंगमवाडी मठ, वाराणसी, १९०५
७०. वातुलशुद्धाख्यतन्त्रम् (तन्त्रसंग्रहः, भाग) सं०सं०वि०वि०, वाराणसी, १९७०
७१. वायुपुराण, खेमराज श्रीकृष्णदास, मुंबई, १९३३
७२. विवरणप्रमेयसंग्रहः, अच्युत ग्रन्थमाला, वाराणसी, १९९६ वि०सं०
७३. विशेषार्थप्रकाशिका, मुरुघामठ, धारवाड, १९६१
७४. विष्णुपुराण, खेमराज श्रीकृष्णदास, मुंबई, १९३३
७५. वीरशैवधर्मशिरोमणिः, कन्यका परमेश्वरी प्रेस, मैसूर, १९०८
७६. वीरशैवसदाचारसंग्रहः, वीरशैवलिंगब्राह्मणग्रन्थमाला, सोलापूर, १९०५
७७. वीरशैवानन्दचन्द्रिका, मुरुसाविर मठ, हुबळी, १९३६
७८. वेदान्तकल्पलतिका, भाण्डारकर प्राच्यविद्या संशोधनालय, पुणे, १९६२
७९. वेदान्तपरिभाषा, चौखम्भा विद्याभवन, वाराणसी, १९७७
८०. वेदान्तसारः, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९३४
८१. वेदान्तसारवीरशैवाचिन्तामणिः, वी०लिं०ब्रा० ग्रन्थमाला, सोलापूर, १९०५
८२. वेदान्तसिद्धान्तमुक्तावली, जीवानन्द विद्यासागर, कलकत्ता, १९३५
८३. वैराग्यशतकम्, चौखम्बा विद्याभवन, वाराणसी, १९६७
८४. वैशेषिकसूत्ररसायनव्याख्या, व्हि० एस्० वेंकट राघवाचार्य, मद्रास, १९५८
८५. वैशेषिकसूत्रोपस्कार, चौखम्बा संस्कृत संस्थान, वाराणसी, १९६९
८६. शक्तिविशिष्टाद्वैतदर्शनम्, रम्भापुरी संस्थान मठ, बोलेहोन्नूर, १९६१
८७. शंकरदिग्विजयः, ज्ञानमन्दिर, हरिद्वार, २००० वि०सं०
८८. शास्त्रदीपिका, निर्णयसागर प्रेस, बम्बई, १९१५
८९. शिवगीता, पीताम्बरा पीठ, दतिया, १९६०
९०. शिवतत्त्वरत्नाकरः, बी० एम्० नाथ एण्ड कं०, मद्रास, १९२७
९१. शिवतत्त्वरत्नाकरः, भाग १-२ प्राच्यविद्या संशोधनालय, मैसूर, १९६४, १९६९
९२. शिवमहापुराणम्, पण्डित पुस्तकालय, काशी, २०२० वि०सं०

९३. शिवसूत्रविमर्शिनी, काश्मीर संस्कृत ग्रन्थावलि, श्रीनगर, १९९१
९४. शिवाद्वैतदर्पणः, पूवल्ली बृहन्मठ ग्रन्थमाला, मैसूर, १९६४
९५. शिवाद्वैतपरिभाषा, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर, १९६४
९६. शिवाद्वैतमंजरी, वीरशैवलिंगिब्राह्मणग्रन्थमाला, सोलापूर, १९०९
९७. शिवाद्वैतमंजरी, कन्नडटीकासहिता, काशीनाथ ग्रन्थमाला मैसूर १९३४
९८. श्रीकरभाष्यचतुःसूत्री, जंगमवाडी मठ, वाराणसी, १९५६
९९. श्रीमद्भगवद्गीता, अष्टटीकोपेता, मुंशीराम मनोहरलाल पब्लिशर्स प्रा० लि०, नवी दिल्ली, १९७८
१००. श्रीमद्भगवद्गीता, शंकरानन्दीव्याख्योपेता, अच्युत ग्रन्थमाला, वाराणसी, २०२० वि०सं०
१०१. श्रीमद्भागवतम्, श्रीभागवत विद्यापीठ, अहमदाबाद, २०२९, २०३१ वि०सं०
१०२. श्रीशंकराचार्यविरचितप्रकरणग्रन्थाः, ओरिएन्टल बुक एजंसी, पुणे, १९५२
१०३. श्लोकवार्त्तिकम्, न्यायरत्नाकरव्याख्यायुतम्, रत्ना पब्लिकेशन्स, वाराणसी, १९७८
१०४. षड्दर्शनसमुच्चयः, चौखम्बा संस्कृत सीरीज, वाराणसी, १९०५
१०५. संस्कृतसाहित्यविमर्शः, पं० द्विजेन्द्रनाथशास्त्रिकृतः, भारती प्रतिष्ठान, मेरठ, १९५६
१०६. संक्षेपशारीरकम्, उदासीन संस्कृत विद्यापीठ, वाराणसी, २०१५ वि०सं०
१०७. सप्तपदार्थी, कलकत्ता संस्कृत सेरीज, कलकत्ता, १९३४
१०८. सर्वदर्शनसंग्रहः, चौखम्भा विद्याभवन, वाराणसी, १९६४
१०९. सर्वमतसंग्रहः, त्रिवेन्द्रम् संस्कृत सीरीज, त्रिवेन्द्रम्
११०. सांख्यतत्त्वकौमुदी, सारबोधिनीयुता, नि०सा० प्रेस, मुंबई, १९४०
१११. सांख्ययोगकोशः, आचार्यकेदारनाथत्रिपाठिकृतः, का० हि० वि० वि०, वाराणसी, १९७४
११२. सांख्यसूत्रप्रवचनभाष्यम्, जीवानन्द विद्यासागर, कलकत्ता, १९३५
११३. सांख्यसूत्रानिरुद्धवृत्ति, जीवानन्द विद्यासागर, कलकत्ता, १९३५

११४. सारस्वती सुषमा (त्रैमासिक अनुसंधानपत्रिका), सं०सं०वि०वि०, वाराणसी
११५. सिद्धान्तकौमुदी, चौ०सं०सी०, वाराणसी, १९६६
११६. सिद्धान्तचन्द्रोदयः (तर्कसंग्रहव्याख्या), नि०सा०प्रे०, मुंबई, १८२२ श०सं०
११७. सिद्धान्तबिन्दुः, दक्षिणामूर्ति मठ, वाराणसी, १९७८
११८. सिद्धान्तलेशसंग्रहः, अच्युत ग्रंथमाला, वाराणसी, २०११ वि०सं०
११९. सिद्धान्तशिखामणिः तत्त्वप्रदीपिकाव्याख्यासहितः, भाग १-२, वीरशैव लिंगि-ब्राह्मणग्रन्थमाला, सोलापूर, १९०५
१२०. एन्० आर० करिबसवशास्त्रिकृतः कन्नडतात्पर्यप्रदीपिकासहितः, वीरशैवग्रन्थ-प्रकाशिकाग्रन्थावलिः, मैसूर, १९२१
१२१. काशीनाथशास्त्रीकृतभावप्रकाशाख्यकन्नडव्याख्यासहितः, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर, १९७२
१२२. सिद्धान्तशिखोपनिषद्वीरशैवभाष्यम्, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर, १९३०
१२३. सुप्रभेदागमान्तर्गतपंचाचार्यपंचमोत्पत्तिप्रकरणम्, वीरशैवलिंगब्राह्मणग्रन्थमाला, सोलापूर १९०३
१२४. सूक्ष्मागमः, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर, १९५६
१२५. स्कन्दपुराणम्, खेमराज श्रीकृष्णदास, मुंबई, १९६५ वि०सं०
१२६. स्याद्वादमंजरी, श्रीमद्रामचन्द्र आश्रम, बोरिया (गुजरात), १९७०
१२७. हनुमन्नाटकम्, चौखम्बा संस्कृत सीरीज, वाराणसी १९७८

**हिंदी**

१२८. कल्याण मासिक पत्रिका, 'शिवांक' गीताप्रेस, गोरखपूर, १९९० वि०सं०
१२९. निरीश्वरवाद भारतीय एवं पाश्चात्त्य, बिहार हिन्दी ग्रन्थ अकादमी, पटना, १९७३
१३०. न्यायपरिचय, म०म० पणिभूषण तर्कवागीश कृत, चौखम्बा विद्याभवन, वाराणसी, १९६८
१३१. न्यायप्रकाश, लक्ष्मीवेंकटेश्वर स्टीम प्रेस, मुंबई, १९३४

१३२. बसवेश्वर के वचन, १-२ भाग, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड, १९७८
१३३. भारतीय दर्शन, चटर्जी एवं दत्त, पुस्तक भाण्डार, पटणा, द्वि. संस्करण
१३४. भारतीयदर्शन, आचार्य बलदेव उपाध्याय, चौखम्भा ओरियण्टालिया, वाराणसी
१३५. भारतीयदर्शन, भाग २, डॉ. राधाकृष्णन्, राजपाल अॅण्ड सन्स, दिल्ली, १९७२
१३६. भारतीयदर्शन का इतिहास, भाग १, डॉ० एस्० एन्० दासगुप्त, राजस्थान हिंदी ग्रंथ अकादमी, जयपूर, १९७८
१३७. भारतीय दर्शन में मोक्ष चिन्तन, अशोककुमार लाड
१३८. भारतीय न्यायशास्त्र एक अध्ययन, डॉ० ब्रह्ममित्र अवस्थी, इन्द्र प्रकाशन, दिल्ली, १९६७
१३९. विचारचन्द्रोदय, पीताम्बरजी, कर्नाटक प्रेस, मुंबई, १८१९
१४०. विचारसागर, खेमराज श्रीकृष्णदास, मुंबई, १९६२
१४१. विभिन्न धर्मों में ईश्वरकल्पना, डॉ० प्रभाकर माचवे तथा सुरेन्द्र नारायण दफ्तुआर, बिहार हिंदी अकादमी, १९७४
१४२. वृत्तिप्रभाकर, आनन्दकुटीर ट्रस्ट, पुष्कर, २०३६ वि०सं०
१४३. वैशेषिकदर्शनः एक अध्ययन, श्रीनारायण मिश्र, चौखम्बा संस्कृत सीरीज, वाराणसी, १९६८
१४४. शक्तिविशिष्टाद्वैतसिद्धान्त, जंगमवाडी मठ, वाराणसी, १९३७
१४५. शैवमत, डॉ० यदुवंशी, बिहार राष्ट्रभाषा परिषत्, पटणा, १९५५
१४६. हिन्दुत्व, रामदास गौड, शिवप्रसाद गुप्त, सेवा उपवन, वाराणसी, १९३८

**कन्नड**

१४७. अष्टावरणविवेक, श्री ष०ब्र० शंभुलिंग शिवाचार्य, बिजापूर, १९२३
१४८. मणिकान्ति, डॉ०ज०च०नि०, एस्० एस्० चित्तरगी, बागलकोट, १९५१
१४९. मणिमुकुर प्रभे, ताराग्रन्थ प्रकाशन, धारवाड, १९७६
१५०. महादेवियक्कन वचनगलु, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड, १९७३

१५१. वचनगलल्लि वीरशैवधर्म, डॉ० एच० तिप्पेरुद्रस्वामी, डि०वि०के० मूर्ति, मैसूर, १९६९

१५२. वीरशैवसाहित्य मत्तु इतिहास, भाग १, बी० शिवमूर्तिशास्त्री, शरणसाहित्य कार्यालय, बंगलोर, १९६२

१५३. श्रीमद्रजगद्गुरुपंचाचार्यरे वीरशैवमत स्थापकरु, श्रीचन्द्रशेखर शास्त्री, रायचूर, १९७१

१५४. सिद्धराम शिवयोगि, कन्नड शोधप्रबन्ध, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड, १९७५

१५५. सिद्धान्तशिखामणि सौन्दर्यदर्शन, डॉ० ज०च०नि०, १९७६

१५६. हिन्दुदर्शनसार. श्रीनिवासाचार्य, मैसूर विश्वविद्यालय, मैसूर, १९४०

**मराठी**

१५७. वीरशैवरत्न, काशीनाथशास्त्री, जंगमवाडी मठ, वाराणसी, १९५२

**इंग्रजी**

१५८. इण्डियन फिलॉसॉफी, वॉल्यूम २, राधाकृष्णन्, डी० आर० भागी फॉर ब्लॅकी ॲण्ड सन्स प्रा० लि०, मुंबई, १९७७

१५९. इन्ट्रोडक्शन टू श्रीकरभाष्य, वॉल्यूम १, सी० हयवदन राव, बंगलोर, १९३६

१६०. अ हिस्ट्री ऑफ इण्डियन फिलॉसॉफी, वॉल्यूम ५, डॉ० एस० एन० दासगुप्त, केम्ब्रीज युनिवर्सिटी प्रेस, १९५५

१६१. अ हिस्ट्री ऑफ साउथ इण्डिया, के० ए० नीलकंठशास्त्री, ऑक्सफोर्ड युनिवर्सिटी प्रेस, १९६६

१६२. अ हॅण्डबुक ऑफ वीरशैविजम, एस०सी० नन्दीमठ, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९७९

१६३. दी इण्डियन रिव्यू, (जर्नल), वॉल्यूम १६, मे १९१५, मद्रास



# शैवभारती शोधप्रतिष्ठान

जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तरप्रदेश)२२१ ००१

## प्रकाशित ग्रंथ

| ग्रंथनाम | लेखक / संपादक | मूल्य रु. |
|---|---|---|
| १. लिंगधारणचंद्रिका (संस्कृत-मराठी) | नंदिकेश्वर शिवाचार्य | १२५ |
| २. ब्रह्मसूत्रश्रीकंठभाष्यम् (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ३. वीरशैव अष्टावरण विज्ञान (हिंदी व मराठी) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | ५० |
| ४. सिद्धान्तशिखामणिसमीक्षा (संस्कृत) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | २०० |
| ५. निगमागम संस्कृति (हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ६. सूक्ष्मागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १२५ |
| ७. चंद्रज्ञानागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १७५ |
| ८. मकुटागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १०० |
| ९. कारणागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. रामचंद्र पाण्डेय | १५० |
| १०. निगमागमीयसंस्कृतिदर्शनम् (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २०० |
| ११. पारमेश्वरागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २०० |
| १२. **Chandrajnanagama** (Sanskrit-English) | Tr. by Dr. Rama Ghose | 300 |
| १३. ईशावास्योपनिषद् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | १०० |
| १४. केनोपनिषद् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | १५० |
| १५. सिद्धान्तप्रकाशिका (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ७५ |
| १६. **Makutagama** (Sanskrit-English) | Tr. by Dr. Rama Ghose | 150 |
| १७. शक्तिविशिष्टाद्वैततत्त्वत्रयविमर्शः (संस्कृत) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | २०० |

१८. **अनुभवसूत्रम्** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. जगन्नाथशास्त्री मुसलगांवकर १२५

१९. **सिद्धान्तशिखोपनिषद्** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग २५०

२०. **ब्रह्मसूत्रशांकरीवृत्तिः** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. केदारनाथ त्रिपाठी १५०

२१. **सिद्धान्तसारावलिः** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी ४००

२२. **श्रीगुरुगीता** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी १२५

२३. **शिवाद्वैतदर्पणः** (संस्कृत-हिंदी) शिवानुभव शिवाचार्य १००

२४. **सिद्धान्तशिखामणी मीमांसा** (संस्कृत-हिंदी) संपा. पं व्रजवल्लभ द्विवेदी २५०

२५. **देवीकालोत्तरागमः** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी १००

२६. **Paramesvaragama** (English) Tr. by Dr. Rama Ghose 550

२७. **संस्कृत वाङ्मय में वीरशैव साहित्य** (हिंदी) एस.अक्कुरमठ, संपा.प्रभुनाथ द्विवेदी १५०

२८. **ऋग्वेदस्यप्रथममंडलस्य सयणवेंकटमाधव-**
**भाष्ययोस्तुलनात्मकमध्ययनम्** (संस्कृत-हिंदी) डॉ. प्रमोदिनी पण्डा ४००

२९. **तंत्रागमीय धर्मदर्शन** (भाग १ व २) (संस्कृत-हिंदी) पं. व्रजवल्लभ द्विवेदी ९००

३०. **साम्ययोगमीमांसा** (संस्कृत-हिंदी) मुकुट बिहारीलाल ३००

३१. **भारतीय संस्कृति का समग्र स्वरूप** (हिंदी) पं. व्रजवल्लभ द्विवेदी ३००

३२. **संस्कृत वाङ्मय वल्लरी** (संस्कृत-हिंदी) डॉ. गंगाधर पण्डा, डॉ. प्रमोदिनी पण्डा ३००

३३. **मुण्डकोपनिषद्** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग ४५०

३४. **वातुलशुद्धाख्यतंत्रम्** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी २००

३५. **Transmigration** (जन्मांतरवादः) (English) पं. केदारनाथ त्रिपाठी १५०

३६. **सांस्कृतिक राष्ट्रवाद** (हिंदी) पं. व्रजवल्लभ द्विवेदी ३००

३७. **पारमेश्वरागम** (तेलुगू) डॉ. के. प्रताप ६००

३८. **पंचविंशतिलीलाशतकम्** (संस्कृत-हिंदी) संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी ३००

३९. **Siddhanta Prakasika** (English) Tr. by T. Ganeshan 150

| | | | |
|---|---|---|---|
| ४०. | पंचवर्णसूत्रमहाभाष्यम् (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ४१. | तंत्रागम सार-सर्वस्व (हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ४२. | श्वेताश्वतरोपनिषद् (संस्कृत-हिंदी) | पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | ३०० |
| ४३. | सिद्धान्तशिखामणि (हिंदी व्याख्या) | पं. राधेश्याम चतुर्वेदी | ४५० |
| ४४. | सिद्धान्तशिखामणि प्रवचनप्रभे (कन्नड) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | ५०० |
| ४५. | **Siddhanta Shikhamani** (English) | Dr. M. Shivkumar Swami | 1400 |
| ४६. | जन्म हा अखेरचा | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य (अनु. शे.दे.पसारकर) | ३५० |
| ४७. | वीरशैव संतकवी बसवलिंग : चरित्र व वाङ्मय | डॉ. चंद्रशेखर कपाळे | ८० |
| ४८. | लक्ष्मण महाराज : व्यक्ती आणि वाङ्मय | डॉ. भी. शि. स्वामी | ८० |
| ४९. | श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य | डॉ. शे. दे. पसारकर | २०० |
| ५०. | वीरशैवांचे मराठी हिंदी वाङ्मय : एक अभ्यास | डॉ. श्यामा घोणसे | १०० |
| ५१. | मन्मथस्वामी : व्यक्ती आणि वाङ्मय | डॉ. चंद्रकात देऊळगावकर | ८० |
| ५२. | वीरशैव मराठी अभंगकविता : एक चिकित्सक अभ्यास | डॉ. शोभा कराळे | १०० |
| ५३. | मराठी काव्यातील शिवदैवत-दर्शन | डॉ. शिवशंकर उपासे | १२५ |
| ५४. | विदर्भातील वीरशैव संप्रदाय : ग्रंथकार व वाङ्मय | डॉ. अशोक मेनकुदळे | १०० |
| ५५. | वीरशैव संतकवी शिवदास : एक अभ्यास | डॉ. वैजनाथ फास्के | १०० |
| ५६. | वीरनाथ महाराजांची अभंगवाणी | डॉ. विनय अपसिंगकर | ८० |
| ५७. | श्रीरमतेरामकथामृत (ओवीबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | २० |
| ५८. | श्रीमन्मथचरितामृत (ओवीबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | २० |
| ५९. | वीरशैव पंचपीठे | डॉ. चंद्रशेखर कपाळे | ३० |
| ६०. | वीरशैव संतवाणी | संपा. रे. रा. मगाई, ल. सि. हनगंडी, शे. दे. पसारकर | ३० |
| ६१. | अष्टावरण | डॉ. शे. दे. पसारकर | ३० |
| ६२. | वीरशैव धर्माचा स्थूल इतिहास | डॉ. चंद्रशेखर कपाळे | ३० |

| | | | |
|---|---|---|---|
| ६३. | पंचाचार | पं. शिवाप्पा खके | ३० |
| ६४. | वीरशैवांची स्फुट कविता | शांतितीर्थ स्वामी | ३० |
| ६५. | वीरशैवरत्न | पं. काशीनाथशास्त्री | ५० |
| ६६. | परमरहस्य | संतशिरोमणी श्रीमन्मथस्वामी | १०० |
| ६७. | श्रीसिद्धान्तशिखामणी (अन्वयार्थ, मराठी भावार्थासह) | डॉ. चंद्रशेखर कपाळे | १०० |
| ६८. | श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत (ओवीबद्ध पारायणग्रंथ) | डॉ. शे. दे. पसारकर | २०० |
| ६९. | श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा (अभंगबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | १०० |
| ७०. | श्रीजगद्गुरू पंचाचार्य विजय (ओवीबद्ध पारायणग्रंथ) | डॉ. शे. दे. पसारकर | १५० |
| ७१. | रेणुकगीताई (अनुष्टुभ् छंदोबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | १०० |
| ७२. | अभंगामृत | रेवणसिद्ध परंडकर महाराज | १५० |
| ७३. | म्हणे मन्मथशिवलिंग | स्वाती साखरकर कराळे | १५० |
| ७४. | श्रीसिद्धान्तशिखामणी समीक्षा | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य (अनु. शिवाप्पा खके) | १२५ |
| ७५. | वीरशैव तत्त्वदर्शन | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य (अनु. शे. दे. पसारकर) | १२५ |

---


ग्रंथासाठी संपर्क

**शैवभारती शोधप्रतिष्ठान**

जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तरप्रदेश) स्थिरभाष : 070843 21008

**श्रीधर श्रीराम पैलवान**

१७०४, सोमवार पेठ, भवानी गल्ली, तासगाव, जि. सांगली चरभाष : 9527806750

**श्रीमद् जगद्गुरू पंचाचार्य बुकस्टॉल**

शाहीर वस्ती, प्लॉट नं. ५५/४०, भवानी पेठ, सोलापूर. चरभाष : 9960222151

स्थिरभाष : 0217-2727221


---



**पं. शिवाप्पा नागनाथअप्पा खके**
B.Sc., B.Ed., संस्कृत विशारद

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा 'श्रीसिद्धान्तशिखामणी आणि षड्दर्शने यांचे तौलनिक अध्ययन' हा शोधप्रबंध 'श्रीसिद्धान्तशिखामणिसमीक्षा' या नावाने प्रसिद्ध झाला. त्या प्रबंधाचा लाभ महाराष्ट्रातील सर्व लोकांना व्हावा म्हणून पं. शिवाप्पा खके यांनी मराठी भाषेमध्ये अनुवाद करून पूर्ण केला.

पं. खके यांनी संत मन्मथस्वामीकृत अनुभवानंद, संत महादेवप्रभु अभंगगाथा, संत लक्ष्मण महाराज अभंगगाथा, पंचरत्न शिवपाठ इत्यादी ग्रंथांचे संपादन आणि वरदशंकर व्रतकथा, संत जनार्दनचरितामृत व पंचाचार या ग्रंथांचे लेखन केले आहे.

पं. शिवाप्पा खके यांनी संस्कृत भाषेचा व तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला आहे. माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक असल्यापासून निवृत्तीनंतर आजपर्यंत त्यांनी महाराष्ट्रातील अनेक मठाधिपतींना संस्कृत शिकविले आहे.

मराठी वीरशैव बांधवांना वीरशैव तत्त्वज्ञान समजून घेण्यास हा अनुवाद निश्चित उपयुक्त ठरेल, असा विश्वास वाटतो.

**शैवभारती शोधप्रतिष्ठान**